

*ब्रह्मलीन परमहंस परिव्राजकाचार्य श्रीसद्गुरुपरमपूज्य*
*श्री प्रज्ञानानंद सरस्वती स्वामी महाराज*
*आणि*
*परमप्रिय रामभैय्यास्वरूप प.पू. स्वामी तेजोमयानंदजी*
*यांच्या चरण कमली सादर सप्रेम समर्पण...*

चरणरज- कमाताई (कमलताई वैद्य)

*तेरा तुझको अर्पण*
*गुरुद्वादशी, रविवार ११/११/२०१२*

*गुरुद्वादशी*



# प्रस्तावना

'सत्संगति दुर्लभ संसारा' या शीर्षकाखाली आयुष्यात लाभलेल्या सत्संगतिचा आढावा घेण्याचा प्रयत्न येथे श्रीसद्‌गुरूकृपेने केला जात आहे. त्यावेळी सर्वांत प्रथम आठवण झाली ती श्रीसद्‌गुरू प्रज्ञानानंद सरस्वती स्वामी महाराज यांचीच होय. इस्लामपूर येथे रहात असता १९५१ साली अनुग्रह मिळाला आणि तेव्हापासून १९५९ पर्यंत त्यांच्या सहवासाचा लाभ दीर्घकाळ मिळाला. श्रीरामचरितमानसांत श्री. शिवजींनी म्हटलेच आहे की 'तबहिं होई सब संशय भंगा जब बहु काल करिअ सतसंगा ।। (७/६१/४) त्याप्रमाणेच घडले तसेच गोस्वामी म्हणतात त्याप्रमाणेच 'संत विशुद्ध मिलहि परि तेहि । चितवहिं राम कृपा करि जेही ।।७।। (उत्तरकांड दोहा ६९/७ चौपाई) रामकृपा असेल तरच विशुद्ध संत भेटतात. तसेच रामभैय्याच्या कृपेनेच श्रीसद्‌गुरू स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती यांच्यासारख्या विशुद्ध संतांची गाठभेट झाली. ते आपणहून आमच्या जीवनांत आले आणि आमच्यावर त्यांनी कृपा केली.

प. पू. स्वामी श्रीरामभक्त, गुरूभक्त तर होतेच शिवाय संन्यास धर्माचे काटेकोर पालन करणारे होते. ते नेहेमी सोवळ्यात असत. गुरूपौर्णिमा किंवा कुणाचा अनुग्रह असेल तर अशा विशेष प्रसंगीच त्यांच्या चरणावर मस्तक ठेवण्याचे भाग्य लाभत असे. नाहीतर त्यांना स्पर्श करण्याची कोणाची हिम्मत होत नसे. पैशाला तर ते स्पर्शच करीत नसत. कदाचित चुकून स्पर्श झालाच तर ते सचैल स्नान करीत. एकदा दोनदा त्यांना तिळगुळाचा लाडू देताना त्या लाडवांत काही स्त्रियांनी गुप्तदान म्हणून छोटी पावली घातली होती. तो लाडू फोडताच ते नाणे बाहेर पडले. तेव्हा ते काही बोलले वा रागावले नाहीत पण त्यांनी तात्काळ सचैल स्नान केले होते.

तसेच त्यांना खोटे बोललेले जराही खपत नसे. समजा आमच्या हातून चूक घडली तर ती स्पष्ट कबूल केली तर ते रागावत नसत. क्षमा करीत.

पण कोणी खोटे बोलले, लपवा छपवी केली तर ते मात्र चालत नसे. ते स्वतः कधीच असत्य भाषण करीत नसत. त्यामुळे ते सहज जे बोलत तेही खरे होत असे. उदाहरण म्हणून दोन ठळक गोष्टी इथं नमूद करीत आहे. त्यांनी 'श्रीरामचरितमानसा' वर मराठी आणि हिंदी दोन्ही भाषांत 'मानस गूढार्थ चंद्रिका' ही बृहत् कोशवजा टीका लिहीली आणि दोन्हीची स्वतः प्रेस कॉपीही करून ठेवली होती. एके ठिकाणी त्यांनी लिहीले होते की, कदाचित मराठी टीकेच्या आधी हिंदी टीकाच प्रकाशित होईल आणि खरोखरच तसेच झाले. मराठी टीकेची छपाई हिंदी टीकेच्या पूर्वी सुरू झालेली असून संपूर्ण हिंदी टीका गीता प्रेस तर्फे संपूर्ण मराठी टीका प्रकाशित होण्यापूर्वीच प्रकाशित झालेली होती.

तसेच पू. स्वामी परंडा येथे असताना पत्राने मला कळवीत असत की, 'मराठी प्रस्तावना खंडातील अमूक अमूक लेखाचे हिंदीत भाषांतर तू श्री. आर. व्ही. कुलकर्णी (बाबू) च्या मदतीने करून तो लेख 'मानसमणि' सतनाकडे धाड. त्यावेळी ते म्हणत की, ''खरे म्हणजे 'प्रस्तावना खंडा' चे हिंदीत भाषांतर करायला हवे आहे. पण अजून तरी ते जमले नाही. कदाचित तुलाच ते कधीतरी करावे लागेल.'' त्यावेळी त्यांच्या शब्दातील महत्त्व लक्षांत आले नाही पण नंतर जेव्हा गीता प्रेसकडून प. पू. स्वामींची 'मानस गुढार्थ चंद्रिका' ही हिंदी टीका छापली जाणार हे निश्चितच झाले. तेव्हा मला जाणवले की, 'प्रस्तावना खण्ड' मराठीचे हिंदी भाषांतर प. पू. स्वामींनी केलेले नाही आणि तो खण्ड तर अत्यंत महत्त्वाचा आहे. तेव्हा आपण प्रयत्न करून पहावा. म्हणून मी त्यांतील एक-दोन लेखांचे हिंदी भाषांतर करून पू. डुंगरदासजी महाराजांकडे धाडले व लिहीले की, ते त्यांना पसंत पडले तर मी सद्गुरूंच्या कृपेने संपूर्ण ग्रंथाचे हिंदी भाषांतर करीन. ते पत्र पोहोचल्यावर त्यांना अत्यंत आनंद झाला. तो त्यांनी पत्रांत व्यक्त केला होता व लिहीले होते की तो ग्रंथ वाचता यावा म्हणून त्यांनी मराठी भाषा शिकण्याचाही प्रयत्न केला होता, पण तो यशस्वी झाला नाही. तरी मी जरूर हिंदी अनुवाद करावा आणि मी एकदा तरी परम श्रद्धेय स्वामी रामसुखदासजी यांच्या सत्संगाचा लाभ घ्यावा. त्याप्रमाणे मी मुद्दाम नोखामंडी राजस्थान येथे जाऊन त्यांच्या दर्शनाचा व सत्संगाचा लाभ

घेतला व नंतर श्रीसद्‌गुरू कृपेने माझ्या हातून संपूर्ण प्रस्तावना- खंडाचा हिंदी अनुवाद लिहीला गेला व तो नंतर प. पू. रामसुखदासजींच्या व पू. डुंगरदासजींच्या कृपेमुळे गीता प्रेस गोरखपूर तर्फे प्रकाशितही झाला. हिंदी भाषेचे ज्ञान नव्हते पण श्रीसद्‌गुरू कृपेने आणि 'श्रीरामचतिमानस' या ग्रंथाचीच कृपा झाल्याने हा चमत्कार घडला होता. कारण श्रीसद्‌गुरूंनी समाधिस्थ होण्यापूर्वी ज्या प्रतीवरून अनेक वर्षे 'मानसाची' असंख्य पारायणे केली होती ती 'मानसा' ची हिंदी प्रत 'मी रोज ते हिंदी रामायण वाचीन' असे पत्राने कळविले होते म्हणून 'प्रसाद' म्हणून मला दिली होती व म्हणून १९५१ ते १९६८ पर्यंत मी 'मानसा' च्या पू. स्वामींनी केलेल्या मराठी अनुवादाची पारायणे करीत असे; ती १९६८ पासून श्रीसद्‌गुरूंनी प्रसाद म्हणून दिलेल्या प्रतीवरून हिंदी मानसाची पारायणे करीत असे. दिलेली प्रत अत्यंत जीर्ण झाल्याने तिच्या वरून पारायणे आता करीत नाही.

पू. श्रीसद्‌गुरूंनी सप्तरंगात लिहीलेली पोथी त्यांच्या आदेशावरून सज्जनगडावर देण्यात आली होती ती हिंदी रामचरितमानसाची होती व पू. अय्याबुवा रामदासी त्या पोथीवरून पारायणे करीत असत. पुढे असे झाले की, त्यांचे वय ९० वर्षांच्या आसपास झाले होते. त्यांना नीट दिसत नव्हते, नीट ऐकू येत नव्हते अशा परिस्थितीत अशी घटना घडली की पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती यांनी हस्तलिखित पोथी देतांना ती ज्या लाकडी पेटीतून दिली होती ती लाकडी पेटी चोरीला गेली; भगवंताची कृपाच की ती पेटी नेणाऱ्या व्यक्तिनी ती पोथी दरीत फेकून दिली नाही. ही घटना कळल्यावर श्रीरामचरितमानस प्रेमी मंडळातर्फे श्री. श्रीरामजी गिल्डा, सौ. रेखा पटवर्धन व श्री. अश्विनीकुमार लेले यांनी सज्जनगडावर जाऊन तेथील विश्वस्तांच्या परवानगीने ती पोथी ताब्यात घेतली व मिरजेत आले. श्रीसद्‌गुरू कृपेने त्यावेळेपर्यंत पू. स्वामींच्या 'गुढार्थ चंद्रिका' ची हिंदी प्रुफे तपासण्याचे काम पूर्ण झाले होते. त्यामुळे मला असे वाटले की श्रींनी लिहीलेल्या त्या सप्तरंगी पोथीवरून आपण ओळीने १०८ पारायण शक्य तो नवाह करावीत. म्हणून श्रीसद्‌गुरूंचे स्मरण करून संकल्प केला आणि प्रथम एक मास पारायण नंतर एक पंधरा दिवसांचे

पारायण व नंतर ओळीने उरलेली पारायणे नवाह पारायणे करून जवळ जवळ तीन वर्षांनी तो संकल्प श्रीसद्‌गुरूकृपेने पूर्ण झाला. रामभैय्यावरील प्रेम वाढावे एवढीच कामना होती. नंतर ती संपूर्ण पोथी लॅमिनेशन करून परंडा येथील श्रीराम मंदिराच्या गाभाऱ्यात ठेवण्यात आली आहे. श्रीरामचरितमानसाहून अधिक श्रेष्ठ सत्संग कुठला असणार आहे? हे सर्व श्रीगुरूकृपेनेच साध्य झाले.

प. पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती यांनी माझ्याकडून परदोष चर्चा घडू नये म्हणूनच बहुतेक मला दोन गोष्टी सांगितल्या होत्या. त्या येथे देण्यात येत आहेत. श्रीरामचरितमानसांत उत्तरकांडात गरूडांनी काकभुशुंडीला सप्तप्रश्न विचारले आहेत. त्यांत एक प्रश्न आहे. 'कहहु कवन अघ परम कराला.' याचे उत्तर देतांना काकभुशुंडीनी म्हटले आहे की, 'पर निंदा सम अघ न गरीसा' (उत्तरकांड दोहा १२१) हे वाचून मी श्रीसद्‌गुरूंना विचारले होते की एके ठिकाणी म्हटले आहे की, 'नाहि असत्य सम पातक पुंजा' (अयोध्या २८/५) मग आता येथे असे कां म्हटले आहे? तेव्हा ते म्हणाले, 'परनिंदा करताना त्यात अनेकदा असत्य भाषण तर केले जातेच शिवाय परनिंदा करण्याने त्या व्यक्तींनी केलेल्या पातकाचा दोष निंदा करणाराला लागतो.' म्हणून हे ठसावे म्हणून त्यांनी पुढील गोष्टी सांगितल्या होत्या.

एका गावात एक सत्वशील जोडपे रहात होते. एकदा असे झाले की त्याच्याकडे श्राद्ध होते. त्यासाठी ज्या ब्राह्मणांना आमंत्रित केले होते त्यांनी ते श्राद्धान्न खल्ल्याबरोबर त्यांना विषबाधा होऊन ते जागच्या जागी गतप्राण झाले. हे पाहून त्या जोडप्यास धक्काच बसला. त्या घरातील स्त्रीने अत्यंत काळजीपूर्वक व प्रेमाने सर्व स्वयंपाक केला होता. पण खिरीमध्ये गरळ कोठून आली ते कळले नाही. सर्व गावात ही बातमी पसरली. तेथे मोठी गर्दी जमली, सर्व लोक हळहळू लागले. पण त्या दांपत्याबद्दल त्यांच्या चारित्र्याबद्दल सर्वांना इतका विश्वास होता की, त्यांच्या विषयी कोणी वाईट शब्द उच्चारला नाही. सर्व प्रारब्धालाच दोष देऊ लागले. इकडे चित्रगुप्ताला प्रश्न पडला की या ब्रह्महत्या कोणाच्या खात्यावर टाकावयाच्या. ते यमराजांकडे गेले व त्यांनी आपली अडचण त्यांच्या कानावर घातली

तेव्हा यमराज म्हणाले, ''थोडे थांबा, मग सांगतो.'' मग यमराजांनी आपल्या सेवकांना आज्ञा केली की तुम्ही गावात जाऊन या घटनेविषयी कोण कोण काय बोलत आहे याचा शोध घेऊन या. त्याप्रमाणे त्यांचे सेवक शोध घेऊन आले की, कोण काय बोलत आहे. मग त्यांनी सांगितले की सर्व लोक फार हळहळत असून दैवाला दोष देत आहेत. फक्त दोन महिला घाटावर धुणे धुवत असताना म्हणाल्या की, 'दिसते तसे नसते! उगीच कसे खिरीत विष जाईल? यामागे काही तरी पाणी मुरत असलेच पाहिजे.'' हे ऐकून यमराज चित्रगुप्तांना म्हणाले, 'त्या ब्रह्महत्या या स्त्रियांच्या नावावर लिहा.' थोडक्यात परनिंदा करणे म्हणजे प्रत्यक्ष श्रीहरीची निंदा करणे होय असे एकनाथ महाराज म्हणतात, त्याची जाणीव ठेवून आपण वागायला हवे.

दुसरी गोष्ट श्रींनी सांगितली होती ती अशी आहे. एका गावात एक अत्यंत पतिव्रता स्त्री गावाबाहेर आपल्या पतीबरोबर पर्णकुटीत रहात होती. तिच्या पातिव्रत्याचे सामर्थ्य असे होते की रोज ती पहाटे नदीवर पाणी आणण्यास जाई तेव्हा, ओल्या मातीचा घडा करून त्यात पाणी भरून घेऊन येत असे. एकदा असे झाले की, ती रोज ज्या वाटेने नदीवर जात असे त्या वाटेवर काही अडथळा उत्पन्न झाल्याने तिला दुसऱ्या वाटेने नदीवर जाणे भाग पडले. त्या वाटेवर एका वेश्येचे घर होते. तेथून जाताना त्या वेश्येच्या दारात पडलेल्या जोड्यांकडे तिचे लक्ष गेले आणि तिच्या मनात आले की, 'किती लोकांचे जोडे हिच्या दारात पडले आहेत! अशा स्त्रीला काय म्हणावे?' बस फक्त मनात विचार आला एवढेच! पण त्या दिवशी तिच्या हातून काही केल्या घडा बनेना! तिला प्रथम कळेना की आज हे असे का होत आहे? मग तिला कळून चुकेल की आपल्याकडून नकळत त्या स्त्रीची निंदा घडली हेच त्याचे कारण आहे. असो. प. पू. स्वामी म्हणायचे की एखाद्या हौदात दोन तोट्या असाव्याना तसे बहुतेक साधकांचे होते. एका तोटीने हौदात पाणी पडत असते आणि दुसऱ्या तोटीने ते वाहून जात असते, मग हौद भरणार कसा?

प. पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती यांनी सांगितलेल्या या दोन गोष्टींच्या प्रमाणे प. पू. स्वामी तेजोमयानंदजींनी सांगितलेली एक गोष्टही माझ्या

मनात घर करून राहिली आहे. एका गावात एक साधु गावाबाहेर पर्णकुटी बांधून रहात असे. कुणाच्या अध्यात न मध्यात. तो नेहेमी आपल्या साधनेत मग्न असे. त्या गावात एक बालिका रहात होती. तिला अनैतिक संबंधांमुळे दिवस राहिले व तिने बाळाला जन्म दिला, घरातील लोक अत्यंत संतापले व त्यांनी तिला धमकावून 'हे कोणाचे कृत्य त्याचे नाव सांग!' असे म्हटले. ती खूप घाबरली आणि तिने सरळ त्या साधु पुरूषाचे नाव घेतले. ते ऐकताच तर त्यांच्या अंगाचा तिळपापड झाला आणि ते संतापून त्या तान्ह्या शिशुला घेऊन त्या साधुच्या दारांत आले आणि त्याला खूप दुरुत्तरे करून शिव्या शाप देऊन व त्या शिशुस त्याच्या दारात टाकून निघून गेले. गावातही त्या सत्पुरूषाची बदनामी झाली. एवढा सर्व प्रकार झाला तरी त्या महात्म्याने तोंडातून अवाक्षरही काढले नाही. लोक निघून गेल्यावर माणुसकी म्हणून त्याने त्या शिशुला उचलून पर्णकुटीत आणले व तो प्रेमाने त्याचे संगोपन करू लागला.

पुढे असे झाले की, त्या मुलीचे मनच तिला खाऊ लागले की आपण हे काय करून बसलो? त्या सत्पुरूषाचे नाव आपण उगाचच सांगितले आणि त्यामुळे त्यांची गावात बदनामी झाली. लोकांनी त्यांची इतकी निंदा केली पण ते अवाक्षरही बोलले नाहीत आणि आता ते इतक्या प्रेमाने माझ्या बाळाचे संगोपन करीत आहेत. शेवटी तिला राहवेना आणि तिने घरातील लोकांना खरी गोष्ट सांगून टाकली आणि आपण उगीच त्या सत्पुरूषाचे नाव घेतले म्हणून ती ओक्साबोक्शी रडू लागली. घरातील माणसेही हे ऐकून थक्क झाली. त्यांना आपल्या वागण्याचा पश्चाताप झाला आणि त्या मुलीला घेऊन ती मंडळी त्या सत्पुरूषाकडे गेली व त्यांच्या पाया पडून क्षमा मागू लागली व ते मूल परत घेऊन जाण्याची इच्छा त्या मुलीने व्यक्त केली. त्या महात्म्यास बरे वाटले व त्यांनी त्या बाळास त्याच्या आईच्या स्वाधीन केले. पण आपले मौन त्यांनी सोडले नाही. त्या बाळास घेऊन ती मंडळी तेथून निघून गेली.

प. पू. स्वामी तेजोमयानंदजी म्हणाले होते की, राजा भरताने हरणाच्या पाडसाचे संगोपन केले तर त्यांना त्याच्या विषयी आसक्ती निर्माण झाली पण ह्या महात्म्याने त्यांच्या वरताण केली. मूल ठेवून मंडळी निघून गेली

तर भगवंताची इच्छा समजून त्याचे यथाशक्ती संगोपन केले व त्यांनी मूल परत मागितल्यावर आनंदाने भगवद् इच्छा समजून देऊन टाकले. लोकांनी त्यांचा निष्कारण इतका अपमान केला तो शांतपणे सहन केला. यावरून मला तरी असे वाटले की, आपण काही चूक केली नसता कोणी आपल्यावर दोषारोप केले तर सामान्यतः सत्प्रवृत्तीच्या माणसालाही किती राग येतो? तो लगेच प्रत्युत्तर देतो. स्वतःच्या वागण्याचे समर्थन करू लागतो. त्यावेळी तो म्हणतो की मी का ऐकून घ्यावे? कर नाही तर डर कशाला? गर्व नसावा पण म्हणून स्वाभिमान म्हणून काही आहे की नाही? मी मुळीच गप्प बसणार नाही! जशास तसे वागले पाहिजे! हे मत बरोबर आहे हे सिद्ध करण्यास आपण संतांच्या वचनांचाही आधार घेण्याचा प्रयत्न करतो. पण ही गोष्ट ऐकल्यापासून असे वाटते की भगवंताच्या इच्छेवाचून झाडाचे पानही हालत नाही. सर्व कर्ता करविता भगवानच आहेत, ते सूत्रधार असतात. बाकी आपण सर्व काष्ठ पुतळ्यांप्रमाणे ते नाचवतील तसे नाचत असतो अशी आपली दृढ श्रद्धा असायला हवी. तशी ती असेल तर प्रतिकूल परिस्थितीतही आपण शांत राहू शकू यात शंका नाही. ही गोष्ट माझ्या हृदयास अत्यंत भिडली आहे.

श्रीरामचरितमानसात अरण्यकांडात दोहा ४५ व दोहा ४६ मध्ये स्वतःस भगवंतांनी नारदांनी विचारल्यावरून संतांच्या गुणांचे वर्णन केलेले आहे. ते म्हणतात, 'हे मुनि, ज्या गुणांच्यामुळे मी स्वतः संतांना वश होऊन रहातो, ते गुण सांगतो, ते तू ऐक, षट् विकारांना ज्यांनी जिंकलेले आहे, जे निष्पाप व निष्काम असून स्थितप्रज्ञ, अकिंचन, पवित्र आणि सुखधाम असे असतात. अमित बोध असणारे, निःस्पृह, मितभोगी असून सत्यसार, कवि कोविद आणि योगी असातात. ते सदा सावधान असून दुसऱ्यास मान देणारे आपण स्वतः मानमद नसणारे असतात. ते धीर, धर्मनिष्ठ आणि परम प्रवीण असतात. गुणांचे भांडार असतात, दुःख त्यांना स्पर्शही करत नाही व ते निःसंदेह असतात. त्यांना भगवंताच्या चरण कमलांशिवाय दुसरे काहीही देह, गेह इत्यादि प्रिय वाटत नाही. स्वतःचे गुण कानांवर पडले तर त्यांना अत्यंत संकोच वाटतो पण दुसऱ्यांचे गुणवर्णन कानावर पडल्यावर त्यांना अतिशय आनंद होतो. त्यांच्या ठिकाणी शांती व समता वास करीत

असते आणि ते कधीही नीतीचा त्याग करत नाहीत. ते सरळ स्वभावाचे असतात आणि सर्वांवर ते प्रेमच करतात. जप, तप, व्रत पालन यांत त्यांचा वेळ जात असतो व इंद्रिय निग्रह, मनोनिग्रह व नेमनिष्ठा हे गुण त्यांच्या ठिकाणी असून श्री सद्गुरू, भगवान व विप्र यांच्या चरणी त्यांचे निष्कपट प्रेम असते. वैराग्य, ज्ञान, नियम आणि विज्ञान यांनी युक्त असून वेद व पुराणांचे रहस्य ते उत्तम प्रकारे जाणतात. ते दंभ, अहंकार, मद कधीही करत नाहीत आणि चुकूनही कुमार्गावर पाऊल टाकीत नाहीत. ते सदा भगवंताच्या गुणांचे, लीलांचे श्रवण किर्तन करीत असतात आणि कुठलाही स्वार्थ न बाळगता नेहेमी दुसऱ्याचे हित करण्यात रत असतात. भगवान म्हणतात की, शारदा श्रुति ही संतांच्या समस्त गुणांचे वर्णन करू शकत नाहीत; यापेक्षा अधिक काय सांगावे?

'मानसां'त उत्तरकांड दोहा ३७ व दोहा३८ मध्येही भरतांनी विचारल्यावरून भगवंतानी संताच्या व असंताच्या गुणांचे वर्णन केले आहे. तेथे भगवान् म्हणतात की असंताचे वागणे कुठारी (कुऱ्हाडी) सारखे तर संतांचे चंदनासारखे असते. परशु (कुऱ्हाड) चंदनाचा वृक्ष तोडतो. तरी चंदन सुगंध देण्याचा आपला गुण सोडत नाही. त्याच्या उत्तम गुणांमुळे चंदन देवांच्या भाळावर विराजमान होऊन शीतलता प्रदान करते, तर कुऱ्हाडीच्या पात्यास अग्नित पडावे लागून घाव सोसावे लागतात. हीच शिक्षा अथवा दंड त्यास मिळतो. यानंतर अरण्यकाडांत जी लक्षणे साांगितली आहेत तीच तेथे सांगितली आहेत. 'मम नाम परायण' हे एक व 'पुरूष वचन कबहूँ नहिं बोलहि', कधी कठोर भाषण करीत नाहीत. त्यांना निंदा व स्तुती सारखीच असते असेही म्हटले आहे. या दोन्ही ठिकाणी जी संत लक्षणे, गुण भगवंतांनी सांगितले आहेत त्यांची यादी हातात घेऊन जर कोणी त्या यादीस अनुसरून संतांचा शोध घेऊ लागेल तर त्यांची निराशाच होईल. कारण हे जगच गुणदोषमय विधात्याने उत्पन्न केलेले आहे. तेव्हा ते स्वाभाविकच आहे. पण श्रीरामचरितमानसातच संताचे मुख्य लक्षण जे काकभुशुंडीनी गरूडास सांगितले आहे ते आहे 'पर उपकार वचन मन काया । संत सहज सुभाउ खगराया ।। १२१ दोहा चौपाई १४ ।।

यावरून श्रीसद्गुरू स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती एक गोष्ट सांगत असत

ती येथे दिली जात आहे. एक संत महात्मा नदीत उभे राहून स्नान संध्या आदी करत होते. इतक्यात त्यांना एक विंचू पाण्यातून वाहत जाताना दिसला तेव्हा त्यांनी त्यास चटकन् उचलाला त्याबरोबर त्या विंचवाने त्यांना दंश केला, त्यामुळे त्यांचा हात हालला व तो विंचू परत पाण्यात पडला तेव्हा त्यांनी परत त्याला उचलले तर त्याने परत त्यांना डंख मारला व त्यामुळे हात हालून तो परत पाण्यात पडला. असे दोन तीनदा झालेले पाहून शेजारी एक मनुष्य हे पहात होता तो त्या महात्म्यास म्हणाला की, 'तुम्ही परत परत कशाला त्याला वाचवायचा प्रयत्न करीत आहात? तो तर दरवेळी तुम्हास डंख मारत आहे! जाऊ दे ना वाहून!' तेव्हा संत म्हणाले, 'अहो, हा एवढासा जीव सुद्धा आपला स्वभाव सोडत नाही मग मी का बरे माझा स्वभाव सोडावा?' थोडक्यात दुसऱ्याने कितीही त्रास दिला तरी संत तो शांतपणे सहन करून त्या जिवाचे काया वाचा मनोभावे हित करण्याचाच प्रयत्न करीत असतात. तो त्यांचा सहज स्वभावच असतो.

ही गोष्ट जशी मनात घर करून राहिलेली आहे तशीच परम पूज्य तेजोमयानंद स्वामींनी सांगितलेली गोष्टही मनात ठसली आहे. ती अशी आहे– एक साधु होता. तो ज्या गावात रहात होता त्या गावातच एक वेश्या रहात होती. एकदा त्यांची सहज समोरासमोर गांठ पडली तेव्हा त्या स्त्रीने त्या सत्पुरूषास विचारले की, आपण काम विकार जिंकला आहे का? त्या साधुने काहीही उत्तर दिले नाही व तो गुपचूप तेथून निघून गेला. यानंतर जेव्हा जेव्हा त्यांची योगायोगाने गाठ पडली तेव्हा तेव्हा ती हाच प्रश्न करी आणि ते काही न बोलता तेथून निघून जात.

एकदा ती स्त्री रस्त्याने जात असता तिला एका ठिकाणी खूप गर्दी जमलेली दिसली. तिने जवळ जाऊन पाहिले तर तो सत्पुरूष मरून पडलेला होता. तेव्हा चटकन् ती बोलून गेली की, 'शेवटी माझ्या प्रश्नाचे उत्तर न देताच साधुबाबा गेले.' त्याबरोबर ते प्रेत पडले होते ते उठून बसले आणि 'हो, मी काम विकार जिंकला आहे.' असे म्हणून पुन्हा गतप्राण झाले. हा चमत्कार पाहून ती स्त्री व सर्वच लोक चकित झाले. थोडक्यात यावरून बोध असा घ्यावयाचा आहे की, 'भगवंताची माया इतकी प्रबल

आहे की तो केव्हा कोणास कसे नाचवील हे सांगता येत नाही. म्हणून कोणीही साधकाने आपल्या इंद्रियाचा किंवा मनाचा भरवसा बाळगु नये. तर भगवंतासच शरण जावे. त्यांनी कृपा करून सर्व निभावून नेले तरच साधक निभावून जाऊ शकतो!

श्री सद्गुरू प. पू. प्रज्ञानानंद स्वामींना मी विचारले होते की हल्ली लोक घरात श्राद्धपक्ष न करता मृत व्यक्तिच्या नावाने एखाद्या संस्थेला देणगी देतात उदा. अनाथाश्रम, वृद्धाश्रम वगैरे; तर हे योग्य आहे का? तेव्हा ते म्हणाले होते की जरी त्या व्यक्तिच्या स्मृत्यर्थ देणगी, दानधर्म केला तरी आपल्या वैदिक धर्मात सांगितल्याप्रमाणे त्या व्यक्तिच्या नावे श्रद्धापूर्वक तर्पण आदि धार्मिक कृत्य करायलाच हवे. पितरांच्या नावाने श्राद्ध, तर्पण आदिपूर्वक त्यांचे स्मरण केल्याने त्यांचे आशिर्वाद मिळतात, त्यांना जी गति प्राप्त होते त्यात त्यांना सुख, आराम आदि मिळते. आता मला हे सांगा की, पोस्टल स्टॅम्प्स् आणि रेव्हेन्यू स्टॅम्प्स् दोन्हीचे पैसे सरकारी तिजोरीतच जमा होतात ना? पण जेथे पोस्टल स्टॅम्प्स् लावायचे तेथे रेव्हेन्यू स्टॅम्पस् चालतात का? किंवा जिथे रेव्हेन्यू स्टॅम्प्स् लावायचे तेथे पोस्टल स्टॅम्प्स् चालतात का? नाही ना? तसेच हे आहे असे समज. हे ऐकून माझे पूर्ण समाधान झाले. याशिवाय मला 'भाई परिचय' या पूज्य हनुमान प्रसाद पोद्दार यांच्या चरित्र ग्रंथात ही एक गोष्ट वाचण्यात आली आहे. त्यांना एका पारशी गृहस्थाच्या मृतात्म्याने भेटून त्याचे नावाने गयेस श्राद्ध केले जावे अशी विनंती केली होती. तो पारशी म्हणून त्यांना आश्चर्य तर वाटलेच पण त्यांनी आपल्या गयेच्या ओळखीच्या माणसास त्याचे नाव वगैरे कळवून तशी व्यवस्था केली. त्यानंतर परत त्या पारशाने त्यांना भेटून, त्यांना वंदन करून आपल्याला उत्तम गति मिळाल्याबद्दल त्यांचे मनापासून आभार मानले व तो आनंदाने अदृश्य झाला. पू. हनुमान प्रसाद पोद्दार यांचे सारखे महात्मे असत्य भाषण कधीच करत नाहीत.

सांगली

**– डॉ. कमलताई वैद्य**

गुरुद्वादशी

***

# भक्तिमार्ग प्रदीप

ब्रह्मलीन प.पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती यांच्या अनुगृहीत विदुषी डॉ. कमलाताई वैद्य यांनी 'सत् संगति दुर्लभ संसारा' नामक एक आगळे-वेगळे जीवन चरित्र म्हणण्याऐवजी जीवनातील आध्यात्मिक वाटचालीचा सहज, सुंदर आणि सोप्या भाषेत चलत्पट सादर करून फार मोठे योगदान साधले आहे.

पुस्तकातील प्रकरणांची रचना अतिशय साक्षेपी आणि सुबोध केली असून एकेका व्यक्तीरेखेच्या वर्णनातून डॉ. कमलाताईंची जीवन नौका कसकसे संस्कारांचे लेणं चढवीत पुढे सरकत होती त्याचा बोध होताना संपर्कातील विविध व्यक्तींच्या रेखाचित्रणाचे त्यांनी सादर केलेले शिल्प खरोखरी सुखद मनोहारी असे आहे. अगदी एकेक पाकळी हळूहळू विलग पावून फुलाचा सुगंध आसमंतात दरवळावा ना, अगदी तशाच पद्धतीने त्यांनी आपल्या या साहित्य संकल्पनाची रचना केली आहे. संपर्कातील सर्वच व्यक्तींविषयी असलेली निर्व्याज सद्भावना आणि आदर सहज दृष्टोत्पत्तीस येतो.

या संपूर्ण लेखनात प्रासादिकता, सात्त्विकता आणि सहजता आढळून येतेच परंतु प्रत्येकाचे केलेले वर्णन हे प्रत्यक्ष व्यक्तिचित्र समोर उभे करण्यास समर्थ आहे. प्रथम आपल्या विविध आप्तांची ओळख करून देत यजमानांचे वर्णन करताना दिसणारी भावविवशता आदर्श पत्नी, साध्वी या दृष्टीने यथायोग्यच होय. त्यानंतर प.पू. गुळवणी महाराजांपासून जसजसा संत-महंत समागम, सत्संग लाभत गेला तसतसे त्यांचे प्रासंगिक वर्णन करीत त्यांनी आपल्या ठायी विलसणारा श्रद्धाभाव, नम्रता व धार्मिकता यांचा परिचय लीलया करून देताना कुठेही स्वत:चा मोठेपणा व्यक्त न करता 'भाग्य' म्हणून घडल्याचे विनयाने नमूद केले आहे.

डॉ. कमलताई यांनी वयाची पंच्याहत्तरी ओलांडल्यावर देखील ज्या एका प्रवाही भाषाशैलीतून लेखन केले आहे ते मनोवेधक तर आहेच पण

त्याचबरोबर जीवनातील अत्यंत महत्त्वाच्या परंतु प्रस्तुतच्या साहित्य सादरीकरणाला अशा अनुरूप घटनांचा एक सुंदरसा पुष्पगुच्छ वाचकांच्या हाती देताना या 'संपूर्ण लेखन रचनेमागील प्रेरणा स्त्रोत श्री. मृणालिनी जोशी यांच्या 'आलोक' आत्मचरित्रातून लाभला असे नमूद करून मनाची उदात्तता व उदारता व्यक्त केली. यातच डॉ. कमाताईंच्या (डॉ. कमलताईंच्या) आध्यात्मिक मानसिक धारणेचा सहजगत्या प्रत्यय येतो. सारे जीवन 'रामभैया' चरणी अर्पण करणाऱ्या लेखिकेने आपले गुरू प्रज्ञानानंद सरस्वती स्वामी महाराज यांच्या पहिल्या भेटीचे वर्णन आणि उचंबळून आलेल्या भावनांचे शब्दांकन वाचकांच्या मनात कायम रुळण्याइतके हृद्य आहे. एकदा सद्गुरुंची गाठ पडली आणि आधीच संस्कारक्षम असलेले लेखिकेचे मन पूर्णत: राममय होऊन गेले व सारे जीवनच भक्तिमार्ग प्रदीप झाले. या निमित्ताने त्यांनी केलेला रामचरित मानसाचा अभ्यास ज्याप्रमाणे कौतुकास्पद आहे तसेच लग्नानंतर प्रपंच सांभाळून मिळविलेली पीएच्.डी. हे लेखिकेच्या सर्जनशीलता, ध्येयवादी आणि निग्रही मनाचे प्रतीक दिसून येते.

संपूर्ण लेखन साहित्यात प्रकर्षाने प्रत्ययास येणारी गोष्ट म्हणजे लेखिकेने आपले आप्त आणि विविध प्रसंगांनी संबंधात येणाऱ्या कोणाही थोरा-मोठ्यांविषयी सातत्याने दर्शविलेली पूज्यभाव बुद्धि, आदर व आत्मीयता लक्षणीय आहे. वरती जो 'विदुषी' शब्दप्रयोग केला आहे तो याचसाठी होय. आपण विद्वान असूनही विद्वत्तेचा टेंभा लेखिकेने कोठेही न मिरविता सर्वजनांशी नम्रता व आत्मीयता यातून साधलेला संवाद होय. त्यामुळेच या एका आगळ्या-वेगळ्या आत्मचरित्राचे सर्वत्र निश्चित स्वागत होईल. डॉ. कमलताईंच्या जीवनातील गुरूकृपा आणि रामभक्तीचा निर्मळ प्रवाह यातून साकारलेले हे प्रासदिक 'सत् संगति दुर्लभ संसारा' साहित्यिक व धार्मिक वाङ्मयात मोलाचे योगदान ठरणार आहे. डॉ. कमलताईंच्या या साहित्यकृतीबद्दल मनोमन अभिवादन करून वाचकही त्याचे मोठे स्वागत करतील असा विश्वास आहे.

श्री ज्ञानेश्वर पदाश्रित,

स्वामी गोविंददेवगिरि:

धर्मश्री, पुणे
दीपावली,
दि. १३/११/२०१२

# अभिवादन

डॉ. कमाताई वैद्य यांनी 'सत्संगति दुर्लभ संसारा' हे आत्मकथानात्मक पुस्तक लिहिले आहे. त्यात त्यांनी संपर्कात आलेल्या अनेक व्यक्ती, सत्पुरुष, यांचे पुण्यस्मरण केले आहे. हे सरळ साध्या ओघवती भाषेतले पुस्तक वाचताना त्यांच्या सौजन्याचा, कृतज्ञबुद्धीचा, श्रद्धेय व्यक्तींबद्दलच्या आदरभावनेचा, ईश्वरावरील नितांत निष्ठेचा, प्रांजळपणाचा प्रत्यय वाचकांना आल्यावाचून राहात नाही. कमाताई रामाच्या एकनिष्ठ भक्त आहेत. रामरायाच्या साध्या स्मरणाने त्या सद्‌गदित होतात, त्यांच्या डोळ्यातून अखंड अश्रूधारा वाहू लागतात, एवढ्या त्या रामाशी मनाने जोडल्या गेलेल्या आहेत. त्यांनी रामाशी भावाचेच नाते जोडलेले आहे. जेवढा भक्तिभाव त्यांचा रामाच्या ठिकाणी आहे, तेवढाचा भक्तिभाव त्यांचा त्यांचे सद्‌गुरू प.पू. प्रज्ञानानंद सरस्वती स्वामी महाराज यांचे ठिकाणी आहे. तेवढाच आदरभाव त्यांना भेटलेल्या सत्पुरुषांबद्दलही त्यांच्या मनात आहे. या सर्व सत्पुरुषांना रामस्वरूप मानून त्यांनी त्यांच्याशीही भावाचे नाते जोडलेले आहे. दरवर्षी राखी पौर्णिमेच्या सुमारास त्या सर्व सत्पुरुषांना न चुकता राख्या पाठवत असतात. एवढा प्रेमळ नातेसंबंध जोडल्यानंतर त्यांचा स्नेह कोण नाकारील? पूज्य आचार्य किशोरजी व्यास (स्वामी गोविंददेव गिरी महाराज) यांच्यापासून प.पू. रामसुखदासजी यांच्यापर्यंत अनेक अधिकारी सत्पुरुषांच्या आठवणींची पुष्पमाला त्यांनी या पुस्तकात मोठ्या प्रेमभावाने गुंफलेली आहे. त्या सर्वांचा त्यांच्यावर वरदहस्त होता आणि आहे.

कमाताईंना त्यांचे सद्‌गुरू प.पू. प्रज्ञानानंद स्वामी महाराज यांचा कृपाप्रसाद लाभलेला आहे. त्यांचा वरदहस्त सदैव त्यांच्या मस्तकावर आहे. त्यामुळे त्या जे जे काम हाती घेतील त्या त्या कामात त्यांना यश मिळत गेले आहे. स्वामींचे सर्व वाङ्मय छापून प्रसिद्ध करणे ही लहानसहान

गोष्ट नव्हती. पण कमाताईंनी कंबर कसली आणि ग्रंथप्रकाशनासाठी निधी जमवण्यास सुरुवात केली. परमपूज्य स्वामी गोविंददेव गिरी महाराज हे त्यांच्या मदतीस धावून आले अणि त्यांनी आपल्या भागवत सप्ताहाचे सगळे उत्पन्न त्यांच्या या निधीस दिले. आणि त्यामुळे अशक्यप्राय वाटणारा तो संकल्प प्रत्यक्षात मूर्त झाला. जवळजवळ वीस एक हजार पृष्ठांचा पैस असलेले ते समग्र वाङ्मय छापून निघाले. परंड्यास स्वामी ज्या रामविश्रामधाम या वास्तूत राहात होते त्या वास्तूला स्वामींचे चिरस्थायी स्मारक बनवण्याचा संकल्प स्वामींच्या शिष्य मंडळींनी सोडला. ती वास्तू विकत घेऊन त्या जागी राममंदिराची उभारणी करणे हे सोपं काम नव्हतं. पण कमाताईंनी आपल्या गुरूबंधूंच्या आणि थोर थोर सत्पुरुषांच्या मदतीने मंदिरासाठी आवश्यक तो निधी अल्प कालावधीत उभा केला आणि त्यातून एका सुंदर राममंदिराची वास्तू उभी राहिली. पुढच्या काळात याच मंदिराचा विस्तार करून स्वयंपाक गृह, एक विशाल सभागृह यांचीही त्यात भर घातली. आणि अगदी अलीकडे त्या मंदिराला भक्तनिवासाचीही जोड दिली गेली.

स्वामी रामकृष्णांच्या पश्चात् स्वामी विवेकानंदांनी ज्याप्रमाणे आपल्या गुरूबंधूंचे नेतृत्व केलं, तसं अल्प प्रमाणात का होईना, स्वामी प्रज्ञानानंदांच्या पश्चात् कमाताईंनीही आपल्या गुरुबंधूभगिनींना संघटित करून त्यांना स्वामींच्या कार्यात ओढून घेतले. श्री श्रीराम गिल्डा, आदिनाथराव यादव, पुरमवार गुरुजी, मंगलाताई ओक, सौ. रेखा पटवर्धन, सौ. श्यामा दिवाकर इ. कार्यकर्त्यांची फळी उभारून स्वामी कार्यास चालना दिली.

कमाताईंची ग्रंथनिर्मिती हा एक अखंड चालणारा ज्ञानयज्ञ आहे. स्वामींच्या 'रामचरितमानसगूढार्थचंद्रिका' या ग्रंथाच्या प्रचंड प्रस्तावनेचा कमाताईंनी हिंदीत अनुवाद केला आहे. वाल्मीकि रामायणाचा मराठी अनुवाद केला आहे, समर्थांच्या दासबोधाचे गद्य रूपांतर केलं आहे, स्वामी प्रज्ञानानंदांचे गद्य चरित्र, त्यांचेच पद्यमय चरित्र, तुलसीदासांचे चरित्र, तुलसीदासांच्या दोहावलीचे मराठीत भाषांतर व विवरण, स्वामी चिन्मयानंदांचे पद्यमय चरित्र, त्यांच्या एकनाथांवरील पीएच्.डी.च्या प्रबंधाची संपादित आवृत्ती इ. त्यांची ग्रंथसंपदा आहे. महाराष्ट्रातील संतवाङ्मयपर नियतकालिकांतून त्या सातत्याने लिहित असतात. आज वयाची ८५ वर्षे उलटून गेली

असली तरी या ज्ञानयज्ञाला खंड नाही. कमाताई निवांत बसल्या आहेत, असं दृश्य सहसा पाहायला मिळत नाही.

एवढा कार्यकलाप वाढवूनही कमाताई त्याकडे 'इदं न मम' या भावनेनं पहातात. त्यांच्या या आत्मकथनात कमाताईंनी स्वत:च्या या कर्तृत्वाचा एक दोन अपवाद सोडता कोठेही उल्लेख केलेला नाही. या त्यांच्या निर्मम बुद्धीचे कौतुक वाटते.

त्यांच्या आत्मकथनात, आपल्या जीवनात भेटलेल्या अनेक व्यक्तींचा त्यांनी कृतज्ञता बुद्धीने धावता परिचय करून दिला आहे. त्यांमध्ये आत्मकथन, नातेसंबंधातील व्यक्ती, गुरुपरिवारातील व्यक्ती, सानिध्यात आलेले सत्पुरुष अशा अनेक व्यक्तींचा त्यांनी परिचय करून दिला आहे. नंतर अखेरीस त्यांनी सत्पुरुषांची पत्रे व सत्पुरुषांचे विचार अशी परिशिष्टे जोडली आहेत. या सगळ्या आत्मकथनातून आपल्याला एका सुशिक्षित, सुसंस्कृत, कुशाग्र बुद्धी असलेल्या, सात्त्विक बुद्धीच्या स्त्रीचे दर्शन घडते. त्यांची सर्वांबद्दलची कृतज्ञता, सर्वांबद्दलचा स्नेहभाव, निरहंकार वृत्ती, निरागसता आणि प्रांजळ स्वभाव, सात्त्विकता हे त्यांचे गुण पाहून वाचक त्यांच्यापुढे नतमस्तक होतो. अनेक थोर पुरुषांच्या संपर्कात आल्याने कमाताईंची घडणही सत्पुरुषाला साजेल अशीच झाली असल्याचे जाणवते. सत्पुरुषांचे वर्णन करता करता कमाताईही त्यांच्याच मालिकेत स्वत:ला न कळत जाऊन बसल्या आहेत. त्यांना आदरपूर्वक प्रणाम!

पुणे

**– कल्याण काळे**

दि. २७.११.२०१२

***

# आत्मकथन

श्री सद्‌गुरू कृपेने वर्षापूर्वी श्री. मृणालिनी जोशी यांनी लिहिलेली 'आलोक' हे आत्मचरित्रवजा पुस्तक वाचण्यात आले. त्यांत वैयक्तिक तपशीलाऐवजी त्यांच्या आयुष्यात त्यांचा ज्या अविस्मरणीय व्यक्तींशी संबंध आला आणि त्यांचे जीवन ज्यांच्यामुळे खरोखरी सार्थकी लागले अशा व्यक्ती व घटनांचे शब्दचित्र रेखाटले गेले आहे. वाचून आनंद झाला आणि मनात आले की भगवंताच्या आणि सद्‌गुरूंच्या कृपेनेही आपण सर्व सामान्य असूनही आपल्याला अनेक सत्पुरूषांचा, सज्जनांचा आणि साहित्यिकांच्या सहवासाचा लाभ झाला आहे आणि त्यामुळे आपल्याही मनुष्य जीवनाचे सार्थक झाले आहे. तर या सर्वांविषयी कृतज्ञतापूर्वक लिहिण्यास काय हरकत आहे? आणि मनांत ज्या ज्या व्यक्तींच्यामुळे जीवनास परीसस्पर्श होऊन मधुरता प्राप्त झाली त्या त्या व्यक्तींचे स्मरण होऊन त्यांच्या विषयीच्या मधुर आठवणी मनांत घोळू लागल्या, मनांतील हे विचार काही सुहृदांजवळ व्यक्त केले तेव्हा त्यांनाही आनंद होऊन त्यांनी अशा प्रकारचे लेखन मी करावे म्हणून प्रोत्साहन दिले. (१९५१ मध्ये चैत्र शुद्ध दशमीस) ईश्वरी कृपेने प. पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती यांच्याकडून माझे पती वै. डॉ. बाळकृष्ण श्रीपाद वैद्यांना व मला शक्तिपात दीक्षा प्राप्त झाली आणि एकंदर आमचे आयुष्यच बदलून गेले. तेव्हापासून 'श्रीरामचरितमानस' या गोस्वामी तुलसीदास लिखित ग्रंथास माझ्या आयुष्यात सर्वोच्च स्थान प्राप्त झाले आहे. 'मानसा'शिवाय मी विचारच करू शकत नाही. त्या ग्रंथात अरण्यकांडात श्रीराम प्रभूंनी शबरीला नवविधा भक्तीचा उपदेश केला आहे. त्या उपदेशाचा खोल ठसा अंत:करणावर उमटला आहे व त्यात सांगितलेली नवविधा भक्ती आपल्या जीवनात आपल्याला उतरविता यावी म्हणून श्री सद्‌गुरू आणि रामभैय्या यांच्या कृपेच्या आधारावर प्रयत्न केले जात आहेत. यांत 'आठवँ जथालाभ संतोषा । सपनेहुँ नहिं देखदू

परदोषा' या वचनाचा परिणाम म्हणून शक्यता परदोष बघणे व परदोष चर्चा यांचा स्पर्शही होऊ नये असा प्रयत्न असतो. या लेखनातही या दोषाचा स्पर्श कुठेही होऊ नये अशी सद्गुरू आणि रामभैय्यांच्या चरणी अत्यंत कळवळून प्रार्थना करूनच लेखन करण्याचा प्रयत्न करीत आहे. रामभैय्या 'कारणरहित दयाल' आणि सर्व सामर्थ्यसंपन्न आहेत त्यामुळे ते आपल्या भगिनीकडून हे दोष होणार नाहीत याची काळजी निश्चितच घेतील अशी खात्री आहे.

***

## डॉ. सौ. शैलजाराजे प्रतिनिधी

१९८७ मध्ये मला Ph.D. ची पदवी मिळाली तेव्हा मला ६० वर्षे पूर्ण झालेली होती. ह्यांना देवाज्ञा झाल्यावर मी १९६६ मध्ये 'नाथीबाई दामोदर ठाकरसी विद्यापीठ, मुंबई' येथून Pre-degree ची परीक्षा दिली होती व १९७१ मध्ये M.A. होवून प्रा. कृ. ब. निकुंब यांच्या मार्गदर्शनाखाली 'एकनाथी भागवता' चा अभ्यास करून प्रबंध लिहिण्यास सुरूवात केली होती. तेव्हा कर्नाटक विद्यापीठात त्यासाठी माझे नांव नोंदविलेले होते व २ वर्षांनी माझ्या अभ्यासाचा रिपोर्टही पूज्य सरांकडून नोंदविला गेला होता. नंतर प्रथम मुंबई नंतर सांगली नंतर मिरज असे स्थलांतर झाले तरी माझा अभ्यास चालू होता. मध्येच प. पू. प्रज्ञानानंद सरस्वती स्वामी महाराज व गोस्वामी तुलसीदास यांची चरित्रे लिहिली गेली व त्यामुळे 'संतकृपा' प्रकाशनाशी संबंध आला. त्यानंतर ७/८ वर्षे संतकृपात असे अनेक लेख क्रमशः त्या मासिकात प्रकाशित होत होते. त्याचवेळी दर मासिकात पू. सौ. शैलजाराजे यांचे भागवतावरील काव्यही प्रकाशित होत होते. त्यामुळे नुसती नावाने आमची एकमेकीशी ओळख होती. नंतर १९८७ मध्ये मला पदवी मिळाली व डॉ. हेमंत वि. इनामदार पारितोषिकही मिळाले. म्हणून मी नंतर कोल्हापूर येथे गेले असतां माझी भाचे सून सौ. सुशिला व भाचा डॉ. माधव नारायण गोगटे यांनी त्यांच्या घरीच काही निवडक मंडळींना आमंत्रित करून माझा सत्कार केला. तेव्हा डॉ. द्रविड, डॉ. भद्रे व सौ. भद्रे यांच्याबरोबर डॉ. सौ. शैलजा राजे व त्यांच्या पतीनांही

आमंत्रित केले होते. त्यावेळी त्यांचा प्रत्यक्ष परिचय झाला. त्यावेळी त्यांनी मला त्यांच्या घरी आमंत्रित केले होते म्हणून मी. सौ. सुशिला बरोबर त्यांच्या घरी गेले होते. त्यांनी 'सावित्री' वर महाकाव्य इंग्लिशमध्ये लिहिले होते आणि भागवतावर त्यांनी काव्य लिहिले होते. मी गेल्यावर मला त्यांनी 'सावित्री' तील थोडा भाग वाचून दाखवला व भागवतातील काय वाचू म्हणून विचारले. तेव्हा मी म्हटले 'सुदाम चरित्र वाचा' आणि त्यांनी मला ते वाचून दाखवले. या सत्संगाचा आनंद आम्हा दोघींना झाला पण त्यांच्या भेटीचा परत योग आला नाही. त्यांचे ज्ञानेश्वरीचे सखोल अध्ययन होते व त्यावर त्या प्रवचनेही करीत. त्यावरील त्यांचा ग्रंथही मी पुढे वाचला. सुंदरच आहे.

***

## माझी भावंडे

मला दोन भाऊ आणि दोन बहिणी आहेत. आणखी एक भाऊ होता. त्याचे नाव मनोहर होते. माझ्या पाठच्या भावाचे नांव भालचंद्र आहे. त्याला लहानपणापासून बाळ म्हणतात. तो लहानपणी बराच आजारी होता. तेव्हा आम्ही वाळकेश्वर मधील सॅनेटोरियममध्ये काही दिवस राहिलो होतो असे आठवते. त्यांच्या माझ्यात कधीही भांडण झाले नाही. त्याला बिवलकर मास्तरांची शिकवणी लावली होती व त्याने मराठी दुसरी तिसरी एकदम करून तो एकदम मराठी चौथीत बसला होता. माझे व त्याचे प्राथमिक शिक्षण एकदमच झाले. नंतर मी 'चंदारामजी हिंदु गर्ल्स हायस्कूल' मध्ये व तो 'विल्सन हायस्कूल' मध्ये जाऊ लागलो. त्याच्या शाळेत बायबल शिकवले जात असे. म्हणून मीही हौसेने 'जुना करार' व 'नवा करार' वाचला होता. त्याच्याबरोबर मी विटीदांडू, गोट्या, लगोरी, क्रिकेट वगैरे खेळत असे. आम्ही दोघे क्रिकेटच्या मॅचीस बघायला जात असूं. त्याला राष्ट्रीय स्वयंसेवक संघात जाणे आवडत असे. त्याच्यामुळे संघाची काही गाणी माझीही पाठ झाली होती. नंतर तो मॅट्रिकला गेल्यावर अभ्यासामुळे त्याचे संघात जाणे बंद पडले. तो सिडन हॅम कॉलेजमधून B. Com. झाला व नंतर मद्रासला राहून त्याने ती. भाऊसाहेब मामांच्या

मार्गदर्शनाखाली C.A. केले. मद्रासला राहिल्यामुळे तो तामिळमध्ये बऱ्यापैकी बोलत असे. शिकून आल्यावर ESSO मध्ये तो नोकरी करीत होता. नंतर Wimco मध्ये व नंतर माझे मामा N. दांडेकर यांच्या ऑफिसमध्ये काम करीत असे. त्याला एक मुलगा, दोन मुली आहेत. त्याची पत्नी सौ. सुधा हिला १९९२ मध्ये गुढीपाडव्यास देवाज्ञा झाली. पूर्वी आम्ही इस्लामपूरला होतो तेव्हा तो दरवर्षी इस्लामपूरला येत असे. त्याने पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वतींना पाहिले होते. मला वाटते त्यांच्या विवाहाच्यावेळी पू. स्वामींनी मंगलाष्टके करून दिली होती. अजूनही आमचे संबंध उत्तम आहेत. विशेष म्हणजे माझ्या बिकट परिस्थितीत माझे दोन्ही भाऊ आणि चि. सरला यांनी मला वेळोवेळी सहाय्य केले आहे आणि आमचे आईवडील गेल्यावर भावांनी आम्हाला इस्टेटीतून आपल्या बरोबरीने हिस्सा दिला, न मागतांही। ही भगवंताची कृपाच नाही का?

'मातृदेवो भव' – माझ्या आईचे माहेर मद्रासला होते. माझे आजोबा श्री. महादेव काशीनाथ दांडेकर हे ऑडिटर होते व तेथील कॉमर्स कॉलेजचे प्रिन्सिपॉलही होते. ते, मी ४–५ वर्षांची असतानाच गेले. त्यांना मुंबईला आणण्यात आले होते. ते मधुमेहाने आजारी होते. रॉयल ऑपेरा हाऊसच्या विरूद्ध बाजूस कुठली तरी जागा भाड्याने घेऊन तेथे सर्व आजोळची मंडळी राहात होती. माझा धाकटा मामा त्याला आम्ही राजामणी मामा म्हणत असे याची मुंज झालेली नव्हती; पण आपण आता जगत नाही हे कळल्यावर त्याला जवळ घेऊन आजोबांनी त्याच्या गळ्यांत जानवे घातले होते अशी अंधुक आठवण आहे. तसेच त्यावेळी अधिक रक्तदाबासाठी जळवा लावल्या जात असे आठवते. माझ्या सौ. आईची सख्खी मावशी कल्याणला श्री. पाटणकर यांच्याकडे दिलेली होती. त्यांचा 'राम–जानकी' असा बंगला होता. त्या मावशीला एक मुलगा व सून होती. त्यांचे एकत्र कुटुंब होते. सौ. आईबरोबर कधी सुट्टीत आम्ही ४/६ दिवस कल्याणला सौ. मावशींकडे राहायला जात असू. तसे सौ. आईचे सख्खे मामा ती. बाबा वर्तक यांचा खार येथे बंगला होता. तेथेही सुट्टीत राहावयास गेल्याचे आठवते. माझी आई चार भावांत एकटीच बहीण होती. यशवंत, गणपत, नारायण असे तीन मोठे भाऊ; त्यांच्यानंतर माझी आई. मला वाटते तिचे

नांव शशिकला होते. पण सर्व तिला बाळूताई म्हणत व नंतर सर्वांत धाकटा मामा. त्याचे नांव जगन्नाथ होते. पण त्याला सर्व राजामणी म्हणत. माझे वडील पांच भावात सर्वांत मोठे; म्हणून सर्व जावांत सौ. आई मोठ्या जाऊबाई म्हणून ओळखली जाई. घरांतील वडील माणसे तिला 'इंदू' म्हणत. कारण सासरचे नांव सौ. इंदिरा होते. तिच्या लग्नानंतर तिसऱ्याच दिवशी तिच्या सासुबाई वारल्या. त्यामुळे वाईट पायगुण म्हणून सासरी त्रास होईल कां असे माहेरच्या लोकांना वाटत होते. पण तसे काही झाले नाही. आजीला सुनमुख दिसावे म्हणूनच ती आजारी असतांनाच लग्न केले होते. आई अगदी शांत स्वभावाची आणि कष्टाळू होती. खरी पतिव्रता होती. तिने कधी कुणाला नांवे ठेवलेली, ती कधी कुणावर रागावलेली किंवा तिने कुणाला कधी उलट उत्तरे दिलेली मला अजिबात आठवत नाही. आम्हा भावंडाना तिने कधीही चापटही मारली नाही. माझे वडील व ती एकत्र कुटुंबात सर्वांच्यासाठी सतत झटत असत; पण कधी त्याचा उच्चारही त्यांनी केला नाही. ती मद्रासला शाळेत तामीळ शिकली होती. तिला तामीळ चांगले बोलता येत असे. मराठी वाचायला ती हळुहळू शिकली. पण तिला लिहितांना मी कधी पाहिले नाही. वर्तमानपत्र मात्र ती अगदी रोज वाचून काढी.

माझे लग्न मी पंधरा वर्षांची असताना झाले होते. माझी तिन्ही बाळंतपणे मुंबईला झाली. तेव्हा तिला किती कष्ट पडले असतील ते तीच जाणे! पण कधी चिडचिड नाही, राग नाही. अत्यंत प्रेमाने सर्वांची सेवा ती करीत असे.

तिच्या आयुष्यांत तिला कित्येक वर्षे दम्याचा त्रास सोसावा लागला. सन १९५२-५३ ची गोष्ट असेल. आम्ही इस्लामपूरला असतांना सौ. आई अत्यवस्थ असल्याची तार आली म्हणून फक्त चि. रमेशला घेवून हे व मी आमच्या घरच्या गाडीने मुंबईस गेलो. आम्ही जाईपर्यंत तिच्या तब्बेतीस जरा उतार पडला होता. मद्रासहून माझी आजीही आली होती. जरा बरे वाटल्यावर सौ. आईने तिचा पुढील अनुभव सांगितला. ती जेव्हा गंभीर आजारी होती. तेव्हा तिच्या खोलीच्या दाराशी तिला यमदूत उभे असलेले दिसत होते. त्यामुळे घाबरून ती म्हणायची की, 'कोण आहे तेथे दाराशी?'

ते यमदूत फक्त तिलाच दिसत होते. त्यामुळे इतरांना वाटे की हिला वात झाला आहे म्हणून ही वातात बडबडत आहे. हातपाय पण गार पडले होते. असे बराच वेळ चालू होते. नंतर ते दिसेनासे झाले व तिच्या जीवांत जीव आला व मग तिला हळुहळू बरे वाटले. १/२ दिवसांनी तिने पाहिले वर्तमानपत्रात देशमुख लेन मधील कुणी सौ. इंदिराबाई नांवाच्या बाईला त्यावेळी देवाज्ञा झाल्याचे वृत्त आले होते. ते ऐकून ती म्हणाली, 'ते यमदूत पहिल्याने चुकून माझ्याकडे आले असावेत.' आम्हांलाही फार आश्चर्य वाटले. असो.

नंतर माझ्या मामांनी पुण्याला डेक्कन जिमखान्यावर माझ्या ती. आजीसाठी बंगला बांधला. त्याचे नांव 'पोंगल' ठेवले होते. ती. आजीने प.पू. जिजीमहाराज उर्फ पू. भागिरथीबाई वैद्य, इंदौर यांच्याकडून अनुग्रह घेतला होता. पूर्वी ती मद्रासहून येऊन कधी कधी सत्संगासाठी 'बलभीम मंदिरा' त राहात असे. N. Dandekar खासदार हे माझे मामा होते. त्यांनी बंगला बांधल्यावर ती मद्रासला न राहातां पुण्याला राहू लागली. सौ. आईला मुंबईस दम्याचा फार त्रास होई. म्हणून तीही पुण्यास येऊन राहात असे आजीजवळ. तेथे एकदां ती झोपली असता तिला भगवान् श्रीकृष्णांचे स्वप्नात फार सुंदर व तेजस्वी दर्शन झाल्याचे तिने मला वर्णन करून सांगितले होते. अशी होती माझी आई, अत्यंत प्रेमळ, सात्त्विक! तिच्याकडून सर्वांत जास्त सेवा मी घेतली होती. १९६५ मध्ये माझे पती डॉ. बा. श्री. वैद्य आजारी असतांनाही माझ्या आईवडिलांनी जे कष्ट सोसले ते काय सांगावे? ते गेल्यावर दोन दिवसांनी ती माझ्याजवळ बसली आणि म्हणाली, 'कमा . मी तुला एक विनंती करते, माझे ऐकशील?' मी म्हटले, 'सांग ना' ती म्हणाली, 'तुझे पांढरे कपाळ पाहिले की माझ्या पोटात भडभडून येते. माझ्यासाठी तू हे काळे गंध (टिकली) लावशील कां?' असे म्हणून तिने गंधाची बाटली माझ्यासमोर धरली! आता यावर काय बोलणार? तिचे शब्द हृदयाला जाऊन भिडले आणि तेव्हापासून तिची इच्छा म्हणून मी कधी पांढऱ्या कपाळाने वावरत नाही. माझ्या सद्गुरूना कदाचित् हे आवडले नसते तरीही मी तिला दिलेला शब्द पाळते आहे.

***

**'पितृदेवो भव'**

माझ्या वडिलांचे नाव डॉ. पुरूषोत्तम नारायण वैद्य. त्यांचे वडील रावबहादूर श्री. नारायण त्र्यंबक वैद्य, मुंबईतील अत्यंत प्रतिष्ठित नागरिक होते. ठाकुरद्वारजवळ वैद्यवाडी म्हणून बरीच जागा त्यांच्या कुटुंबाच्या मालकीची होती. माझे पणजोबा श्री. त्र्यंबक केशव वैद्य हे शतायुषी होती व त्यांनी आयुष्याच्या अखेरीस संन्यास ग्रहण केला होता. त्यांचे नाव स्वामी ब्रह्मानंद असे असून त्यांची समाधि नारंगी (अलिबाग-रेवसजवळ) येथे आहे. श्री. नारायण त्र्यंबक वैद्य यांचे ज्येष्ठ पुत्र श्री. बाबाराव हे बाबाराव सावरकर यांचे मित्र होते व ते वैद्यकीय शिक्षण घेत असतांनाच त्यांना देवाज्ञा झाली. अशी ऐकीव माहिती आहे. मला आणखी चार चुलते व सहा आत्या होत्या. माझे चुलत आजोबा श्री. गणेश त्र्यंबक वैद्य हे वैद्य होते. त्यांना मुलबाळ नव्हते. ते व इतर सर्वच एकत्र कुटुंबातच राहात असत. माझे वडील ग्रँट मेडिकल कॉलेजमधून M.B.B.S. झालेले होते. पण त्यांना वाङ्.मयाची खूप गोडी होती. त्या सर्व भावात पांडवांसारखे बंधुप्रेम होते. माझ्या वडिलांना विशेषत: श्री शंकराचार्यांच्या संस्कृत स्तोत्रांची आवड होती. त्यांनी लहानपणी रामरक्षा, अच्युताष्टक व इतरही बरेच पाठांतर करून घेतले होते. मी रामरक्षा कधी शिकले हेही मला आठवत नाही. इतक्या लहानपणी ती मुखोद्गत झाली होती. शिवाय पूर्वीच्या काळी रोज संध्याकाळी हातपाय धुऊन वडील माणसांना नमस्कार करून शुभं करोति इतर अनेक श्लोक व उजळणी पाढे रोजच्या रोज म्हणण्याची पद्धत होती. त्यामुळे गणित विषय खरोखर खूप सोपा वाटे. सर्व घराला त्यांचा धाक असे. नुसते त्यांना नांव सांगू कां असे म्हटले तरी पुरेसे असे. लहानपणी आम्हाला जवळ बसवून ते म्हणाले होते, 'तुम्ही माझा वा तुमच्या आईचा अपमान केलात तरी एकवेळी मी सहन करीन पण माझे भाऊ, भावजयांचा तुम्ही कधीही अपमान करता कामा नये.' इतक्या गंभीरपणे त्यांनी हे शब्द उच्चारले होते की अंत:करणात कोरले गेले होते. एकत्र कुटुंबात खरोखर प्रेम नांदत असेल तर जो आनंद असतो तो अवर्णनीय असतो. हा सख्खा, हा चुलत असे काही मनातही येत नाही. आपपर भावच शिल्लक राहात नाही. नवीन पिढीतील भावंडात मी सगळ्यात

वडील, त्यामुळे घरांत खरोखरच माझे इतके लाड झाले! सर्वांचे माझ्यावर अत्यंत प्रेम असे. त्यामुळे मी माझ्या चुलत्यांच्या बरोबर त्यांच्या माहेरी जाऊन राही तर आत्याबरोबर तिच्या सासरी जाऊन राही. म्युनिसिपालटीच्या शाळेतच मराठी चौथीपर्यंतचे शिक्षण झाले. त्यावेळी गिरगावांत आम्ही सदाशिव गल्लीत नेने बिल्डींग मध्ये पहिल्या मजल्यावर राहात होतो व पाचदेवळाची वाडी म्हणून जो भाग होता तेथे आमची मराठी शाळा होती. नेने बिल्डींगमध्ये दुसऱ्या मजल्यावर श्री. गाडगीळ यांचे बिऱ्हाड होते. त्यांतील चुलत बहिणी सखू व लीला माझ्या मैत्रिणी होत्या. सखूचा मोठा भाऊ म्हणजेच प्रसिद्ध लेखक श्री. गंगाधर गाडगीळ. मी १९८५ मध्ये एकदा नायगांव येथील मराठी ग्रंथसंग्रहालयात काही संदर्भ ग्रंथ पहावयास गेले असता त्याचे त्यादिवशी तेथे व्याख्यान होते म्हणून तो आला होता हे कळले तेव्हा मुद्दाम त्याला जाऊन भेटले होते. लहानपणी त्याला आम्ही सर्वच ‘दादा’ म्हणत असू. मध्ये जवळजवळ चाळीस वर्षे गेली होती. त्यामुळे ओळख पटणे कठीणच होते. पण वैद्यांची कमल म्हटल्यावर त्याने ओळखले. श्री. नेने घरमालक यांच्या मुलीही कमल, कुसूम आमच्या मैत्रिणी होत्या.

चौथीनंतर भुलेश्वर येथील ‘चंदारामजी हिंदु गर्ल्स हायस्कूल’या इंग्लिश माध्यमाच्या शाळेत मी जाऊ लागले. इंग्रजी माध्यम असले तरी मला मराठी वाङ्.मयाची – साहित्याची खूप आवड होती. ग्रंथालयातून पुस्तके आणून मी त्याकाळच्या सर्व प्रसिद्ध कादंबरीकारांच्या कादंबऱ्या, कथासंग्रह वगैरे वाचून काढले होते. हरी नारायण आपटे, नाथ माधव, फ डके, खांडेकर, अत्रे, शिवाय नारायण हरी आपटे वगैरेंची नावे आठवतात. माझे वडील डॉक्टर होते. त्यामुळे रविवारी त्यांना सुट्टी असे. त्यादिवशी दुपारी ते 'नवनीत' म्हणून जो संत-पंत कवींच्या काव्यांतील निवडक उताऱ्यांचा संग्रह आहे त्यातील काव्ये वाचून अर्थासह फार सुंदर रीतीने समजावून देत. त्यामुळे संत वाङ्.मयाची गोडी त्या वयातच लागली. याचा पुढील आयुष्यावर फार परिणाम झाला. त्यावेळी आम्ही सिक्कानगर या वसाहतीत ‘गेस्ट हाऊस’ म्हणून मागील बाजूस एक इमारत होती तेथे राहात होतो. तो भाग आंग्रेवाडीला लागून होता व माझ्या बऱ्याच मैत्रिणी आंग्रेवाडीत

होत्या. नेने बिल्डींग व सिक्कानगर येथून फडकेवाडीतील प्रसिद्ध गणपती मंदिर अगदी जवळ होते. त्यामुळे तेथे बऱ्याच वेळेस कीर्तने, मेळे वगैरेंचेही श्रवण घडे. त्यामुळेही संत वाङ्‌मयाची गोडी लागली. पांचदेवळाची वाडी, ब्राह्मणसभा येथील प्रवचने, व्याख्याने, गाण्याचे कार्यक्रम यांचा लाभ घेता येत असे. माझ्या वडिलांचे मित्र डॉ. राम जोशी, उंबरगाव हे श्री साने गुरूजींचे मित्र होते. म्हणून स्वातंत्र्य चळवळीच्या काळात श्री. साने गुरूजी भूमीगत होते तेव्हा एक रात्र मुक्कामाला आमच्या घरी आले होते. त्यावेळी आम्ही सरदार पटेल रोडवरील विठ्ठल मॅन्शन ह्या डॉ. पुरंदरे यांच्या मालकीच्या घरात तिसऱ्या मजल्यावर भाड्याने राहात होतो. त्यावेळी श्री. साने गुरूजींच्या 'श्यामची आई' 'गोड गोष्टी' वगैरे वाचून आम्ही भारावून गेलो होतो. त्यावेळी त्यांना आम्ही मगोष्ट सांगा' म्हणून विनंती केली होती. तेव्हा त्यांनी जी गोष्ट सांगितली होती त्यावरून पुढे ममोलकरीण' हा सिनेमा निघाला होता. वडिलांचा स्वभावही अत्यंत परोपकारी होता. अशावेळी ते स्वत:चा विचार अजिबात करीत नसत. आमची सौ. आई तर त्यांना कित्येकदां 'तुकाराम' आहेत असे म्हणत असे. श्री. विनोबा भावे व श्री. केदारनाथजी यांच्यावर त्यांची फार श्रद्धा होती. ते आम्हांला एकदा श्री. केदारनाथजींच्या दर्शनास घेऊन गेले होते. माझा धाकटा भाऊ चि. अरविंद यांच्या लग्नाच्या दिवशी त्यांनी येऊन थोडे भाषणही केले होते.

माझ्या पतींच्या निधनानंतर मी त्यांची जपाची माळ त्यांना (माझ्या वडिलांना)दिली होती. त्यांच्या शेवटच्या आजारांत ते हॉस्पिटलमध्ये अत्यवस्थ असतां मी त्यांना भेटावयास गेले होते. तेव्हा ते कधी कुणाला ओळखतात तर कधी ओळखतही नाहीत असे मला कळले होते. म्हणून मी गेल्यावर विचारले की, 'मला ओळखलेत कां?' तेव्हा त्यांनी त्यांच्या परिचारकास हातांनी खूण करून जपाची माळ मागून घेतली. त्यावरून मला कळले की त्यांनी मला ओळखले आहे आणि त्यांनी मोठमोठ्याने जो रामनाम घेण्याचा सपाटा लावला की ते दूरपर्यंत ऐकू येऊ लागले. माझी आत्या तेवढ्यात त्यांना पाहायला आली तेव्हा ते ऐकून ती अगदी थक्क होऊन गेली.

माझा शाळेत नेहमी प्रथम क्रमांक असे. माझा वार्षिक परीक्षेचा रिझल्ट

असेल तेव्हा कै. ती. काकासाहेब (माझे आजोबा) मी रिझल्ट दाखवायला गेले की नेहमी एका बॉक्समध्ये त्यांनी सुकामेवा भरून ठेवला असे, ती बॉक्स मला बक्षीस म्हणून देत व कौतुक करीत. पण ती. अण्णासाहेबांना रिझल्ट दाखवला की ते नेहमी ठीक आहे असे म्हणत. एकदा मी धाडस करून त्यांना स्पष्टच विचारले की, तुम्ही कधीच मला छान, उत्तम म्हणून शाबासकी देत नाही असे कां? त्यावर त्यांनी मला वसिष्ठ, विश्वामित्रांची गोष्ट सांगितली होती. विश्वामित्रांनी खूप तप केले तेव्हा त्यांना 'ब्रह्मर्षि' म्हणून सर्वांनी संबोधले. पण वसिष्ठांनी 'ब्रह्मर्षि' म्हटले नाही यामुळे त्यांना खूप राग आला व त्यांनी वसिष्ठांना मारायचे ठरवले व ते त्यांच्या पर्णकुटीजवळ लपून बसले. त्यावेळी रात्री पिठूर चांदणे पडले होते व वसिष्ठ व अरूंधती अंगणात गप्पा मारीत बसली होती. तेव्हा सौ. अरूंधती म्हणाली, 'काय सुरेख चांदणे पडले आहे!' तेव्हा वसिष्ठ म्हणाले की, 'अगदी विश्वामित्राच्या तपासारखे सुरेख चांदणे पडले आहे!' विश्वामित्रांच्या कानी हा संवाद पडल्यावर त्यांना आश्चर्य वाटले आणि आनंदही झाला व आपण ह्यांना मारायला आलो होतो याचा पश्चाताप होऊन ते अत्यंत लज्जित झाले व धावत जाऊन त्यांनी वसिष्ठांच्या पायावर लोळण घेतली. तेव्हा वसिष्ठ म्हणाले, 'उठा! ब्रह्मर्षि!' मग ते म्हणाले की, कुणाचीही तोंडवर स्तुती करू नये. त्यायोगे त्याला गर्व, अहंकार होण्याची शक्यता असते. त्यांनी सांगितलेली ही गोष्ट अद्याप माझ्या स्मरणांत आहे.

***

माझ्या वडिलांना त्यांच्याहून मोठ्या तीन सावत्र बहिणी होत्या. एक तारापूरच्या श्री. गद्रे यांच्याकडे, दुसरी धुळ्याचे श्री. गद्रे यांच्याकडे दिलेली होती. तिसरी आंग्रे यांच्या सरदार बिवलकर यांच्याकडे दिलेली होती. तिला सर्व धाकटी ताई म्हणत. तिचे यजमान श्री. रावसाहेब बिवलकर हे वारल्यानंतर ती माहेरीच राहात असे. मोठ्या दोन्ही आत्यांना मुलेबाळे होती. पण ह्या आत्याला मुलबाळ नव्हते. म्हणून मलाच लहानपणापासून तिला 'आई' म्हणायला शिकवले होते. व घरांत माझ्या नंतरची सर्व भावंडे तिला 'ताईची आई' म्हणत. मी माझ्या आईला माझ्या काकांचे आणि

आत्यांचे एकूण बरेच वर्षे 'वहिनी' च म्हणत असे. त्या आत्याचे देव तिच्या बरोबर असत आणि ती सरदार घराण्यांत पडली होती म्हणून की काय खास तिच्यासाठी एक सेविका ठेवलेली असे. आत्या (आई) माझे खूप लाड करीत असे. मी तिच्याच जवळ झोपत असे. त्यामुळे जेव्हा मला पहाटे जाग येई तेव्हा तिच्या तोंडून, 'उठा उठा हो सकळीक । वाचे स्मरावा गजमुख । ऋद्धिसिद्धीचा नायक। सुखदायक सकळासी ।' ऐकत ऐकत मी जागी होत असे आणि शेजारी त्या भूपाळ्या ऐकतच परत मी झोपी जाई. पुढे श्रीसद्गुरू कृपेने माझ्या हातून अनेक भूपाळ्या व काकड आरत्या झाल्या. त्यामुळे तिची ती आठवण माझ्या मनांत नेहमी रेंगाळते.

***

## माझी आजी

माझ्या आजीचे माहेरचे नाव 'सई' होते व सासरचे 'उमा' होते. ती पण माझ्या आईप्रमाणे अत्यंत शांत व परोपकारी स्वभावाची होती. तिला मी कधी रागावताना पाहिलेले नाही. तिने सासर व माहेर कडील सर्वांना आपलेसे केले होते. त्यामुळे मद्राससारख्या लांब ठिकाणी असूनही आमच्या आजोळी सतत पाहुण्यांची वर्दळ असे. अगदी म्हातारपणापर्यंत ती जेव्हा स्नान करून येई त्यावेळी आपले स्वत:चे कपडे धुऊन हातांत पिळे धेऊनच स्नानगृहातून बाहेर पडे. घरात कितीही नोकरचाकर असले तरी तिचे स्वावलंबन लक्षणीय असे. तिने पू. जिजी महाराज यांचा अनुग्रह घेतलेला होता व त्यांच्या संप्रदायात शुद्ध तत्त्वज्ञान व दासबोध तसेच पू. हंसराजांचा 'वेदेश्वरी' हा ग्रंथ याला फार महत्त्व होते. हे अध्यात्म तिच्या आचरणात उतरलेले होते. तिच्या तोंडून मी कधीही 'परदोष चर्चा' ऐकली नाही. तसेच नित्य उपासनेतही कधी खंड पडत नसे. माझ्या मामांनी तिच्यासाठी पुण्यातील डेक्कन जिमखाना भागांत बलभीम मंदिराच्या जवळच 'पोंगल' नावाचा बंगला बांधला होता. तेथे तिच्या खोलीत फरशा न बसवतां मुद्दाम मातीची जमीन केली होती. त्या खोलीतच तिची नित्य उपासना चाले. बलभीम मंदिर चालत जाण्याच्या अंतरावर होते व तिच्या गुरूबंधू भगिनींचेही 'पोंगल' वर येणेजाणे असे. त्यांत एक अंध गुरूबंधू

मला वाटते, 'श्री बन्सी' नावाचे अध्यात्मांत थोर अधिकारी होते ते बरेच वेळ येत असत. आम्ही दोघे आमच्या लग्नानंतर पुण्यास गेलो असतां बलभीम मंदिरात ती. आजीला भेटावयास गेलो होतो. तेव्हा ती सत्संगासाठी मद्रासहून येऊन तेथे राहिलेली होती व प.पू. जिजिमहाराज यांचे संध्याकाळी प्रवचन चालू होते. ते संपल्यानंतर तिने त्यांना आमची ओळख करून दिली. त्यावेळी फक्त एकदाच त्यांचे प्रत्यक्ष दर्शन झाले. त्या गोऱ्यापान, जरा स्थूल पण अत्यंत तेजस्वी होत्या. अजूनही त्यांचे ते रूप नजरेसमोर येते. संतांच्या दर्शनाचे महत्त्व त्यावेळी तितके कळत नव्हते. पण आता त्याचे महत्त्व चांगले जाणवते.

मी इस्लामपूरला आमच्या घरीच १९५३ पासून १९६५ पर्यंत रोज दुपारी ३.०० ते ५.०० 'श्रीरामचरितमानस' वर (तुलसी रामायणावर) प्रवचन करीत असे. १९६५ मध्ये ह्यांना देवाज्ञा झाल्यानंतर ऑगस्टमध्ये चि. सौ. रविच्या ऑपरेशनसाठी जेव्हा मी पुण्यात पोंगलवर होते तेव्हा एक दिवस तिने मला प्रवचन करण्यास सांगितले. तेव्हा माझी सौ. आई, वडील व आजी या तिघांसाठी मी 'जणु जीव उरि चारि अवस्था विभुन्हसह बिराजहि' या दोह्यावर प्रवचन केले होते. त्यात सर्व वेदांतच भरलेला आहे. त्यामुळे त्या तिघांना ते अत्यंत आवडले! माझ्या दृष्टीने हा फार अपूर्व योग होता. तिच्या खूप मधुर आठवणी आहेत. माझ्या एका मामेभावाच्या मुलीचे नांव त्याने 'सई' ठेवले आहे तर दुसऱ्याने त्याच्या मुलीचे नांव 'उमा' ठेवले आहे. यावरून नातवंडांना तिच्याविषयी किती आत्मीयता होती हे कळून येते. तिने माझी नातवंडे म्हणजे तिची खापर पतवंडेही पाहिली होती.

***

## आमचे एकत्र कुटुंब

मला चार चुलते होते. त्या सर्वांचेच माझ्यावर खूप प्रेम होते. सर्व भावात माझे वडील मोठे होते. त्यांना सर्व 'अण्णा' किंवा 'अण्णासाहेब' म्हणत. त्यांच्या नंतरच्या भावाचे नांव मगोविंद' होते. त्यांना सर्व मतात्या' किंवा मतात्यासाहेब' म्हणत. ते गोरेपान, जरा ठेंगणे, स्थूल पण अत्यंत शांत स्वभावाचे होते. ते फक्त मॅट्रीक पर्यंत शिकलेले होते व लगेच त्यांना

रिझर्व्ह बँकेत नोकरी लागली होती. त्यांच्या पत्नीचे नाव 'राधा' होते. पण आम्ही तिला ममोठी काकू' म्हणतअसू. ती फार प्रेमळ, साधीभोळी होती. पण ती काव्य चांगले करीत असे, असे मला आठवते. तिची मुले १/२ आडवी आल्याने व त्यावेळी सिझेरियन नसल्याने अक्षरश: मुले कापून काढावी लागली. त्यावेळी आम्हांला ऐकून फार वाईट वाटे. पण त्यांची मुले जगली नाहीत तरी त्यांनी कधीही कोणाचा राग केला नाही. उलट माझे आणि बाळचे ते खूप लाड करीत. आम्हांला चौपाटी, मलबार हिलवर फि रायला नेत. तेथे गंडेरी, भेळ, शेंगदाणे वगैरे खाऊ घालत. तसेच काकूची बहीण जिजीमावशी वाटवे (जमखिंडी) व भाऊ आबामामा जोशी आमचे लाड करीत. येतांना आमच्यासाठी खाऊ, गोष्टीची पुस्तके घेऊन येत. नंतरच्या त्यांच्या तीन मुली जगल्या.

त्यानंतरचे काका म्हणजे श्री. गोपाळराव उर्फ मनानासाहेब' हे खूप हुशार होते. त्यांना M.A. मध्ये 'झाला वेदांत प्राईस' व गोल्ड मेडल मिळाले होते. त्यांना वाचनाची खूप आवड होती. त्यांची प्रथम पत्नी, तिचे माहेर पार्ल्याला होते. श्री. दाते यांच्याकडे मी तिच्याबरोबर तिच्या माहेरी जावून राहात असे. त्यामुळे ती. आजी, श्री. अच्युतमामा, सौ. मामी तसेच बबलमामा व बेबीमावशी माझे खूप लाड करीत असत. पार्ल्याला त्यांचा बंगला होता. एकदा मी तेथे असतांना माझे डोळे आले होते तेव्हा सौ. लीलाकाकूंने तिच्या अंगावरील दूध वाटीत काढून त्याच्या घड्या माझ्या डोळ्यावर ठेवल्या होत्या ते मला अजून आठवते. त्यावेळी ती. नानासाहेब 'रतलाम' येथे मिलमध्ये कामावर होते. चि. मधुभैय्याला लहान घेऊन सौ. लीलाकाकू 'रतलाम' येथे गेली होती. नंतर मलाही तिने तिकडे नेले होते. तेथे मला भातुकली खेळायला ती खवा, दुध्या हलवा वगैरे देत असे. खूप लाड करी. तेथे त्यावेळी श्री.काकुबाई म्हणून होते त्यांच्या घरी नवरात्रात मी गरबा खेळायला गेल्याचे व त्यांची मुलगी सविता हिच्याशी मैत्री झाल्याचे आठवते. ति. नानासाहेब मला गोष्टीची पुस्तके आणून देत त्यातील रोज एक गोष्ट वाचून मला तिचा सारांश सांगावा किंवा लिहावा लागे. एकदा खेळण्याच्या नादात मी विसरले. त्यामुळे त्यांनी मला एक चापट मारली होती.

तेव्हा सौ. काकूला खूप वाईट वाटले. पण त्यावेळपासून नियमित अभ्यासाची इतकी सवय लागली की, ती आयुष्यभर सुटली नाही आणि त्यामुळे वर्गात पहिला, दुसरा नंबर कधी सुटला नाही. चि. मधुभैय्या लहान असतानाच ती देवाघरी गेली. नंतर सौ. तारा काकू आली. तिचे माहेर रावबहादूर गोडबोले, पुणे यांच्याकडे होते. मी तिच्याही माहेरी जाई. त्यामुळे ती, ती. बाबूमामा, परसुमामा, वामनमामा सर्व माझे लाड करीत. ही सौ. काकू सर्वांत जास्त शिकलेली होती. ती. नानासाहेबांच्या प्रमाणेच तिलाही वाचनाची खूप आवड होती. तसेच ती अत्यंत सुगरणही होती. ती. नानासाहेब व सौ. काकूही माझे खूप लाड करीत. ते रूबी मिलमध्ये राहात असताना मला वाटते त्यांच्या खालच्या मजल्यावर श्री. काकूभाई राहावयास आले होते. तेव्हा खूप वर्षांनी त्यांची गाठ पडली. रूबी मिलमध्ये राहावयास गेलो की 'प्लाझा' जवळ असल्याने सिनेमाला जाणे होई. तेथे पुस्तके, चॉकलेटस्, गोळ्या आणि सौ. काकूने केलेले स्वादिष्ट पदार्थ यांची लयलूट असे. मला वाचनाची आवड खूप आणि इस्लामपूर अगदी खेडे म्हणून ती. नानासाहेबांनी लग्नात मला श्री. वि. स. खांडेकरांच्या १२ कादंबऱ्यांचा सेट भेट म्हणून दिला होता. तसेच थंडीची सवय मुंबईत नाही म्हणून रजईही भेट दिली होती. तेव्हापासून रजई पांघरायचीच सवय झाली आहे, ती अद्याप आहे. माझी मंगळागौरही सौ.काकूने रूबी मिलच्या जागेत थाटात केली होती. त्या दोघांनी व त्यांच्या मुलांनीही माझ्यावर उदंड प्रेम केले. मी Ph.D. झाल्यावर मुद्दाम ती. नानासाहेबांनी स्वहस्ते पत्र लिहून त्यांचा आनंद व्यक्त केला होता. सौ. काकूने तर माझ्यावर सुंदर काव्यही केले. चि. मधुभैय्या व सौ. मंजिरी वहिनी, चि. रमेश फर्ग्युसनच्या हॉस्टेलवर असताना त्याला प्रेमाने फराळाचा डबा देत. सौ. वहिनी इस्लामपूरलाही येऊन गेली होती. अद्यापही ती फार प्रेम करते. चि. सौ. सुधा व पुष्पाही फार प्रेम करतात. पुष्पा बंगलोरला होती. तेव्हा मुंबईहून तिकडे जाताना मुद्दाम मिरजेला कळवित असे त्यामुळे आम्ही मिरज स्टेशनवर तिला भेटत असू. आम्ही बेळगांवला असतानाही ती बसने जाताना बेळगांवला बस 'मिलन' हॉटेलशी थांबली की, रिक्षा करून आमच्या घरी येऊन तेवढ्या वेळात भेटून जाई. प्रिय सुरेशबद्दल तर काय आणि किती लिहिणार?

तो गोकाक मिलमध्ये कामाला येई तेव्हा आम्ही बेळगांवला होतो. विमानाने सांबरा येथे विमानतळावर त्याला न्यायला आणायचा गाडी येई तेव्हा केव्हाना केव्हा तो आमच्या घरी भेटल्याशिवाय परत जात नसे. चि.रमेशचे स्लिप डिस्कचे ऑपरेशन झाले तेव्हा तो 'प्रभुकुंज' (लता मंगेशकरांचे घराच्या) समोर राहात होता. तेव्हा आम्ही त्याच्याकडेच उतरलो होतो. तेव्हा ती. नानासाहेब व सौ. काकूही तेथेच होती. सौ. सुचेता रोज सौ. सुरेखा J.J. वर जाई तेव्हा तिला डबा देत असे. आम्ही जायला निघालो तेव्हाही सौ. काकूने माहेरपणाची साडी व इतर वस्तू भेट देऊन आपले प्रेम व्यक्त केले. प्रिय सुरेशला खास स्थान आहे

माझ्या जीवनात! कारण त्याची परमार्थाची आवड, जी जास्त कुणालाच माहित नाही! चि.मंगल व चि.पुष्पामध्ये फक्त १५ दिवसांचा फरक आहे. पुष्पाचा जन्म १३ मार्च १९४४ चा व मंगलचा २८ मार्च १९४४ चा. माझे लग्न १५ व्या वर्षीच झाले त्यामुळे मावशी (पुष्पा) व भाची (मंगल) समवयस्क आहेत. असो.

***

**भाऊसाहेब व पद्माकाकू**

भाऊसाहेबही माझे फार लाड करीत. मला आवडायची म्हणून ते फळे Peach वगैरे तसेच माहिमी हलवा वगैरे आणत. ति. नानासाहेब व आबासाहेब दादर जिमखान्याचे मेंबर असल्यामुळे ब्रेबॉर्न स्टेडिअमवर क्रिकेटचे सामने होत तेव्हा त्यांना पास मिळत त्यामुळे लहानपणी चि. बाळने व मी खूप क्रिकेट सामने पाहिले आहेत. श्री.देवधर, विजय मर्चंट, विजय हजारे, विनू मंकड, सी. के. व सी. एस्. नायडू व वजीर अली, नाझीर अली यांना खेळताना पाहिले आहे. शिवाय सामने पाहताना तात्यासाहेब, आबासाहेब, भाऊसाहेब, नानासाहेब जे कोणी बरोबर असे त्यांनी मागविलेले सामोसे, आईस्क्रिम वगैरे सारखे चरणे सुरू असे. ती. भाऊसाहेब बरोबर असले की ते मॉनजिनीत जेवायला नेत असत. तसेच घरांतील कुणीही सिनेमाला जाणार असले की तिकिटे काढायचे काम माझ्यावर असे. बायकांची, पुरूषांची रांग वेगवेगळी असे. बायकांना लवकर तिकिटे मिळत. त्यामुळे

कुणीही सिनेमाला निघाले की, 'कमा' हा कॉमन फॅक्टर असायचा. सौ. काकू ही लाड करी. तिच्या बरोबर मी आमच्या लग्नाआधीच चि. दत्ता भाऊजींच्या मुंजीसाठी इस्लामपूरला गेले होते. सौ. काकूला 'वसंता' म्हणून मुलगा झाला होता. तेव्हा आम्ही नेने बिल्डींगमध्ये होतो तो देवाघरी गेला तेव्हा मी ही फूड पॉयझनिंगमुळे खूप आजारी होते. त्यानंतरही तिचा १/२ वेळा गर्भपात झाला. तिला मूल नव्हते त्यामुळे ती.आक्कामावशी, ती.कुसूममावशी माझे व बाळचेच लाड करीत. गोगटे मंडळी मुंबईत आली की कुसूमावशीकडे किंवा आमच्याकडे राहात तेव्हा इंदु, राम, माधव, वसंता, श्रीकांत यांच्या बरोबर बाळ व मीच खेळत असू. एकत्र राहात असू. तेव्ही ठिकरी पत्ते वगैरे धमाल चाले म्हणूनच बाळ व मी इस्लामपूरला गेलो होतो. खूप मजा आली होती. त्यावेळी मी ह्यांनाही 'बाळमामा' किंवा नुसते 'मामा' म्हणत असे. त्यावेळी हेच आपले पति होणार आहेत याची काही कल्पनाही नव्हती.

मी तेव्हा पंधरा वर्षाची होते व चंदरामजी हिंदू गर्लस् हायस्कूलमध्ये १० वीत शिकत होते. माझ्या लग्नासंबंधी विचार चालू आहे याची मला काहीच कल्पना नव्हती. दिवाळीच्या सुट्टीत मला सातारला ह्यांच्या सौ. आत्याबाई (सहस्त्रबुद्धे भीमाताई) यांच्याकडे दाखविण्यासाठी नेण्यात आले. त्यावेळी माझ्याकडून काही मजकूर वाचून घेण्यात आला व तो औपचारिक सोहळा माझ्या हाती साखरेचा पुडा देऊन पार पडला. तसे तर मला लहानपणापासून सर्वांनी पाहिलेलेच होते.

मला लहानपणी दागिन्यांची फार हौस होती हे पाहून ती. भाऊसाहेब म्हणाले होते की, मी जर नाक टोचून घेतले तर ते मला नथ घेऊन देतील. म्हणून मी ति. आण्णासाहेबांच्याकडून नाक टोचून घेतले होते आणि भाऊसाहेबांनी मला ११/१२ व्या वर्षीच नथ आणून दिली होती.

मी इस्लामपूरलाही राहून आले होते शिवाय आम्ही (बाळ व मी) सौ. पद्माकाकू लोणावळा येथे वैद्यांच्या बंगल्यात मे महिन्यात (१९४२ च्याच) हवा पालटण्यासाठी गेली होती. तेव्हा तिच्या बरोबर तेथे राहिलो होतो त्यावेळी पुण्याहून तिला भेटण्यासाठी सौ. आऊताई चि. सुरेशला (वय वर्ष १) घेऊन आल्या होत्या. तेव्हाही त्यांनी मला पाहिले होते. असो. सातारहून

आल्यावर माझे लग्न ठरून दत्त जयंतीस ते २२ डिसेंबरला होणार असल्याचे घरात जाहीर झाले. त्यानंतर मी शाळेत जात नव्हते. घरातच काही गोष्टी करायला शिकत होते. तेव्हा मला नंतर कळले की माझे टीचर ती.आण्णासाहेबांना दवाखान्यातू भेटून त्यांनी इतक्या लवकर लग्न कां करता, ती आमची हुशार विद्यार्थिनी आहे, मॅट्रिकला नांव मिळवील असे सांगितले होते. पण हे डॉक्टर होते व नात्यांतील चांगले स्थळ म्हणून हा निर्णय घेतल्याचे त्यांना सांगण्यात आले. मलाही त्यावेळी वाईट वाटले नव्हते. कारण मी इस्लामपूरला राहून आले होते व सर्वांना ओळखत होते. ह्यांच्यात तर नांव ठेवायला जागाच नव्हती. असो. ठरल्याप्रमाणे थाटांत लग्न पार पडले. नंतर ४/८ दिवस मुंबईत राहून हे व मी सौ.कुसूम मावशीबरोबर इस्लामपूरला गेलो. तिलाही तिच्या लग्नानंतर १२ वर्षे मूलबाळ नव्हते. माझे लग्न झाल्यावर सौ. पद्माकाकूला १९४३ (सन) मध्ये मुलगा झाला. ति. काका (इस्लामपूरचे) त्याच्या बारशाला हजर होते व त्यांच्या सांगण्यावरून त्याचे नांव 'अविनाश' ठेवले. त्यानंतर १९४३ मध्येच नोव्हेंबरमध्ये सौ. कुसूममावशीला मुलगी (प्रथम अपत्य) झाली तिचे नांव 'प्रेमा' ठेवले. तिच्या बारशाला सौ. आऊताई (सुधा, सुरेशला) घेऊन ति. काकांबरोबर गेल्या होत्या व मुंबईला काही दिवस राहिल्या होत्या. मला २८ मार्च १९४४ ला चि. मंगल झाली. सौ. कुसूम मावशीचे व नंतर माझे डोहाळजेवण इस्लामपूर व कऱ्हाडला थाटात झाले होते. असो.

***

## आबासाहेब व सौ. सुशिलाकाकू

आबासाहेब यांचे नांव विठ्ठल नारायण वैद्य. तो सर्वात धाकटा चुलता. त्याचा जन्म त्याचे वडिलांना देवाज्ञा झाल्यावर झाला होता. तो माझ्यापेक्षा फक्त आठ वर्षाने मोठा होता. म्हणजे वयाने ह्यांच्या बरोबरीचा होता. हे शिकायला मुंबईतच ग्रँट मेडिकल कॉलेजला होते. त्यामुळे त्याची व ह्यांची आमच्या लग्नाआधीच चांगली मैत्री होती. ति. आबांचे लग्न १९४२ मध्येच फेब्रुवारीत झाले होते. सौ. सुशिलाकाकू माझ्यापेक्षा थोडीशीच मोठी होती. माझ्या सौ. आईचे आबा साहेबांवर पुत्रवत प्रेम होते. त्यांचे लग्नानंतर काही

महिने त्याला हैद्राबादला नोकरी लागली होती. तेव्हा त्यांचे बिऱ्हाड मांडून देण्यासाठी सौ. आई त्यांच्याबरोबर गेली होती. सौ. सुशिला काकूचे मोठे भाऊ डॉ. वेलणकर हे नावाजलेले नेत्ररोग तज्ज्ञ होते व देशमुख लेनमध्ये राहात असत. आमचे लग्न झाल्यावर आबासाहेब, सौ. काकू व आम्ही दोघे असे एक-दोनदा फिरावयास गेल्याचे आठवते. सौ. काकू अगदी साधी, सुशील, कामसू आणि प्रेमळ होती. तिचे माझे छान जमे. तिला प्रथम मुलगी झाली (प्रभा). नंतर मुलगा झाला पण या बाळंतपणानंतर तिला लगेच एकाएकी देवाज्ञा झाली. मी त्यावेळी सासरी इस्लामपूर येथे होते. चि. मकरंदचा सांभाळ माझी सौ. आई व कुसूमने केला. तो ८/१० दिवसाचाच होता. त्याच दिवशी सौ. पद्माकाकू प्रसूत होऊन तिला मुलगी झाली (चि.सुहास). घरांत एकाचवेळी मृत्यु आणि जन्म अशी विलक्षण अवस्था झाली!

मी जेव्हा मुंबईहून लहान मुलांना घेऊन इस्लामपूरला जाई तेव्हा नेहमी आबासाहेबच मला पोहचवायला येत असत. नंतर श्री. केळकरांची मुलगी सौ. सुमति हिच्याशी आबासाहेबांचा द्रितीय विवाह झाला. ती पण प्रेमळ व सुशील होती. पण तिचा सहवास मला जास्त लाभला नाही. तिला विलास व शालन ही दोन मुले झाली. पण ती प्रभा व मकरंदाचेही सर्व प्रेमाने करी.

***

## गोदुआत्या

नमुआत्या श्री. परांजपे यांच्याकडे दिली होती. श्री. दाजीसाहेब परांजपे हे ह्यांचे सख्खे आतेभाऊ होते. त्यामुळे एकीकडे ती माझी आत्या आणि एकीकडे आतेजाऊ असे आमचे दुहेरी नाते होते. श्री. दाजीसाहेब व सौ. नमुआत्या यांचेही माझ्यावर व ह्यांच्यावर खूप प्रेम होते पण प्रत्यक्ष सहवास फारसा लाभला नाही. त्या आत्याला वाचनाची फार आवड होती. श्री. दाजीसाहेब दत्तभक्त होते. मी M.A., Ph.D. झाले याचे आत्याला खूप कौतुक वाटले होते.

सर्वात लहान आत्या मगोदुआत्याफ ती जोगळेकरांकडे दिली होती.

त्यांचे मोठं एकत्र कुटुंब होते. तिचे लग्न पुण्यात झाले. त्यावेळी मी लहान होते, पण मी लग्नात पडले आणि हनुवटीला जखम होऊन टाके घालावे लागले एवढे चांगले आठवते. ती लग्नानंतर उखाण्यात नांव घ्यायची तेव्हा मी ही उखाणा घेऊन 'नांव घ्यायला सांगेल त्याचे नाक कापू' असे काहीबाही म्हणे एवढे आठवते. मी दादरला तिच्याबरोबर तिच्या सासरी राहायला जायची. तिची पुतणी कुसूम माझ्या वयाची होती. तिची माझी चांगली गट्टी होती. श्री. मोरोपंत जोगळेकर हे देवभक्त होते. आम्ही पू. स्वामींचा अनुग्रह घेऊन परमार्थ मार्ग अनुसरला याचे त्यांना फार कौतुक होते. मी एकनाथी भागवतावर Ph.D. करीत आहे हे कळल्यावर त्यांना फार आनंद झाला होता. त्यांच्याबद्दलची एक आठवण सांगण्यासारखी आहे. ह्यांना जेव्हा देवाज्ञा झाली त्यावेळी अग्नि देतेवेळी चि. रमेशने कुणी न सुचविताही श्रीदत्त स्मरण करून अग्नि दिला आणि त्याला मुंबईतील स्मशानभूमीत ह्यांच्या देहातून एक ज्योत निघून ती गाणगापूर येथे संगमातील डोहात जात आहे असे दिसले. त्यामुळे तो म्हणू लागला की, ती. दादांच्या अस्थि आपण गाणगापूरला विसर्जन करू या. ते आजारी असताना मला वरचेवर म्हणत की, आपण दोघे गाणगापूरला जाऊ या! पण अत्यवस्थ असताना आम्हाला दोघांना तेथे कोण जाऊ देणार? त्यामुळे त्यांची गाणगापूरला जाण्याची इच्छा पूरी केली गेली नव्हती. पण अखेरच्या श्वासापर्यंत ते दत्तस्मरण करीत होते हे मात्र खरे! मी मग श्री. मोरूकाकांना बोलावून घेतले आणि त्यांना सर्व हीकगत सांगितली. आश्चर्य म्हणजे त्या दिवशी ते ध्यानाला बसले असता त्यांनाही ह्यांच्या शरीरातून ज्योत निघून अंतराळात गेली असे दिसले होते. त्यामुळे ते लगेच तयार झाले आणि त्यांनी जावून ह्यांचे अस्थि विसर्जन गाणगापूर येथे केले. वयाने मोठे असूनही त्यांनी आनंदाने हे कष्ट घेतले ते उपकार मी कशी विसरू शकेन?

***

## डॉ. श्री. म. वैद्य – माझे सासरे

चि. दत्ताभाऊजींच्या मुंजीचे आमंत्रण देण्यासाठी ति. काका मुंबईला आले होते. तेव्हा त्यांच्याबरोबरच त्यांनी चि. बाळला व मला इस्लामपूरला

नेले होते. पुण्याला आम्ही चोळखण आळीतील श्रीराम मंदिरात त्यांची मोठी बहीण सौ. आक्का वैद्य यांचेकडे उतरलो होतो. एस्. टी. ने जाताना त्यांनी आम्हाला हा सज्जनगड, हा अजिंक्यतारा वगैरे गडाकडे बोट दाखवून माहिती करून दिली होती. पुढील आयुष्यात समर्थाशी इतकी जवळीक साधली जाईल आणि त्यांची इतकी असीम कृपा लाभेल याची जराही कल्पना त्यावेळी नव्हती! इस्लामपूरला आम्ही मोठ्या आनंदात राहिलो होतो.

लग्नाआधी आम्ही दिवाळीच्या सुट्टीत एकवर्षी मद्रासला गेलो होतो. तेव्हाच श्री.बाबुराव वैद्य यांच्या बरोबर ति. काका, माई सोमण, लीलाताई राजमाचीकर वगैरे मंडळी दक्षिण भारताच्या यात्रेवर आली असता श्री. दांडेकरांकडे उतरली होती. तेव्हा माझ्या मामी सौ. पद्मावती दांडेकर ह्या डॉ. आबासाहेब नातूंची पत्नी सौ. इंदिराताई यांची बहीण हे माहित होते. पण डॉ. आबासाहेबांशी माझे नाते जुळेल याची काही कल्पना नव्हती. तेव्हा दांडेकर यांच्या गच्चीत ति. काका ध्यानास बसले असताना त्यांना जाणवले की, तेथे काही अशुभ घटना घडली असावी. त्यांनी चौकशी केली तेव्हा त्यांना कळले की, दांडेकर यांच्या गड्याने तेथे आत्महत्या केली होती. त्यावेळी ती. काकांबद्दल सर्वांनाच आदर वाटला होता. ति. काकांनी 'प्रणवोपासना' साधुसंतांचा देवयान पंथ व षड्चक्रदर्शन व भेदन व अष्ट्याचे श्रीदत्त महाराजांचे चरित्र असे ग्रंथ लिहिले आहेत. पहिले तीन अद्यापही लोकप्रिय असून मुंबईतील 'तुकाराम बुक डेपो' द्वारा त्यांच्या अनेक आवृत्त्या निघाल्या असून ते 'सत्संग धारा' या वेबसाईटवर इंटरनेटवरही उपलब्ध आहेत. त्यांची पुस्तके वाचली की, त्यांचा अध्यात्मांतील अधिकार कळून येतो. मला दिवस राहिले तेव्हा त्यांनी मला रोज स्नान झाल्यावर सोवळे नेसून श्रीगुरूचरित्रास प्रदक्षिणा घालण्यास सांगितले होते, त्याप्रमाणे कित्येकवर्षे मी प्रदक्षिणा घालीत होते.

एकदा सौ. आऊताई गावाला गेल्या होत्या आणि संक्रांत जवळ आली होती. म्हणून मला त्यांनी सांगितले की भोगीला सुवासिनीला तेल, शिकेकाई व बांगड्या दे. त्यावेळी आम्ही दुकानात जात नसू. म्हणून मी बाबू म्हणून कारभारी होता, त्यास हिरव्या बांगड्या आणून देण्यास सांगितले व मी सुवासिनीस बोलावून तिला कुंकू लावून तेल शिकेकाई वगैरे दिली व

तिळगुळ दिला. दुसरे दिवशी संक्रांत होती! ति.काकांनी विचारले 'मी सांगितल्याप्रमाणे केलेस कां?' मी म्हटले, 'मी तेल, शिकेकाई, तिळगुळ दिले, पण बाबूने बांगड्या आणून दिल्या नाहीत म्हणून ते राहिले.' तेव्हा ते म्हणाले, 'तरीच मला स्वप्नात देवी दिसली आणि तिने म्हटले, 'बांगड्या का नाही भरल्या?' मग त्यांनी बाबूस ताबडतोब बांगड्या आणून देण्यास सांगितले व मी त्या सवाष्णिला दिल्या. त्यावेळी ते म्हणाले, 'आपला भाव असेल तर देव आपल्याशी बोलतो सुद्धा!' या त्यांच्या म्हणण्याचा अनुभव पुढे आयुष्यात अनेकदा आला.

ते शांत स्वभावाचे होते. अत्यंत धार्मिक होते. दत्तभक्त होते. दर एकादशीस कऱ्हाडला कृष्णास्नानास जात. घरांत रोज सोवळ्याने स्वयंपाक होई व वैश्वदेव व नैवेद्य होईल. त्यांच्या पंक्तीस रोज जेवायला ब्राह्मण असे. दर्शश्राद्धही ते करीत. नित्य उपासना, संध्याकाळी करूणाष्टके, रात्री दत्तमाहात्म्य वाचन असे बरेच काही चाले. त्यांनी आणल्यामुळेच मी दत्तप्रबोध व डॉ.जामदार यांनी लिहिलेला तुलसी रामायणाचा मराठी अनुवाद वगैरे ग्रंथ त्यावेळी वाचले होते. माझे १९४२ च्या अखेरीस लग्न झाले आणि १९४५ च्या भाऊबीजेच्या दुसऱ्या दिवशी त्यांना देवाज्ञा झाली. त्यात तेवढ्यात माझी दोन बाळंतपणे झाली होती त्यामुळे मुंबईस बरेच राहणे झाल्याने त्यांचा सहवास फार कमी लाभला. ते गेल्यावर त्यांच्या नांवाने पत्रे येत व लोक त्यांना अध्यात्मातील शंका विचारीत हे पाहून नंतर ह्यांनी व मी त्यांचे ग्रंथ वाचले व त्याप्रमाणे ध्यानाभ्यास वगैरे करण्याचा प्रयत्नही केला, पण शेवटी त्यांच्या कृपेनेच श्रीसद्‌गुरूची गाठ पडून जीवनाचे सार्थक झाले.

***

### माझे पतीदेव – डॉ. बाळकृष्ण श्रीपाद वैद्य

हे सहा महिन्याचे असतानाच ह्यांच्या सौ. आईला देवाज्ञा झाली (१९१८) मध्ये इन्फुएंझाच्या साथीत बरीच माणसे दगावली. त्याच रोगाने त्यांचा बळी घेतला. ह्यांच्याहून मोठ्या तीन बहिणी म्हणजे कमल, कुसूम व विमल होत्या. आणखीही एक बहीण झाली होती पण ती दगावली. चार

मुलींच्या पाठीवर हे झाले म्हणून बारसे फार थाटांत झाले होते! माझे मामंजी ती. काकाही ५ मुलींच्या पाठीवर झाले होते व त्यांच्यानंतर आणखी दोन मुली झाल्या होत्या म्हणतात. म्हणजे ७ मुली आणि एकच मुलगा अशी परिस्थिती होती. असे म्हणतात की, पाच मुली झाल्यावर मुलगा व्हावा म्हणून त्यांनी (श्री.माधवराव) गाणगापूरला जाऊन श्रीगुरूचरित्राचे सप्ताह केले होते. तेव्हा दृष्टान्त झाला की, तू आता घरी जा, तुझी इच्छा पूर्ण होईल. तरीही त्यांनी वाचन सुरू केल्यावर डोळ्यातून रक्ताचे थेंब पडले तेव्हा क्षमा मागून ते घरी परतले व त्यानंतर त्यांना मुलगा झाला. श्रीदत्तकृपेने म्हणून त्यांचे नांव श्रीपाद ठेवले. पण ते ४/६ वर्षाचे असतानाच त्यांची आई गेली. तेव्हा त्यांची सावत्र आई, त्यांना 'माई' म्हणत व त्यांची मावशी यांनी त्यांचे पालनपोषण केले होते. आश्चर्याची गोष्ट म्हणजे त्यांच्या आईनेच श्री. माधवराव (महादेवराव) यांनी टाकलेल्या आपल्या सवतीला आपल्या घरी बोलावून घेतले होते व त्यांच्याशी बहिणीसारख्या वागत, पण श्री.माधवराव त्यांच्या हातचे पाणीही पित नसत असे म्हणतात. ते पूर्वी काहीही फी वगैरे घेत नसत, पण मुलगा झाल्यावर औषधोपचार केल्यावर ते मानधन म्हणून जमिनी स्वीकारू लागले. ते उत्तम वैद्य होते. त्यांच्याविषयी अशी आख्यायिका आहे की, एकदा इस्लामपूरला ते दुकानात बसले असता तेथे एक घोडेस्वार आला तेव्हा त्याच्याकडे पाहून त्यांना काय वाटले कुणास ठाऊक! पण ते म्हणाले, ह्याने जर पाणी प्यायले तर हा मरेल! आणि असे म्हणतात की, त्याला उलटा टांगून त्याच्या खाली पाण्याने भरलेले भांडे ठेवले तेव्हा त्याच्या तोंडातून कीडा त्या पाण्यात पडला आणि तो फुगत फुगत गेला! त्या माणसाचा प्राण वाचला. ते सांगलीकरांचे राजवैद्यही होते. असे सांगतात की, तरूणपणी ते व श्री आठले, अक्कलकोट येथे श्री स्वामी समर्थ यांच्या दर्शनास गेले होते तेव्हा स्वामींनी श्री. आठले यांना तांदूळ आणि सूत प्रसाद दिले व श्री. वैद्यांना माती वा भस्म प्रसाद दिला. याचा अर्थ असा होता की, श्री.आठले यांना अन्न-वस्त्रास कमी पडणार नाही व श्री.वैद्य यांनी माती उचलून रोग्याला दिली तरी गुण येईल. पण पू. स्वामींच्या पंचक्रोशीत त्यांनी प्रयोग करून पाहू नये. पण झाले असे की, ज्या

ब्राह्मणाकडे हे दोघे उतरले होते तो एकाएकी पोटशूळाने अत्यवस्थ झाला तेव्हा न राहवून श्री. वैद्यांनी त्यास औषध दिले व त्यास बरेही वाटले. पण हे कळल्यावर स्वामी म्हणाले की तू आज्ञा मानली नाहीस तर आता तू जे औषध सांगशील त्याने गुण येईल पण तुझ्या हाताने ते देऊ नको. असे म्हणतात, की म्हणून श्री. माधवराव दुसऱ्याकडून औषधे देववीत. ती. काका ग्रँट मेडिकल कॉलेजमधून L.M. & S. झाले होते पण त्यांना आयुर्वेदाचे उत्तम ज्ञान होते. आयुर्वेद कॉलेजमध्ये ते परिक्षक म्हणूनही जात असत. ते स्वत: सर्वांना मोफत उपचार करीत व घरांत भट्टी लावून औषधेही तयार केली जात व त्यावेळी अनुष्ठानही केले जाई. तसेच इस्लामपूरात श्री. वैद्यांची झरी म्हणून खूपच मोठी गोड्या पाण्याची विहीर होती. इस्लामपूरात नळाचे पाणी येण्यापूर्वी गावांतील सर्व लोक त्याच विहिरीचे पाणी पिण्यासाठी वापरत. याचे पुण्य वैद्य घराण्यास पिढ्यान् पिढ्या लाभणार आहे यात संशय नाही. श्री. वैद्य माधवराव यांना पू. स्वामी समर्थांची व श्रीनृसिंह सरस्वतींची कृपा लाभली तर डॉ. श्रीपाद म. वैद्य यांना पू. टेंबे स्वामी व श्रीदत्त महाराज अष्टे यांची कृपा व सहवास लाभला आणि आमच्या भाग्याने प. पू. स्वामी प्रज्ञानानंदांची कृपा आणि सहवास आम्हांस लाभला! व आमच्या जन्माचे सार्थक झाले.

ह्यांचे आजोळ सातारला होते. ह्यांचे आजोबा श्री. तात्यासाहेब जोशी हे शनिवार माची येथे राहात होते. त्यांना दोन मुली व एक मुलगा झाला होता पण तो लहापणीच गेला. एक मुलगी इस्लामपूरच्या वैद्यांकडे व दुसरी वेणगावकर वैद्य यांच्याकडे दिली होती. ह्यांची सौ. आई तर लवकर गेली. पण ती. तात्यासाहेब १९५३-५४ मध्ये गेले. श्री. बाबुराव वेणगांवकर वैद्य हे घरजावई झाले होते. त्यामुळे सौ. मावशी, त्यांचे दोन मुलगे चि. अण्णा व चि. बापू सर्व सातारलाच राहात होते. त्या सर्वांचा सहवास लाभला आहे. पूर्वी सातारला जास्त जाणे होत नसे. पण १९५० मध्ये गाडी घेतल्यानंतर वाटेत सातारला सौ. मावशीना भेटूनच आम्ही पुणे, मुंबई येथे जात असू. सौ. मावशी अत्यंत हुशार, स्वच्छता व टापटीप यांची आवड असलेल्या व कष्टाळू होत्या. त्यांनी प्रेमाने माणसे खूप, चांगली जोडली होती.

हे शिकायला मुंबईला होते. तेव्हा बहिणीला भेटायला एकत्र कुटुंब

असल्याने वारंवार आमचे घरी येत. ते खूप हुशार होते. Anatomy मध्ये त्यांना स्कॉलरशीपही मिळाली होती. शिवाय सुस्वभावी व शांत स्वभावाचे होते. आमच्या १९४२ ते १९६५ पर्यंतचा गृहस्थाश्रम अत्यंत आदर्श व सुखाचा झाला. ती. काकांना देवाज्ञा होण्यापूर्वी हे जे.जे. मध्ये डॉ. योध यांच्या हाताखाली M.D. Medicine साठी शिकत होते. पण कै. ती. काकांना १९४५ मध्ये अचानक देवाज्ञा झाल्याने ह्यांना शिक्षण थांबवून घरची जबाबदारी सांभाळावी लागली. १९५३ मध्ये आमच्या वाटण्या झाल्या. तोपर्यंत हेच सर्व पहात होते. ती. आऊताईंची २/३ मुले अल्पवयातच गेली होती. चि.दत्ताभावजी माझ्यापेक्षा फक्त तीन वर्षांनी लहान होते. नंतर पद्मावन्स, सुमनवन्स, सुधावन्स व सुरेश भावजी. सुरेशभावजी माझ्या लग्नात फक्त दीड वर्षाचे होते. त्यांच्यात व चि. मंगलमध्ये फक्त ३।। /४ वर्षांचे अंतर होते. माझे लग्न झाले तेव्हा आम्ही सरदार पटेल रोडवर विठ्ठल मॅन्शनमध्ये राहात होतो. जागा भरपूर मोठी होती व शिवाय वर मोठी गच्ची होती. तेथे खेळायला मिळे. आमच्या शेजारच्या इमारतीत श्री. स.का. पाटील काँग्रेस पुढारी राहात. त्यांच्या मुली सुशिला व गीता माझ्याच शाळेत होत्या व माझ्या मैत्रिणी होत्या. आमचे एकमेकीकडे येणेजाणे असे. तसेच शेजारील दुभाष लेनमध्ये पूर्वी कॅम्लीन्स्चे श्री. दांडेकर राहात. त्यांची मुलगी इंदू माझ्या वर्गात होती. पुढे ते दादरला 'रामबाग' येथे राहावयास गेल्यावरही माझे जाणेयेणे होते. त्यांच्या समोरच्या रूबी मॅन्शनमध्ये माझी सौ. गोदुआत्या राहात असे. शिवाय इंदूची सौ. काकू हिचाही पू. जिजिमहाराजांशी संबंध असल्याने माझी आजी त्यांच्याकडे मुंबईस आल्यावर जात असे. असो.

विठ्ठल मॅन्शनमध्ये गच्चीत पंप बसवलेला होता. तो रोज पहाटे सुरू करून टाक्या भरल्या की दिवसभर सगळ्या बिल्डींगला पाणीपुरवठा होई. वीज तर चोवीस तास असे व घरी गॅस पाईप लाईन उपलब्ध असल्याने गॅस संपला असे कधीच होत नसे. इस्लामपूरला या उलट परिस्थिती होती. वीज नाही, पाणी आडाचे ओढून भरावे लागे. गोडे पाणी भरायला पाणक्या होत्या. पण ते कायम उकळवूनच प्यावे लागे. नाहीतर नारू होण्याची भीति! जमिनी शेणाने सारवाव्या लागत. चुलीवर स्वयंपाक करावा लागे.

मला तर चूल पेटविण्यापासून सासुबाईंच्याकडून शिकावे लागले. मुंबईला आमच्याकडे गॅसवर गरमगरम फुलके रोज जेवायला असत. इस्लामपूरला रोज भाकरी. द्वादशी, अमावस्या, सणवार या दिवशी पोळ्या (घडीच्या) असत. रोज सोवळ्याने स्वयंपाक, वैश्वदेव, नैवेद्य, गोग्रास, पंक्तीला ब्राह्मण जेवायला, असा थाट असे. मुंबईला पण सोवळ्याने स्वयंपाक असे. पण एकत्र कुटुंब आणि बरीच माणसे असल्याने घरात कायम पुरूष स्वयंपाकी असे. सासरी, माहेरी मासिक पाळीचे वेळी लांब बसावे लागे. पण लहान वयात हे बदल स्वीकारायला जड गेले नाही.

इस्लामपूरला पुढील माडीवर रोज ती. काका व त्यांचे मित्र श्री. रामभाऊ हणमसागर व श्री. विनायकराव वाळवेकर (हे अंध होते) बसत. तेथे बहुतेक बत्ती लावलेली असे. बाकी सर्वत्र कंदील वा चिमण्या लावलेल्या असत. कृष्णा म्हणून गडी होता. घरात गाय होती. तो गायीचे व इतर कंदील पुसणे, तेल भरणे, वगैरे कामे करी. पण मला अंधाराची सवय नव्हती. त्यामुळे दत्ताभाऊजी खूप वेळा लपून बसून एकदम 'भॉक' करून मला घाबरवीत. पण त्यावेळी त्याची त्यांना व मलाही गंमत वाटे. राग येत नसे. मांजरी व्याली की तिची लहान लहान पिल्ले असत. त्यातले एखादे एकदम अंगावर फेकीत. आडाचे पाणी ओढायलाही मी शिकले होते. वापरायला खूप पाणी लागे. एकाने ओढायचे आणि माळ करून ह्याच्या हातून त्याने, त्याच्या हातून दुसऱ्याने असे स्वयंपाक घरांतील हौदांत व न्हाणीघरात भरून ठेवायचे, असे चाले. मे महिन्याच्या सुट्टीत किंवा दिवाळीच्या सुट्टीत कऱ्हाडहून सर्व मुले राहावयास येत, तेव्हा सर्वजण कपडे घेवून तळीवरील विहिरीवर पोहायला जात व आपापले कपडे धुवून घेऊन येत. कधी तरी गंमत म्हणून त्यांच्याबरोबर तळीवर मी जाई. चि. श्रीकांत तेव्हा लहान होता. सर्वच छान पोहोत असत. पण तो लहान म्हणून त्याचे कौतुक वाटे. सडा संमार्जन, रांगोळ्या काढणे, जमीन सारवणे, चूल, वैल सारवणे सर्व मी हौसेने शिकले. पुढे इस्लामपूरला वीज आली, नळाचे पाणी आले, घरात सर्वत्र फरशा बसल्या. तेव्हा मुली मोठ्या झाल्यावर त्यांना आश्चर्य वाटे की मुंबईतून एकदम इस्लामपूरसारख्या खेड्यात यायला मी कशी तयार झाले?

हे शांत स्वभावाचे होते. १९४५ मध्ये ती. काकांना देवाज्ञा झाली. नंतरही आठ वर्षे आम्ही एकत्र होतो. पण ह्यांनी आपले आईचे वा माझे कुणाचेही मन कधी दुखावले नाही किंवा कधी कठोर बोलून अपमानही केला नाही. तिन्ही बाळंतपणांत मला माहेरी राहावे लागले. पण १९४९ मध्ये आम्ही गाडी घेतल्यापासून ह्यांच्या दुखण्याव्यतिरिक्त मी कधी माहेरी राहिले नाही. आम्ही उभयतां बरोबर जात असू आणि बरोबरच परत येत असू. माझे वडील म्हणत, 'काय सारखे एवढे गुलगुल गोष्टी करीत असता?' एकाच्या पायात काटा मोडल्यावर दुसऱ्याच्या डोळ्यात पाणी येई असे होते. प.पू. स्वामीनाही या गोष्टीचे कौतुक वाटे, असो.

ती. काका गेल्यावर वैश्वदेव ,नैवेद्य वगेरे सुरू होते. पण रोज भोजनास ब्राह्मण पंक्तीला असणे, दर्शश्राद्ध वगैरे बंद पडले. तसेच गाय होती तीही वाटेकऱ्याकडे पोहोचती झाली. मी ती. काकांनी सांगितल्याप्रमाणे रोज श्रीगुरूचरित्रास प्रदक्षिणा घाली. पण ह्यांच्या हातून काहीच ईश्वरसेवा घडत नसे. तसे महार मांग गोरगरीब यांना फु कट औषधोपचार करीत. ब्राह्मणआळीतही कुणाकडून काही घेत नसत. त्यामुळे सर्वांना आधार वाटे. पण स्वत:ची वैयक्तिक उपासना होत नसे. मी सहज एकदोनदा ती. काकांची पुस्तके वाचल्यावर सुचविले तर 'तू मला शिकवू नकोस' म्हणाले. पण झाले असे की तेच एक दिवस दुपारी जेवून वामकुक्षी करत असतांना त्यांना स्वप्नांत श्रीदत्तप्रभूंचे दर्शन झाले आणि प्रभू म्हणाले, 'काय रे, तू आमचे काहीच करीत नाहीस!' असे म्हणून प्रभूंनी कमंडलूतील पाणी घेऊन जोराने ह्यांच्या अंगावर टाकले आणि ह्यांना एकदम जाग आली व त्यांनी ते स्वप्न मला सांगितले आणि दुसरे दिवशी अवस होती तरी स्नान करून देवघरात जाऊन सोवळे नेसून श्रीगुरूचरित्र वाचायला सुरूवात केली. तो नियम शरीर स्वाधीन असताना त्यांनी कधीही मोडला नाही. पुढे श्रीसद्गुरूंच्या सांगण्यावरून ते नियमित दोन्ही वेळा संध्या, गायत्री जप, श्रीगुरूचरित्र वाचन नंतर श्रीदत्त मंत्राचा जप, संध्याकाळी संध्येनंतर करूणाष्टके म्हणून शेजारतीपर्यंतचा नित्यक्रम अत्यंत निष्ठेने आणि प्रेमाने करीत असत. श्रीसद्गुरू चरणी त्यांची अनन्य निष्ठा होती. माझ्या मासिक पाळीच्या वेळी ते स्वत: श्रीसद्गुरू उठण्यापूर्वी स्नान करून सेवेत तत्पर

असत. त्यांचे स्नान झाल्यावर स्वत: त्यांची वस्त्रे धुवून वाळत टाकीत. त्यांचा शब्द खाली पडून देत नसत. स्वामी त्यांना प्रेमाने 'बाळ' म्हणत आणि 'बाळ म्हणजे खरेच बाळ आहे' असे म्हणत. मह्या स्वामीला बाळवर रागावतां येत नाही' असे सर्वांसमक्ष म्हणत. शेवटच्या दुखण्यात चि. मधुभाऊनी (जावई) ह्यांचा आवाज रेकॉर्ड व्हावा म्हणून सर्व यंत्रसामग्री हॉस्पिटलमध्ये आणून ह्यांना भजन म्हणण्यास सांगितले. तेव्हा ह्यांनी 'माझी देवपूजा बा देवपूजा, पाय तुझे गुरूराया' हेच भजन म्हटले होते. ते गेल्यावर ते भजन ऐकले तरी माझ्या ह्रदयांत कालवल्यासारखे होई.

हे गेल्यावर कित्येकांनी मला विचारले की, एवढे तुमचे स्वामी असतांना असे कसे झाले? आता यावर काय बोलणार? प्रारब्ध का कधी कुणाला सुटले आहे? पण माझी दृढ श्रद्धा होती की ज्या दुखण्याने त्यांना देवाज्ञा झाली त्याच दुखण्याने ते १९५३ मध्ये आजारी होते. तेव्हा काही झाले असते तर मी काय केले असते? त्यावेळी पू.स्वामी चास-कमानला आम्हांला घेऊन गेले आणि त्यानंतरची १२ वर्षे आमची भगवद्सेवेत गुरूसेवेत इतकी आनंदात गेली! श्रीगुरूचरित्रात जसे प्रभूंनी त्या सतीच्या नवऱ्याचे आयुष्य पुढील जन्मातील आयुष्य देवून वाढवले त्याप्रमाणे श्रींनी ह्यांच्या पुढील जन्मातील बारा वर्षे घेऊन ह्यांचे आयुष्य वाढविले असावे. त्यामुळे त्या बारा वर्षांत ह्यांच्या हातून दोन्ही मुलींची लग्ने पार पडली, त्यांनी नातू झालेला पाहिला. आर्थिकदृष्ट्याही परिस्थितीत महदंतर पडले होते. त्यावेळी हे आजारी पडल्यापासून पैशाची आवकच थांबली होती. लोकांकडून पैसे उसने घ्यावयाची पाळी आली होती. तिन्ही मुले लहान होती, त्यांची शिक्षणे, मुलींची लग्ने वगैरे व्हावयाची होती. अशा स्थितीत आम्ही काय केले असते? पण श्रीसद्‌गुरू कृपेनेच पुढे सर्व निभावून गेले. मी चि.रविबरोबर मॅट्रीक झाले तेव्हा ह्यांची इच्छा होती की, मी पुढे शिकावे! त्यांची ती इच्छाही श्रीसद्‌गुरूंच्या कृपेने पूर्ण झाली. P.D. पासून Ph.D. पर्यंत घरांतील व्याप सांभाळून कसे काय जमले हे रामभैय्याच जाणतात! त्यालाही आता २५ वर्षे झाली म्हणायची!

***

### श्री. रा. श्री. वैद्य

श्री. रामकृष्ण श्रीधर वैद्य हे आमचे दुसरे व्याही. कोकणांतील नांदिवडे हे त्यांचे गांव. त्यांचे वडील श्री. श्रीधर नारायण वैद्य उर्फ भाऊ हे देवभक्त होते. ते कस्टममध्ये नोकरी करीत होते. निवृत्तीनंतर ते रत्नागिरीजवळ त्यांच्या नांदिवडे या गांवी जाऊन राहिले होते. त्यांच्या हातात सतत जपमाळ असे. त्यांना कमी ऐकू येत असे. त्यांची पत्नी होती तोपर्यंत ते नांदिवड्यास राहात होते. नंतर मुंबईत राहावयास आले होते. असे म्हणतात की, त्यांच्या पत्नीचा दाहसंस्कार झाल्यानंतर अस्थि सावडतांना त्यांच्या बांगड्या जशाच्या तशा मिळाल्या होत्या. श्री. रा. श्री. वैद्य यांना सर्व आप्पा म्हणत असत. ते कस्टम ऑफिसमध्ये लिपिक होते. पण पापभीरू असल्याने कधीही गैरमार्गाचा अवलंब करून पैसा मिळविला नाही. त्यांच्या बरोबरच्या लोकांनी बंगले बांधले होते. पण ते म्हणत, मी एक पैसा जर हरामीचा घेतला तर मला झोपच येणार नाही. त्यात त्यांची बहीण लवकर वारली. त्यामुळे तिची मुले २ मुलगे व १ मुलगी सौ. सुशिलाताई व ती. आप्पांजवळ राहूनच वाढली, शिकली सवरली; नोकरीला लागली होती. ती आप्पांना दोन मुलगे. एकाच नांव नारायण होते पण सर्व 'मधु' म्हणत. हेच आमचे जावई होते. खूप हुशार, निर्व्यसनी आणि सुस्वभावी होते व इंजिनियर होवून विवाह झाला तेव्हा Calama कंपनीत नोकरी करीत होते. त्यांचा धाकटा भाऊ श्री. मनोहर C.A. फायनलला बसला होता. सर्व अत्यंत सुस्वभावी व परोपकारी होती. ती. आप्पा मॅट्रीकपर्यंतच शिकून नोकरीस लागले होते. पण बाहेरून परीक्षा देऊन साहित्य विशारद झाले होते. मासिकांतून कधीमधी लेखही लिहित. चि. रविबाला लग्नानंतर B.A. ऑनर्स इंग्लिश घेऊन झाली होती. चि. मधुभाऊ कंपनीतर्फे जर्मनीस गेले होते व नंतर त्यांनी १९६८ मध्ये स्वत:ची कंपनी- अटलांटा सबमर्सिबल पंपस् काढली.

सौ. सुशिलाताईंना १९८० मध्ये कार्तिकी एकादशीस हृदयविकाराचा झटका येऊन अकस्मात देवाज्ञा झाली. मी लिहिलेले श्री प्रज्ञानानंद सरस्वती स्वामींचे व गोस्वामी तुलसीदासांचे चरित्र 'संतकृपा' प्रकाशनातर्फे संतचरित्र मालेतून प्रकाशित झाले होते. ती दोन्ही पुस्तके ती. अप्पांनी वाचली होती व त्यांच्या समोरच्या ब्लॉकमध्येच डॉ. आंबर्डेकर राहात होते. ते पाटकर

कॉलेजमध्ये संस्कृतचे प्राध्यापक होते. वैद्य व आंबर्डेकरांचा खूप घरोबा होता. माझी पुस्तके प्रकशित होण्यापूर्वी डॉ. आंबर्डेकरांनीही वाचली होती व त्यांनाही आवडली होती. तेव्हा मी Ph.D. चा अभ्यास करीत होते. पण प्रबंध पूर्ण झाला नव्हता. ती. अप्पा मला नेहमी म्हणत की, तुम्ही तुमचे आत्मचरित्र लिहा. कारण ते वैशिष्ट्यपूर्ण होईल. कारण त्यांत तुमचे प्रपंचातील व परमार्थातील असे दोन्ही क्षेत्रातील अनुभव असतील. पण 'सत् हरिभजन जगत सब सपना' या श्रीरामचरितमानसांतील ओळी अंत:करणात ठसलेल्या होत्या म्हणून मी मनावर घेतले नाही. पण आता 'सत्संगति दुर्लभ संसारा' वर लिहितांना त्यांची आठवण निश्चितच होत आहे.

***

## डॉ. माधव नारायण गोगटे

कऱ्हाडच्या सर्व भाच्यांशी लहानपणापासूनच मैत्री होती. लग्नानंतर १९४३ च्या मार्च एप्रिलमध्ये काही दिवस मी कऱ्हाडला राहिले होते व प्रिय इंदूबरोबर टिळक हायस्कूलमध्ये जात होते. तेथे मी दहावीची परीक्षाही दिली होती. इंदू, राम, माधव, वसंत, श्रीकांत सर्व मला 'मामी' म्हणत त्यामुळे कऱ्हाडमध्ये इंदूच्या मैत्रिणी व इतर परिचितही सर्व मला 'मामी' म्हणत. ते मला फारसे आवडत नसे. तेथे माधव व मी रात्री जागून अभ्यास करत असू. बाकी सर्व रात्री लवकर झोपत व पहाटे अभ्यास करीत. आम्ही दोघे अभ्यास करीत असतां, कोणी झोपेत बोले, कुणी घोरत असे. आमची त्यामुळे करमणूक होई. ती. काका (इस्लामपूरचे) होते तोपर्यंत ती सर्व भाचे मंडळी सुट्टीत इस्लामपूर येथे येत. त्यावेळी आमचे पत्ते वगैरे खेळ चालत. मग हळूहळू कॉलेजला जाऊ लागली व त्यांचे सुट्टीत येणे बंद झाले व फारशी गाठ पडेनाशी झाली.

नंतर चि. माधव पुण्याला बी. जे. मेडिकलला शिकत असताना मी कॉलेज बघायला गेले होते. तेव्हा कोल्ड स्टोअरेजमध्ये शेल्फात ठेवलेली प्रेते प्रथम पाहिली एवढे आठवते. नंतर डॉ. माधवने कोल्हापूरला नाक–कान–घसा तज्ज्ञ म्हणून काम करण्यास सुरूवात केली. तेव्हापासून त्याच्याशी खूप संबंध येऊ लागला. नंतर तर त्यांचे लग्न झाल्यावर तो दर

रविवारी इस्लामपूरला येऊन टॉन्सिल्सची व मोतीबिंदूचीही ऑपरेशन्स करून जात असे. त्यांच्याबरोबर डॉ. किर्लोस्कर (भूलतज्ञ) व सौ. सुशिलाही असत. जसजसा आमचा जास्त संबंध येऊ लागला तसे ह्यांनी चि.माधवकडून कबूल करून घेतले होते, की कुठल्याही परिस्थितीत एकमेकांसंबंधी गैरसमज करून घ्यावयाचे नाहीत. काही शंका आली तर स्पष्टपणे बोलून शंका निरसन करावयाचे आणि हे आश्वासन त्याने हे असतानाच नव्हे तर ह्यांना जाऊन ४७ वर्षे होऊन गेली तरी पाळले आहे. आमच्या प्रत्येक अडचणीच्यावेळी त्याने न सांगता मदत केली आहे. मूक, बधिर लोकांसाठीही त्याने अनेकवर्षे काम केले आहे.

संस्कृतची आवड असल्याने त्याने संस्कृतीची विशारद परीक्षा दिली व काही वर्षे तो १०, १२ व्या मोजक्या विद्यार्थ्यांना संस्कृतही शिकवत असे. धार्मिक ग्रंथाचा त्यांच्या व्यासंग असून त्यांचे अनेक लेखही प्रसिद्ध झाले आहेत. त्याच्या ठिकाणी जी सरलता, विनम्रता, कामाची तत्परता, परोपकाराची सहज प्रवृत्ती दिसून येते की खरोखरच दुर्लभ आहे. विद्वानांचा व संत सज्जनांचा सत्कार करण्याची त्यास आवड आहे. डॉ. श्रीकृष्ण देशमुख, डॉ. द्रवीड, श्री. वि. गो. देसाई, श्री. पागनीस गुरूजी वगैरेंशी त्यांच्यामुळेच माझा परिचय झाला. त्याच्याविषयी मला खूप आत्मियता, प्रेम व आदरही आहे जो शब्दात व्यक्त करता येत नाही. प्रिय सौ. सुशिलामुळेच आमचे हे प्रेमसंबंध अधिक दृढ झाले आहेत. ती मला माझ्या मुलीसारखीच प्रिय आहे.

***

## चि. अरविंद

चि. अरविंद माझे लग्न झाले तेव्हा फक्त ६/७ वर्षाचा होता. तो लहानपणी फार खोडकर होता. पण माझे लवकर लग्न झाल्याने त्यानंतर आमचा फारसा सहवास झाला नाही. पण तो इंटरसायन्स होऊन जेव्हा सांगली येथे वालचंद इंजिनिअरींग कॉलेजमध्ये शिकू लागला तेव्हापासून ४/५ वर्षे त्याचा खूप सहवास लाभला. बहुतेक ८/१५ दिवसांनी तो इस्लामपूरला येत असे. कधी काही २६ जानेवारी वगैरेच्या निमित्ताने

आम्हीही वालचंदवर जात असू. तो तेथे असताना श्री. श्रीकृष्ण अभ्यंकर यांजकडे जात असे. त्यांना तो 'कृष्णा' म्हणत असे. कारण चि. सरला व 'कृष्णा' सिडनहॅम, मुंबईत एका वर्गात होते व पुढे पुण्यातही दोघांनी बरोबरच एल.एल.बी. केले होते. म्हणून तो त्यांच्याकडे जाई. चि. मंगलचे लग्नही त्यांच्यामुळेच जमले. असो.

तो इलेक्ट्रीक व मेकॅनिकल इंजिनिअर झाल्यावर एअरफोर्समध्ये भरती झाला. ह्यांना देवाज्ञा झाली तेव्हा मला वाटते तो चंदिगडला होता. नंतर तो दीर्घ मुदतीच्या रजेवर मुंबईस आला. त्याची मला खूपच मदत झाली. इस्लामपूरात येऊन राहून सर्व आवराआवरी करण्यास त्याची व चि. मधुभाऊंची खूप मदत झाली. नंतर चि.सौ.रविच्या ऑपरेशनसाठी तो आम्हांला पुण्यास घेऊन गेला. बेळगांवला माझ्याबरोबर येऊन चि. रमेशच्या मेडिकल कॉलेजच्या प्रवेशासाठी मदत केली. तसेच इस्लामपूरहून चिकुर्डे येथे मला घेऊन जाऊन श्रीसद्गुरू प्रज्ञानानंद सरस्वती स्वामींचे दर्शन घडवले. किती म्हणून लिहावे?

तो मातृपितृभक्तही होता. एअरफोर्समध्ये नोकरीमुळे त्याला नेहमी घरापासून दूर राहावे लागे. त्याच्या पाकिटात नेहमी त्या दोघांचे फोटो असत. सौ. आई जास्त आजारी झाली तेव्हा त्यानेच तिला हॉस्पिटलमध्ये हलवले. नंतर तिला देवाज्ञा झाल्यावर ती.अण्णासाहेबांना तो आपल्याबरोबर बंगलोर येथे घेऊन गेला. त्यांना बरे नसले तर तो त्यांच्या शेजारी त्यांच्या अंगावर हात ठेवून झोपत असे. अगदी शेवटच्या दुखण्यातही ती अण्णासाहेबांनी जणू त्याच्यासाठीच प्राण ठेवला होता. तो, मला वाटते दिल्लीला होता. तो आला हे कळले, डोळे उघडून त्यांनी त्याच्याकडे पाहिले आणि देहत्याग केला!

चि. अरविंद ती. अण्णासाहेबांना स्वत:जवळ ठाणे व बंगलोरला घेऊन गेला होता तेव्हा सौ. अनुराधानेही आत्मीयतेने त्यांची सेवा केली होती व चि. गीतांजली व चि. केदार या मुलांनाही त्यांचा लळा लागला होता. सौ. सुधा लवकर गेली पण सौ. अनुराधा अजून आपल्या सर्व नणदांशी व भाचरांशी आत्मीयतेने वागते ही रामभैय्याचीच कृपा!

***

## डॉ. श्रीकांत व डॉ. सौ. नलिनी गोगटे

लहानपणी श्रीकांतशी संबंध आला. त्यानंतर १९४५ मध्ये कै. ती. काकांना म्हणजे माझ्या सासऱ्यांना देवाज्ञा झाली. त्यानंतर चि. श्रीकांतची मुंज श्रीनरसोबाचीवाडी येथे व्हावयाची होती. त्यात श्री. बाबूराव गोगटे यांचे कुटुंब व चि.दत्ताभाऊजी व मी एवढीच हजर होतो. तेथील पुजाऱ्याकडे उतरलो होतो. पहाटे जाग आली ती मुळी 'दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा' या भजनाने, त्यामुळे इतके छान वाटले. मी पहिल्यानेच त्या स्थळी आले होते. तेथील पवित्रता आणि शांतता मनाला खूप भावली. त्या दिवशी तेथे श्री. गोगटे यांच्या तर्फे झालेली महापूजाही पहावयास मिळाली. पादुकावर दूध घालतात त्यावेळी त्यांचे छान स्पष्ट दर्शन होते. पंचामृत स्नान घातल्यावर पादुका स्वच्छ पुसून त्यावर गंध लेपन करण्यात आले आणि नंतर विड्याच्या पानांची सुंदर पूजा पहावयास मिळाली. औदुंबरला प्रदक्षिणा घातल्या. मुंज तर अगदी उत्तमप्रकारे संपन्न झाली. नंतर रात्री तेथील पालखीचा सोहळा पहावयास मिळाला. या सर्व योगायोगांच्यामुळेच चि. श्रीकांतच्या अंत:करणात दत्तभक्ती पुढे अंकुरली असावी.

पुढे आम्ही एकदा हे असताना सुट्टीत महाबळेश्वरला गेलो होतो तेव्हा चि.श्रीकांत पण आमच्याबरोबर आला होता. त्यानंतर त्याचा संबंध जास्त आला तो आम्ही दोघे (चि. रमेश व मी) हे गेल्यानंतर चि. रमेशच्या शिक्षणासाठी बेळगांवला आल्यावर. त्याची पत्नी डॉ. सौ. नलिनी ही एकदा तिच्या लग्नानंतर इस्लामपूरला आली होती. तेव्हा ती डॉक्टर म्हणून ह्यांना तिचे इतके कौतुक वाटले होते की ते तिला आपल्याबरोबर व्हिजीटला घेऊन गेले होते. पुढे बेळगांवला चि. श्रीकांत काळी आमराई येथून मारूती गल्लीत राहावयास गेला तेव्हा त्याच्या जागेत आमराईत आम्ही राहू लागलो व तो पुढे मारुती गल्लीतून शहापूरला राहावयास गेल्यावर त्याच्या मारूती गल्लीतील जागेत आम्ही राहू लागलो. बेळगांव येथे असताना चि. श्रीकांत व सौ. नलिनी यांची खूप मदत झाली व सततच्या सहवासाने आत्मीयता उत्पन्न झाली. त्यांनी दोघांनी ती. काका (बाबूराव गोगटे) व ती. आई (आक्कामावशी, चि.श्रीकांतची आई) यांची खूप सेवा केली. सौ. वहिनी

तर इतक्या उत्तम स्वभावाची आहे की मी म्हणे की सून मिळावी तर सौ. नलिनी सारखी! आता मी म्हणते की सून मिळावी तर माझ्या सूनेसारखी – सौ. सुरेखा सारखी!

चि. श्रीकांत व सौ. नलिनीवरही भगवत्भक्तीचे संस्कार असल्याने आमचे छान जमत असे. दोघेही त्यांच्या कामात निपुण होती व स्त्रीरोग तज्ज्ञ म्हणून त्यांनी चांगले नांव कमावले. पुढे निंबाळला जाऊन त्या दोघांनी पूज्य श्री गुरूदेव रानडे यांच्या समाधीची पूजा करून अनुग्रहही घेतला. सौ. नलिनीचे वडील विठ्ठलभक्त होते व आत्या श्री. सुलोचना खांडेकर यांनी 'श्रीरामचरितमानस' चा मराठीत ओवीबद्ध अनुवादही केला होता. त्यांचीही एकदा भेट झाली होती. तिची आजी श्री. भोपटकर यांना पूज्य गुळवणी महाराजांचा अनुग्रह होता. त्यांनी 'गीत वामनेय' लिहिले होते.

***

## कै.श्री. गजानन गंगाधर जोशी उर्फ कै. ती. अप्पाजोशी व विमलाताई

श्री अप्पा जोशी म्हणजे चि. सौ.सुरेखाचे वडील, माझे व्याही. त्यांचे शिक्षणही सातारलाच झाले होते. ते तेथे त्यांच्या ती. मामाच्या घरी राहात होते (श्री आपटे) हे (डॉ. बा. श्री . वैद्य) ही त्याच शाळेत (न्यू इंग्लीश स्कूल मध्ये) शिकले होते. हे त्यांच्या सौ. भीमाआत्याबाई सहस्त्रबुद्धे यांच्या घरी राहत होते. लग्न ठरल्यावर ती अप्पांच्या बोलण्यावरून ते ह्यांना ओळखत असावे असे वाटले. ती. अप्पा चेंबुरला बेगर्स होम मध्ये सुपरिडेंट होते. सौ.विमलाताई ही बी. ए. बी. एड होत्या. शाळेत शिक्षिका होत्या. दोघेही सुस्वभावी, परोपकारी स्वभावाची होती. कष्टाळू होती. मुलांच्या शिक्षणासाठी त्यांनी खूप परिश्रम घेतले. ती. अप्पा खूप चालत असत. ते निवृत्त झाल्यावर सरकारी जागा सोडून ते चेंबुरमध्येच स्वतःच्या जागेत राहात होते. पण नंतर ते अंबरनाथला राहू लागले. त्यानंतर ते कामासाठी रोज फोर्ट मध्ये येत तेव्हा लोकल मध्ये त्यांचे भजनीमंडळ भजन करीत प्रवास करीत असे. सौ. विमलताईंचे माहेर श्री. जोगळेकर (सातारा) यांच्याकडे होते. सातारच्या आसपासच्या लोकांवर श्री. समर्थ

व दासबोध ग्रंथाचा प्रभाव दिसुन येतो. तसाच तो सौ. सुरेखाच्या आजींवर ही होता. त्यांची माझी प्रथम गाठ पडल्यावर 'तुम्ही दासबोध वाचता की नाही?' असा प्रश्न मला केला होता असो. ती. अप्पांचा जवळजवळ रोज फोन येई. आम्ही मुंबईला असताना आणि ते जेव्हा येत तेव्हा बहुतेक काही ना काही खाऊ घेऊन येत. सौ विमलाताईनी परंड्यास येऊन श्री प्रज्ञानानंद सरस्वती स्वामींचा अनुग्रहही घेतला होता. त्यामुळे त्या माझ्या गुरूभगिनीही झाल्या होत्या. त्यामुळे आम्हाला एकमेकीबद्दल विषेश आत्मीयता वाटे. त्या सौ. सुरेखा, चि. रमेश व आमच्या इतर गुरूबंधुभगिनीच्या बरोबर बद्री केदार, बद्री नारायण यात्रेलाही गेल्या होत्या व मालाड येथे पू. किशोरजी व्यासांच्या श्रीमत् भागवतसप्ताहांतही येऊन राहिल्या होत्या. शिवाय मी व त्या १९९४ मध्ये उत्तर भारताच्या यात्रेलाही बरोबर गेलो होतो. यामुळेही आम्हाला एकमेकीचा बराच सहवास लाभला होता. कुणाचेही अंतःकरण त्यांनी कधी दुखावले नाही, परनिंदा नाही, असत्य भाषण नाही. लोकासाठी कष्ट सोसण्याची तयारी इत्यादि अनेक सद्गुण त्यांच्या अंगी होते. चि. सुधीर, सौ. सुरेखा, सौ सुषमा व चि. संजु सर्व सुसंस्कृत आहेत. सौ.सुषमाने तिच्या आई वडिलांची खूप सेवा केली आहे. सौ. सुरेखा बद्दल तर मी म्हणतेच की सून असावी तर सौ. सुरेख़ा सारखी! या मागे तिच्या आई वडिलांनी केलेले संस्कार कारणीभूत आहेत. माझ्या सर्व गुरूबंधुभगिनी, तसेच सर्व नातेवाईक यांची मने तिने जिंकून घेतली आहेत.

***

### श्री. बापूसाहेब अभ्यंकर

श्री. भालचंद्र चिंतामणी अभ्यंकर उर्फ श्री. बापूसाहेब अभ्यंकर हे माझे व्याही होते. ते वाईचे होते व गणेशभक्त, दत्तभक्त होते. त्यांना संस्कृतची फार आवड होती. ते ऑडिटर होते. त्यांनी अत्यंत परिश्रमाने शिक्षण घेतले होते. त्यांची संगति म्हणजे सत्संगतीच होती. चि. मंगलचे लग्न १९६१ साली गुढीपाडव्यास ठरले आणि त्याचवर्षी मे २४ ला मुंबईतच विवाह झाला. तिचा साखरपुडा झाला तेव्हा चित्रकूटचे श्रीसीताराम महाराज नावाचे कुणी सत्पुरूष मला वाटते त्यांच्या डोळ्याच्या ऑपरेशनसाठी

मुंबईला आले होते. ती. बापूंची त्यांच्यावर श्रद्धा होती म्हणून ह्यांना व मला ते त्यांच्या दर्शनास घेऊन गेले होते. श्री महाराज झोपलेलेच होते. पण त्यांना नमस्कार करून आम्ही त्यांच्या अगदी शेजारीच बसलो होतो. इतक्यांत त्यांनी 'मानसा' तील काही चौपाया म्हणायला सुरूवात केली. त्या ऐकल्यावर एकदम मला काय झाले कुणास ठाऊक. एकदम रडू कोसळले. व्याह्यांसमोर हा प्रकार घडला म्हणून मला नंतर लाजल्यासारखे झाले. पण श्री. सीताराम महाराजांचे डोळ्याचे ऑपरेशन नुकतेच झाले होते. त्यामुळे ते आम्हांला पाहू शकत नव्हते. तरी त्यांनी माझ्या डोक्यावर हात ठेवून थोपटल्यासारखे केले. जणू आशीर्वादच दिले! आणि ते रामभक्त होते त्यामुळे मला खूप आनंद झाला. क्षणभराचा सत्संगही अवर्णनीय आनंद देऊन जातो हेच खरे! नंतर त्यांची कधीही भेट झाली नाही. असो.

ती. बापूसाहेब फार धार्मिक वृत्तीचे होते. नित्य स्नान संध्या, गुरूचरित्र वाचन, दर पौर्णिमेस सत्यनारायणाची पूजा ते करीत. कित्येकदा एकेक दिवसाची गुरूचरित्राची पारायणे त्यांनी केली होती. तीर्थयात्रा तर ते श्रद्धेने करीतच. पण गीतेतील तत्त्वज्ञान ते आचरणांत आणीत असत. परोपकार त्यांच्या रक्तांतच भिनलेला होता. परनिंदा, परदोष चर्चा, असत्यभाषण यापासून ते दूर असत. उलट लोकांच्या गुणांचे कौतुक करण्यात त्यांना फार आनंद वाटे. सज्जनगड वरील समर्थ सेवा मंडळाचे ऑडिट ते सेवा म्हणून मानधन न घेता करीत असत. या निमित्ताने ते दरवर्षी सज्जनगडावर दर्शनासाठी जात असत. सर्व नातेवाईकांना त्यांचा आधार वाटे. ह्यांना देवाज्ञा झाल्यावर १९६६ मध्ये ते काही नातेवाईकांबरोबर दत्त दिगंबर यात्रा कंपनी तर्फे नियोजित बद्रीनारायण , बद्रीकेदार यात्रेस गेले होते. तेव्हा मलाही त्यांनी त्यांच्या बरोबर नेले होते. त्यांना आषाढी एकादशीच्या दिवशी हृदयविकाराचा झटका येऊन देवाज्ञा झाली. नुकतीच आंघोळ करून आपली वस्त्रे आपल्या हाताने धुवून मोरीतून बाहेर आले आणि हृदयविकाराचा झटका आला. हॉस्पिटलमध्ये नेले. पण तोवरच सर्व संपले होते! निश्चितच वैकुंठाची प्राप्ती झाली असणार!

***

# श्रीसद्गुरू आणि परिवार

## श्रीसद्गुरू प्रज्ञानानंद सरस्वती स्वामी महाराज

श्री. रामभैय्याचे स्मरण झाले की, ज्याप्रमाणे प्रथम हनुमान आठवतात त्याप्रमाणे श्रीसद्गुरूचे स्मरण झाले की प्रथम ज्यांच्यामुळे श्रीसद्गुरूंचे आगमन झाले त्या श्री. ना. भा. जोशी उर्फ ती. जोशीकाकांची आठवण येते. त्यांच्यामुळेच श्रीसद्गुरू कृपा लाभली आणि मनुष्य जन्माचे सार्थक झाले. आम्हीच नव्हे तर इतरही अनेकांवर जी श्रीसद्गुरू कृपा झाली त्यांसही ति. जोशीकाकाच निमित्त बनले होते. इस्लामपूर येथे श्री. हरि गोविंद अष्टेकर यांच्या अंगणात ति. जोशीकाका रोज संध्याकाळी गीता व तुलसी रामायणावर प्रवचने करीत. ते तत्त्वज्ञान घेवून एम.ए. झालेले होते. त्यात त्यांच्यावर गुरूकृपा झालेली होती आणि त्यात शिक्षकाचा पेशा त्यामुळे प्रवचने उत्तम होत. ति. आऊताई प्रथम प्रवचनास जात असत. इतर ब्राह्मण आळीतली बरीच मंडळी येत. मी, ते चांगले सांगतात हे ऐकून जाऊ लागले पण रमेश २/२।। वर्षाचा रवि५ व मंगळ६ वर्षाची. संध्याकाळची वेळ त्यामुळे व चि. रमेश एका जागी बसून राहणे कठीण त्यामुळे मला नियमितपणे जाता येत नसे. प. पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वतींनी 'श्रीराम चरितमानस' चा जो मराठी समवृत्त–समच्छंद अनुवाद केला होता. त्याची सामुदायिक पारायणे ही श्री. अष्टेकर यांच्या ओसरीवर व अंगणात होत, पण मी थोडावेळ ऐकून परत येई. प्रवचनात ते श्रीसद्गुरूंच्याविषयी भरभरून बोलत. त्यामुळे सर्वांना त्यांच्या दर्शनाची उत्सुकता निर्माण झाली होती.

त्यावेळी पू. स्वामींचा मुक्काम चास–कमान (पुणे जिल्हा) येथे होता आणि त्यांची संकल्पपूर्वक त्रिदिन पारायणे (हिंदीची) चालू होती. एक संपले की लगेच दुसऱ्या दिवशी दुसरे सुरू होई. १०८ पारायणाचा संकल्प होता. त्यावेळी ते पहाटे ५ ला वाचनास सुरूवात करीत ते ११ पर्यंत वाचन चाले. मग भिक्षा व मग विश्रांती वगैरे. चास–कमानहून प्रवास त्यावेळी ५/

६ तासाचा होता. शिवाय सायंकाळी त्यांचे परत स्नान व उपासना असे. त्यामुळे चास–कमानहून दुपारी १ च्या सुमारास निघाले तरी इस्लामपूरला एस. टी. ने यावयाचे म्हणजे रात्र होणार म्हणून ति. जोशीकाका म्हणाले होते की, कुणाची खाजगी गाडी (मोटार) मिळाली तर त्यांना आणता येईल. म्हणजे चासला पारायण संपले की निघून संध्याकाळपर्यंत इस्लामपूरला येता येईल व दुसऱ्या दिवशी पहाटे परत नविन पारायण सुरू करता येईल. हे सर्व ऐकल्यावर मला वाटले की आमच्या गाडीवर ड्रायव्हर पण आहे. तर आपली गाडी त्यांच्या श्रीसद्गुरूंना आणण्यासाठी दिली तर बरेच होईल! म्हणून ह्यांना मी विचारले आणि आश्चर्याची गोष्ट म्हणजे हे लगेच 'हो' म्हणाले! त्यावेळी आश्चर्य वाटले आणि आनंदही झाला. पण आता मागे वळून पाहताना वाटते की, पू. स्वामींशी आमचा ऋणानुबंध खूप पूर्वीचा असला पाहिजे म्हणून आम्हाला तशी इच्छा झाली!

ठरल्याप्रमाणे १९५१ मार्च ३१ तारखेस श्रीं चे इस्लामपूरला प्रथम आगमन झाले. त्यावेळी आमच्या गाडीतून येऊन आमच्या दारापुढेच ते गाडीतून उतरून चालत बोळातून ति. जोशीकाकांच्या घरी गेले. पण मला सुचले नाही की, प्रथम त्यांचे औक्षण करून त्यांचे चरण कमल आपल्या घराला लागावे म्हणून त्यांना विनंती करावी! पण पुढे रामभैय्याच्या कृपेने त्यांचे आमच्या घरातच भरपूर वास्तव्य झाले आणि भरपूर सहवास आणि अपार कृपा लाभली. ति. जोशीकाकांचे घरी माझे पती डॉ. बा. श्री. वैद्य, मी व कुटुंबातील इतर मंडळी पू. स्वामींच्या दर्शनासाठी जात असू तेथे काही पारमार्थिक चर्चा चाले. श्रीं चा संध्या आणि नित्यकर्म करण्यावर फार भर होता. माझ्या कै. मामंजींनी म्हणजे डॉ. श्री. म. वैद्य यांनी साधुसंतांचा देवयानपंथ, 'प्रणवोपासना', 'षटचक्रदर्शन व भेदन' इत्यादी ग्रंथ लिहिले होते. ते आम्ही पू. स्वामींना दाखविले. ते त्यांना खूप आवडले. ते म्हणाले, 'तुमच्या वडिलांनी एवढे ग्रंथ लिहिले आहेत' 'प्रणवोपासना' आदि तर तुम्ही रोज संध्या करायला हवी. त्यांच्या बोलण्याचा परिणाम झाला आणि हे रोज संध्या करू लागले. विशेषत: दोन्हीवेळा आणि रोज गायत्री जप, ब्रह्मयज्ञ, श्रीगुरूचरित्रवाचनही सुरू झाले. संध्याकाळी श्रीदत्तांची आरती करून करूणाष्टके, क्षमापराधन स्तोत्र, शेजारती वगैरे म्हणत

असत. ह्यांची मुंज ठरली आणि ती होण्यापूर्वीच श्रीदत्त महाराज समाधिस्थ झाले. पण त्यापूर्वी त्यांनी ह्यांच्यासाठी अक्षता मंत्रून ठेवल्या होत्या. पू. स्वामींना हे सर्व कळल्यावर त्यांनी आम्हाला दर पौर्णिमेस अष्ट्याला जाऊन त्यांच्या समाधीवर अभिषेक करण्यास सांगितले होते. त्याप्रमाणे आम्ही वर्षभर दर पौर्णिमेस अष्टे येथे जाऊन अभिषेक, पूजा करून येत असू. श्रीदत्त महाराज नेहमी सोवळ्यात असत. प. पू. स्वामीही नेहमी सोवळ्यात असत, कुणाला स्पर्श करू देत नसत आणि स्वत: कधीही पैशाला स्पर्श करीत नसत. हे पाहून आमच्या मनात एक प्रकारचा प्रेमादर उत्पन्न झाला. त्यातच डॉक्टरांना स्वप्न पडून आपल्या वडिलांनी श्रीं चे पाय धरलेले आहेत असे दिसले. तेव्हा वडिलांनी जणू आपल्याला हे मार्गदर्शन केले असे मनात येऊन त्यांची श्री स्वामींच्यावर दृढ श्रद्धा बसली, ती शेवटच्या श्वासापर्यंत टिकून होती.

सन १९५१ मध्ये पाडव्यापासून श्रीरामनवमीपर्यंत श्री. अष्टेकर यांच्या अंगणात मराठी तुलसी रामायणाचे पारायण (सामुहिक) झाले. श्रीं चा मुक्काम इस्लामपूरात असल्याने पारायणास वेगळाच रंग चढला. सकाळी पारायणाच्यावेळी ते हजर नसत पण संध्याकाळी त्यांचे प्रवचन होई. ह्यांना आणि मला श्री स्वामींनी पहाटे ध्यानाच्यावेळी आसन वगैरे घेऊन बोलावले होते. आम्ही चैत्र शुद्ध दशमीच्या दिवशी पहाटे त्याप्रमाणे ति. जोशीकाकांच्या घरी गेलो. आम्ही आसनावर बसून पू. स्वामींनी सांगितल्याप्रमाणे नमन करून डोळे मिटून बसलो. त्यानंतर श्रीं नी दीर्घ प्रणवोच्चार केला आणि त्यायोगे ह्यांची आणि माझी कुंडलिनी जागृत होऊन आम्हाला देवयान पंथातले विविध अनुभव येऊन परमानंद झाला. ह्यांना सरोवरात मोठे कमळ आहे. त्यातच उजवा पाय खाली पाण्यात सोडून श्रीदत्तगुरू बसलेले आहेत आणि उजवा हात उचलून हसतमुखाने आपल्याला आशीर्वाद देत आहेत असे दिसले. मला एकदम अनाहत नाद ऐकू येऊ लागून अष्टसात्विक भाव जागृत होऊन मन एकाग्र होऊन आनंद झाला. अशाप्रकारे हा गुरूशिष्य संबंध प्रस्थापित झाला. नंतर आमच्या घरी निवास करण्याची विनंती आम्ही केली आणि भगवंताच्या कृपेने त्यांनी मान्यही केली. आमच्या घरीच त्यांचे वास्तव्य असल्याने आम्हांला संतसंगतीचा दुर्लभ

लाभ झाला आणि आमची साधनाही उत्तमप्रकारे होऊ लागली. आमच्या घराण्यात श्रीदत्त उपासना चालू होती म्हणून ह्यांना श्रीं नी दत्तमंत्र दिला आणि मला रामाची आवड म्हणून त्रयोदशाक्षरी राममंत्र दिला. ह्यांना नित्यजप आणि ध्यानाच्यावेळी प्रकाशरूप परमात्म्याचे बहारीचे अनुभव येत. झोपेतही त्याच प्रकारची स्वप्ने पडत आणि दीर्घ प्रणवोच्चारही होई. प्रकाशरूप परमात्मा कधी शुभ्र असा स्थिर प्रकाशरूप तर कधी नील प्रकाशाच्या लहरीची वलये दुरून येऊन आपल्या भोवती स्थिर होत आहेत. एकावर एक अशी असंख्य वलये होता होता सर्व आकाश निळ्या प्रकाशाने भरून गेल्याचा अनुभव येई. कधी ध्यानाभ्यासाच्यावेळी त्यांच्या असंख्य विविध मुद्रा होत. दोन्ही हातांनी एकाचवेळी अगदी एकसारख्या, ज्यांची नांवेही माहित नाहीत अशा मुद्रा होत.

एके दिवशी सकाळी ७–७। वाजता हे फिरावयास गेले असताना त्यांची वृत्ती एकाएकी दत्ताकार झाली आणि श्रीदत्त आपल्या इतक्या उंचीचे, आपल्याबरोबर येत आहेत असे बराचवेळ दर्शन झाले व अष्टसात्विक भाव जागृत झाले. यानंतर कधी कधी श्रीदत्तांच्याबरोबर श्री रामकृष्ण परमहंस, श्री विवेकानंद, तर क्वचित हनुमान यांचे दर्शन होई. ह्यांची या मार्गातील प्रगती उत्तमप्रकारे होत होती. एकदा ह्यांनी श्रीसद्गुरूंच्या आदेशावरून सात श्रीगुरूचरित्राचे सप्ताह एका पाठोपाठ एक सर्व यमनियम ब्रह्मचर्य पाळून केले. नंतर समाप्तीनंतर पाच घरी भिक्षा मागून आलेल्या धान्याने श्रीदत्तप्रभूंना नैवेद्य करून श्रीसद्गुरूंसह नैवेद्य ग्रहण करून अनुष्ठानाची सांगता केली.

एकदा श्रीं नी आम्हा उभयतांना असा आशीर्वाद दिला की 'हृदये पश्यच्च आत्मानम् । स त्वमेव त्वमेव तत् ।' अर्थातच हा आशीर्वाद फलद्रूप झाल्याशिवाय कसा राहील? ह्यांची अशी खात्री व दृढ विश्वास होता की सद्गुरू कृपेने आपल्या देहाचे सार्थक होणार! ते नहमी दत्तप्रभूवर सर्व भार घालीत असते.

(श्री दत्तांशी त्यांनी बंधूचे नाते जोडले होते. ते रोज आत्मनिवेदन करीत असत. 'देव होऊनी देवासी भजावे' तसे 'अहं दत्तात्रेय' असा भाव येऊन दत्तानीच दत्ताची पूजा केली असा अनुभव त्यांना आला होता.)

पू. स्वामींनी मला त्रयोदशाक्षरी राममंत्र दिलेला होता. तो देण्यापूर्वीही शक्तिपात दीक्षा झाली होती, तेव्हा एका आठवड्याच्या आतच अनाहत नादांपैकी सर्व दशविध नादांचा अनुभव मला आला होता. श्रीं च्या कृपेने केव्हाही भगवत् स्मरण वंदन करून ध्यानाभ्यासास बसले की लगेच वृत्ती इतकी अंतर्मुख होऊन एकाग्र होई की बाहेर यायलाच तयार नसे. त्यामुळे जेव्हा केव्हा कुणी विचारतात की मन ध्यानात एकाग्र होत नाही तर काय करावे, तेव्हा मी त्यांना काहीच सांगू शकत नाही!

श्रीं च्या सांगण्यावरून मी श्रीरामाशी बंधूचे नाते जोडले होते. (१९५३ मध्ये असेल) तेव्हापासून ते मनांत इतके दृढ झाले आहे की, सांगता येत नाही! १९५३ पासून पू.स्वामींचे वास्तव्य जास्त करून आमच्या घरीच होते. रामायणावरील टीकेचे लेखन माडीवरील खोलीत चाललेले असे. मध्येच पू. स्वामी जिन्याशी येऊन मुद्दाम मला हाक मारीत असत आणि रामायणांतील टीकेतील नवीन सुचलेले भाव मला सांगत असत. त्यावेळी त्यांची प्रसन्नता पाहून आणि आपलेवर रामभैय्याची किती कृपा आहे हे पाहून अंत:करण भरून येत असे.

मी दुपारच्यावेळी खालच्या खोलीत रामायणावर प्रवचन करीत असे. श्रवणास आमच्या आळीतील १०/१२ बायका येत. रोज दुपारी ३ ते ५ वाजेपर्यंत प्रवचन, भजन असा आमचा सत्संग १९५३ ते १९६५ पर्यंत हे आजारी झाले तोपर्यंत १२ वर्षे श्रीसद्गुरूकृपेने चालू होता. फक्त अधूनमधून मी ह्यांच्या बरोबर कुठे गावाला गेले तरच ह्यात खंड पडत असे. रामायण श्रवणाचा परिणाम असा झाला की श्रवणास येणाऱ्या भगिनीपैकी एक दोघी सोडून इतरांनी 'हरे राम हरे राम' या बत्तीस अक्षरी मंत्राचा ५०/५० हजार जप करून श्रीं चा अनुग्रह प्राप्त करून घेतला. स्वामींच्या लिहून झालेल्या 'मानसा' वरील टीकेच्या वह्या मी वाचून दाखवीत असे. त्याचा आणि श्रीसद्गुरूंच्या कृपेचा परिणाम असा झाला की ज्यावेळी आम्ही मराठी तुलसी रामायणाचे सामुदायिक पारायण करत असू तेव्हा वाचन सुरू झाले की एकेका भगिनीला त्यातील एकेका पात्राचा भाव येई. जणु आमची रामलीलाच चाले. हनुमंत, जांबवान वगैरेंचे भाव आले की बुभु:कार अभावितपणे सुरू होई. दशरथांचा भाव आला की रामविरहाने प्राणांतिक

अवस्था होई इतकी की भीती वाटे की, खरेच प्राण तर जाणार नाहीत, म्हणून हा भाव येणाऱ्या व्यक्तीला त्या प्रसंगाच्या वाचनापूर्वी आम्ही घरी धाडून देत असू किंवा काही अनिष्ट घडू नये म्हणून मला श्रीसद्गुरूंचा धावा करावा लागे. असा रोजच्या रोज आमचा आनंद सोहळा श्रीसद्गुरूकृपेने जवळजवळ बारा वर्षे चालू होता. हे एक महान आश्चर्यच होते. या काळात एक दोघींना काव्यस्फूर्तीही झाली. अनेक सुंदर पदे सहज झाली. माझ्याकडूनही अनेक काव्ये भराभर होऊ लागली. स्वयंपाक वगैरे करतानाही एखादे पद, काव्य सहज स्फुरत असे खरोखर स्वामींच्या कृपेने काय घडत होते हे आठवले तरी डोळे अश्रुंनी भरून येतात.

जप करताना वृत्ती इतकी एकाग्र होई की जप चालू असे पण माळ हातात जशीच्या तशीच राही. मणी कोण ओढणार? त्यामुळे जपसंख्या मोजता येत नसे. अनेकवेळा 'राम हमारा जप करे हम बैठे आराम' अशी स्थिती असे आणि असतेही. तसेच पूर्वी मासिक पाळीच्यावेळी बाजूला बसावे लागे. त्यावेळी निवांत बसले की कुंडलिनीच्या क्रिया आपोआप सुरू होत याबद्दल पू.सद्गुरूंना विचारले होते की, 'या स्थितीतही कुंडलिनीच्या क्रिया अथवा मानसिक जप आपोआप होतो तर काय करू?' ते म्हणाले होते की, 'जे सहज आपोआप होत असेल ते होऊ द्यावे! आणि नाम तर श्वासाबरोबर यावयासच हवे. आपण कधी असे म्हणतो कां की मी श्वास घेऊ की नको?' असो.

एकदा श्रीं नी मला विचारले की 'कमा तुला मांजराचे पिल्लू होणे आवडले की वानरीचे पिल्लू होणे आवडेल?' मी म्हटले, 'मांजरीचे! मांजरीच्या पिल्लावर स्वत:वर कधीच जबाबदारी नसते. पिल्लांची सारी जबादारी मांजरीवर असते. नुसते म्यॉंव म्यॉंव करावे आणि आई तोंडात धरून नेईल तिकडे जावे! माकडिणीच्या पिल्लाला स्वत: आईला घट्ट धरून ठेवावे लागते. आपली जबाबदारी आपण घ्यावी लागते' असे म्हटल्यावर ते हसले आणि म्हणाले, 'आहेस शहाणी आहेस!' एकदा असे झाले की, तुलसी रामायण सतत वाचनात असल्याने त्यातीलच (उत्तरकांड दोहा १२० मधील चौपाई १८ व १९) विचार मनांत घोळत राहिले होते.

**सब कर फल हरि भगति सुहाई । सो बिनु संत न काहूँ पाई ।**

**अस बिचारि जोइ कर सत संगा । राम भगति तेहि सुलभ विहंगा ।।**

या ओळींचा पार अंत:करणाच्या गाभाऱ्यात प्रवेश झाला आणि काही सुचेना. मनाला वाटू लागले की, संतकृपेने क्वचित कुणाला अशी भक्ती मिळते हे जर खरे असेल तर घरी श्रीसद्गुरूसारख्या संतांचा साक्षात निवास आहे. तर अशी संधी आपण सोडता कामा नये. ह्या संधीचा लाभ आपण घेतला नाही तर मागून जन्मभर पश्चाताप करीत बसावे लागेल. आपण श्रीगुरूंना विनंती तर करून पाहू. फार तर काय, 'मूर्ख आहेस!' म्हणतील. नुकसान तर काहीच होणार नाही. झाला तर लाभच लाभ होईल! म्हणून एकदा धारिष्ट केले! रात्री भजन वगैरे झाल्यावर सर्व मंडळी घरोघर गेली. पूर्ण शांतता होती. स्वामीही अत्यंत प्रसन्न होते. तेव्हा हात जोडून दाराशी उभी राहिले श्रीं नी विचारले, 'हे काय अजून तू इथेच? काय हवे आहे?' मी म्हटले, 'महाराज, मला काही मागायचे आहे, विचारावयाचे आहे.' श्री म्हणाले, 'मग सांग ना काय ते!' आणि मग अशी काही बोबडी वळली होती! आधीच रडू कोसळले. तोंडातून शब्द फुटेना. 'अगं का रडतेस? काय झाले?' म्हणून श्रीं नी विचारताच 'आपल्या कृपेने मला रामप्रेम भक्तीचा लाभ व्हावा' असे शब्द कसेबसे उच्चारले. हे श्रीं नी ऐकल्यावर मनमोकळे हसले आणि म्हणाले, 'भाग्यवान आहेस! होईल बरे तुझी इच्छा पूर्ण! झाले ना आता मनासारखे? जा आता झोप जा.' असे म्हटल्यावर काय आनंद झाला म्हणून सांगू!

श्रीं नी आशीर्वाद दिला आणि काय चमत्कार झाला कुणास ठाऊक! खरोखरंच एकदम भक्ती मिळाली की! काही साधन नाही, जप नाही, तप नाही, भजन नाही, काहीच नाही, केवळ गुरूकृपा! भागवतात वर्णन केल्याप्रमाणे घटकेत एकदम प्रभूचे भक्तवात्सल्य आठवून हसू येऊ लागे. ते हसणे थांबवताच येत नसे. तर घटकेत 'रामा, अजून तुला माझी नाही का रे दया येत?' असे मनात येई आणि जे रडू कोसळे त्याने अंत:करण अगदी पिळवटून निघे. अक्षरश: धुण्याचा पिळा पिळावा तशी स्थिती होई. कधी कधी 'गुरू महाराज गुरू' किंवा 'रामकृष्णहरी' असे भजन आपोआप सुरू होई आणि अंत:करणात अशा सुखाचा अनुभव येई की..... त्या सुखाचे वर्णन कसे करता येईल? भक्तिप्रेम सुखाचे वर्णन करता येत नाही असे

जे नामदेवादि म्हणतात त्याची प्रचिती सद्गुरूकृपेने आली आणि अद्याप ५९ वर्षानंतरही येत आहे. केवळ 'तुला भक्ती दिली' असे म्हटल्यावर ती एखाद्याला मिळाली यात श्रीस्वामींचे केवढे सामर्थ्य आहे हे दिसून येत आहे.

या भक्तिप्रेमाच्या आवेगामुळे मला सांसरिक कर्तव्ये नीट पार पाडता येईनाशी झाली. त्यावेळी गोरा कुंभारानी आपल्या मुलाला पायाखाली तुडवले जात असताना भजनानंदामुळे त्यांना ते कसे कळलेही नाही याची झलक कळून आली. त्यावेळी मुले लहान होती, शिकत होती. घरात पाहुण्यांचा नेहमीच राबता होता. त्यामुळे सगळा गोंधळ उडू लागला. तेव्हा या सर्व गोष्टींचा विचार करून मी आणि ह्यांनी श्रीं ना हा भक्ति प्रेमाचा आवेग कमी करण्याची विनंती केली तेव्हा ते म्हणाले होते, 'सगुण साक्षात्कार हवा असेल तर हे सर्व अपरिहार्य आहे. पण तुम्ही म्हणता तर ठीक आहे. तुझे म्हणणेही बरोबर आहे. रामाबद्दलचे तुझे प्रेम कमी होणार नाही, पण त्याचा आवेग तुला सोसवत नाही तो कमी करून टाकू!' आणि म्हणून त्यानंतर सर्व आटोक्यात आले. श्रीं च्या जवळ अनुग्रहाप्रमाणे निग्रह करण्याचेही सामर्थ्य होते. असे श्रीसद्गुरू भेटणे, त्यांची पूर्ण कृपा लाभणे ही गोष्ट किती दुर्लभ आहे! केवळ रामभैय्याची कृपा म्हणूनच हे सर्व घडून आले!

पूर्वी मला कधी कधी पोटातील अल्सरचा त्रास होऊन खूप उलट्या वगैरे होत. ज्यावेळी भक्तिचा आवेग अत्यंत प्रबळ होता तेव्हा म्हणजे १९५३-१९५४ मध्ये असेल, मला खूप उलट्या होऊन प्रकृति काहीशी गंभीर झाली होती. पण माझे आतून भजन सुरू झाले की असे होऊ लागे की, शरीराच्या कणाकणातून, रोमारोमातून भजन होऊ लागे आणि आवेग अधिक असला तर चक्क नाचायला होत असे. शरीराची अवस्था कशीही असली तरी आवेग आणि त्याबरोबर आनंदाला उधाण येत असे. ते आवरता आवरत नसे आणि अजूनही तीच स्थिती कधी कधी होते. अशावेळी 'फुटो हे मस्तक, तुटो हे शरीर, नामाचा गजर सोडू नये' अशी स्वाभाविक स्थिती होते. ती वर्णन करता येत नाही. फक्त अनुभवता येते. केवळ गुरूकृपा असेल तरच! असो. तर माझी शारिरीक स्थिती ठीक नव्हती,

काहीशी गंभीरच होती आणि भजनाचा आवेग तर आवरत नव्हता, त्यामुळे ह्यांनी, मी जेथे आमच्या खोलीत भजनात दंग होते तेथे पू. स्वामींना बोलावून आणले होते, कारण ह्यांना माझ्याबद्दल काळजी वाटली होती. पू. स्वामी तेथे आले आणि म्हणाले, 'कमा! शांत हो! शांत हो! हे चरण तुझ्याकडे गहाण आहेत. आता आणखी तुला काय देऊ!' आणि हे शब्द कानावर पडताच आवेग शांत झाला आणि अंत:करण इतके भरून आले आणि मी बसल्या जागेवरूनच श्रीं ना नमस्कार केला. ही घटना घडून ५५ वर्षे उलटून गेली आहेत. पण श्रीं चे चरण अजून मजजवळ गहाण आहेत कारण त्यांचीच तशी इच्छा आहे!

सन १९५३ मधीलच गोष्ट आहे. ह्यांना बरे नव्हते. मुंबईला जाऊन उत्तमोत्तम डॉक्टरांना दाखवले पण दुखण्याचे निदान होईना. पू. स्वामींना हे कळले तेव्हा चास-कमानहून निघून ते थेट मुंबईला आले आणि श्री. गोपाळ कृष्ण घाटे (माझे गुरू बंधु) यांच्या घरी उतरून त्यांना घेऊन माझ्या माहेरी आम्ही राहात होतो, तेथे आले. दुपारी दारांवरील घंटा वाजली म्हणून दार उघडले तर समोर प्रत्यक्ष श्रीस्वामी दारांत उभे! दारांतून ते लगेच आतच आले. औक्षण वगैरे काहीच उपचार करता आले नाही! 'पू.स्वामी आले, स्वामी आले' ऐकून हे खोलीत झोपले होते तेथून उठून बाहेर आले आणि नमस्कार करू लागले तर स्वामींनी तत्पूर्वीच त्यांना मिठीच मारली. श्री. घाटेकाका म्हणाले, 'बाळासाहेब, तुमचे दुखणे पळाले असे समजा!' नंतर पू. स्वामींनी माझ्या वडिलांना सांगितले की, 'आम्ही बाळ आणि कमाला चास-कमानला घेऊन जायला आलो आहेत!' आश्चर्य म्हणजे कुणीही विरोध केला नाही! दुसरे दिवशी आमच्या घरच्या गाडीने पू. स्वामी हे, चि. रमेश व मी अशी चास-कमानला जाण्यास निघालो. वाटेत चौकला श्री. रघुनाथराव जोशी यांच्याकडे थांबलो होतो. त्यावेळी पू. सौ. द्वारकाताई जोशी उर्फ सौ. कमल दत्तात्रेय कर्वे यांचे प्रथम दर्शन झाले. पू.स्वामींचे अचानक दर्शन झाल्याने त्या सर्वांनाही अतिशय आनंद झाला. तेथे चहा-पाणी झाल्यावर पुढे पुण्यावरून आम्ही चास-कमानला पोहोचलो.

तेथे विठ्ठल मंदिरास लागूनच मठ होता. तेथे खाली एक ओसरीवजा

खोली होती, पलिकडे लागूनच जिना होता. तो चढून गेल्यावर दोन खोल्या माडीवर होत्या. जाताक्षणीची खोली जरा लहान होती. त्याला लागून असलेली खोली मोठी होती. तेथे पूर्वी आम्ही चासला श्रीगुरूपौर्णिमेसाठी आलो होतो तेव्हा उतरलो होतो. आता ह्यांची तब्येत बरी नव्हती म्हणून आमचा मुक्काम खालील ओसरीवरच होता. पण तेथे राहिलो तरी श्री. गुळाणीकर काकांनी मला गेल्याबरोबर बजावले होते की, मी फक्त ह्यांची काळजी घ्यायची बाकी काहीही करावयाचे नाही. मी माहेरवाशीण असल्याने चहापाणी, जेवणखाण सर्व त्यांच्या घरी करावयाचे. दुसरे दिवशीपासून पू.स्वामींनी ह्यांना 'संजिवनी चिकित्सेप्रमाणे' औषधोपचार करण्यास सुरूवात केली. त्यांना वेळच्यावेळी औषधे देणे व पोटावर घड्या वगैरे ठेवणे व माझा रोजचा जप, रामायण वाचन हेच तेवढे मी करीत असे. या व्यतिरिक्त इकडची काडी तिकडेही मला करावी लागली नाही. ती. काका, सौ. माई, चि. बापू, सौ. वहिनी प्रेमाने आम्हां तिघांचे सर्व सांभाळीत असत. आता अजून आठवले तरी अंत:करण भरून येते. पू.स्वामींच्या कृपेमुळेच हे सर्व झाले! पण इतके नि:स्वार्थी प्रेमजगात क्वचितच आढळून येते. पू.गुळाणीकर काकांची पू.स्वामींच्या वर दृढ श्रद्धा होती. ते पू.स्वामींना कधीही पाठ दाखवित नसत. त्यांच्याकडे मुख करून मागेमागे चालत जाऊन दाराबाहेर पडले की मगच वळून चालू लागत. पू.स्वामींचा शब्द ते कधी खाली पडू देत नसत. त्यांच्या शब्दावरूनच त्यांनी आपली मुलगी शशी डॉ. चि. तात्यास उर्फ बंडास दिली होती. या दोघांचा सहवास आणि प्रेम अद्यापही मला लाभत आहे.

पू.स्वामी रोज आपल्याबरोबर ह्यांना सकाळ संध्याकाळ फिरावयास नेत असत. त्यामुळे आणि संजिवनी औषधोपचारामुळे आणि मुख्यत: गुरूकृपेमुळे ह्यांची तब्येत चांगली सुधारली. तेव्हा इस्लामपूरला परत जायचे ठरले आणि पू.स्वामींच्या आज्ञेवरून श्री.गुळाणीकर काकाही आमच्याबरोबर इस्लामपूरला आमच्या घरी आले. ह्यांच्याबरोबर ते रोज सकाळ संध्याकाळ फिरावयास जात आणि संजिवनी औषधोपचाराबद्दलही मार्गदर्शन करीत. त्यांच्या सत्संगाचा आम्हाला लाभ झाला.

पू.स्वामींच्या सान्निध्यात ध्यानाला बसले की वृत्ती लगेच इतकी

अंतर्मुख होई की उठताच येत नसे. बरेचवेळा पू.स्वामी श्लोक म्हणत व मग मी उठू शकत असे. एकदा काही कारणाने घरांत बऱ्याच गुरूभगिनी जमल्या असताना पू.स्वामी त्यांना म्हणाले की, 'आज तुम्ही हिचे घर सांभाळा, बघू या कितीवेळ बसते ती!' आणि त्या दिवशी पहाटे रोजच्यासारखी काकडआरती वगैरे झाल्यावर मी जी ध्यानाला बसले ती हे घरी (दवाखान्यातून) आले तरी मला पत्ताच नव्हता. पू.स्वामींनी ह्यांना सांगून फोटोग्राफरला बोलावून माझा फोटो काढावयास सांगितला व त्याप्रमाणे फोटोग्राफर फोटो काढून गेला तरी मला काहीच पत्ता नव्हता. शेवटी पू.स्वामींनी दुपारी दीड, दोनच्या सुमारास परत मला श्लोक म्हणून उठवले तेव्हा उठू शकले! तरी फोटो हातात पडेपर्यंत मला आपला फोटो काढला गेला आहे याचीही कल्पना नव्हती.

पुढे प.पू.स्वामी लिहित असलेल्या 'मानस गूढार्थ चंद्रिका' या श्रीरामचरितमानसावरील मराठी टीकेची समाप्ती दिनांक ८/८/१९५५ ला सातारला अदालत वाड्यात श्री. जोशीकाका राहात होते तेथे झाली. तेव्हा नंतर ९ दिवसात ९ पारायणे 'हिंदी श्रीरामचरितमानसा' ची करण्याचे पू.स्वामींनी ठरविले होते आणि त्याप्रमाणे ज्यांना श्रवणाची इच्छा असेल त्यांनी सातारला यावे अशा सूचना सर्वांना गेल्या होत्या. तेव्हा ह्यांनी सर्व पेशंटस्च्या १०/१२ दिवसाच्या औषधाची व्यवस्था करून ठेवली आणि मुलांसह आम्ही सातारला गेलो. तेथे शनिवार (माचीवर) अदालत वाड्यापासून अगदी जवळ माझ्या ति. सौ. मावस सासुबाई राहात होत्या. त्यांच्याकडे उतरलो आणि मुलांना त्यांच्याकडेच सोडून हे व मी मुक्कामाला ति.जोशीकाकांच्याकडे गेलो. दुसरे दिवशीपासून पारायणास सुरूवात होणार होती. पहाटे उठून सर्व स्नान वगैरे आवरून आम्ही गुरू बंधु-भगिनी पारायण होणार होते त्या हॉलमध्ये जमलो. एकंदर आम्ही चौदाजण श्रोते होतो. प. पू. स्वामी त्यांच्या आसनावर बसले होते. त्यांच्या उजव्या बाजूस ओळीने पुरूष व डाव्या बजूस आम्ही बायका आपापल्या आसनावर बसत असू. ति. जोशीकाका चौरंगावर सत्यनारायणप्रमाणे सर्व श्रीराम परिवाराची प्रतिष्ठापना, पूजा करून हवन आदि करीत आणि नंतर वाचनास सुरूवात होत असे. पहिल्याच दिवशी पूजेला सुरूवात करून देवतांचे आवाहन

केल्यावर जे माझे देहभान गेले ते रात्री त्यांनी सर्व झाल्यावर विसर्जन केल्यावर मी भानावर आले तोपर्यंत रात्रीचे नऊ तरी वाजले असतील. एवढा सर्व वेळ 'मी' कोण, कुठे आहे, काय चालले आहे वगैरे मला कशाचाच पत्ता नव्हता, ना तहान, ना भूक, ना निद्रा अशी काही विलक्षण स्थिती होती. तेवढ्या वेळात तेथे काय चालले होते, पू. स्वामींनी वाचताना पाणी वगैरे घेतले की नाही, इतरांनीही काही घेतले का, किंवा मध्ये कुणी उठले होते का वगैरे काहीच मला कळले नाही. 'मी' चाच पत्ता नव्हता तर आपले यजमान अथवा मुले यांचे स्मरण तरी कसे होणार? असो रात्री सर्वांनी फराळ केला आणि सर्व झोपले. मी वेगळ्याच जगात वावरत होते म्हणून कुणाशी काही बोललेही नाही किंवा कुणाची चौकशीही केली नाही.

दुसऱ्या दिवशी आम्ही सर्व आवरून आपापल्या जागेवर बसण्यासाठी आलो तर मी आदल्या दिवशी बसले होते त्या जागी गादीची बैठक घातलेली होती. टेकायला तक्क्या, आसनावर रेशमी वस्त्र अंथरलेले! मी पाहून एकदम थक्क होऊन पाहात राहिले आणि नुसते 'हे काय' एवढेच बोलले. तेव्हा पू. स्वामींनी खूण करून तेथे बसायला सांगितले आणि मी कळसूत्री बाहुलीप्रमाणे जाऊन त्या आसनावर बसले मात्र की परत माझे देहभान हरपले ते एकदम रात्री परत आले. संपूर्ण ९ पारायणे होईपर्यंत रोज हाच क्रम चालू होता. ते नऊ दिवस कसे गेले ते मला कळलेच नाही. नंतर याची सांगता झाल्यावर मग मला इतरांकडून कळले की पू. स्वामींचे वाचन सुरू असता तेथे रामलीलाच चालत असे. त्यावेळी ह्यांना दशरथांचा तर ति. जोशी काकांना कैकयीचा भाव येत असे. श्री. पाठकजींना परशुरामाचा भाव येई एवढे ह्यांनी सांगितलेले आता आठवते. पण मला काहीच दाद नव्हती, तर काय सांगणार? पूर्वी चरित्र (गद्य) लिहिले तेव्हा हे काही अनुभव त्यात लिहिले नव्हते, कारण आपले अनुभव शक्यतो कुणाला सांगू नये असे म्हणतात. पण पुढे १९९० नंतर मी पू.स्वामींच्या आज्ञेवरून, त्यांचा अनुग्रह घेण्याची इच्छा असणाऱ्यांना समाधीची पूजा करायला लावून तिच्यावर माळ ठेवून नवीन गुरूबंधू भगिनींना मार्गदर्शन करू लागले. तेव्हा श्रीसद्‌गुरूंच्या ठिकाणी काय सामर्थ्य होते ते नविन गुरूबंधु भगिनींना कळावे म्हणून कधी कधी ते सांगितले जाऊ लागले.

त्यात एकदा सौ. रेखा पटवर्धनकडे अनुष्ठानाच्या निमित्ताने आम्ही बरीच मंडळी जमलो असता मंगलाताई ओकने स्पष्टच विचारले की, 'तुला निर्विकल्पाचा अनुभव आला आहे कां?' आता अशी पंचाईत झाली की, हो म्हणावे तर आत्मप्रौढी ठरेल की काय? बरे नाही म्हणावे तर कृतघ्नतेचा दोष येणार! शिवाय पू. स्वामींनी स्वहस्ते त्यांच्या छोट्या डायरीत माझ्या नांवापुढे निर्विकल्पाचा अनुभव आल्याचे स्वहस्ते नमूद केले होते. त्यामुळे सर्व सांगायचे ठरविले. शिवाय असेही वाटले की, पू.स्वामींनी जर त्यांच्यावर प. पू. बाबा गंगादासांनी आणि प. पू. वासुदेवानंद सरस्वती स्वामी (पोटे स्वामी) यांनी कशी अपार कृपा केली हे सांगितले नसते तर त्यांची योग्यता आपल्याला कशी कळली असती? म्हणून आपणही पू. स्वामींनी आपल्यावर जी अपार कृपा केली आहे हे सांगणे आवश्यक आहे. असो तोपर्यंत माझा पू. स्वामींच्या आज्ञेवरून काढला गेलेला फोटो सुद्धा कुणाला दाखवला गेला नव्हता. असो.

सन १९५५ मध्ये पू. स्वामींच्या अनुज्ञेनेच चि. रमेशची मुंज करायची ठरविली. १२ मे चा मुहूर्त ठरला होता. विशेष म्हणजे पू. स्वामींनी सन्यास घेतल्यापासून ते कुणाच्याही घरच्या लग्न, मुंजीसारख्या कार्याला उपस्थित राहिले नव्हते. पण आमच्या भाग्याने पू. स्वामींचे वास्तव्य या शुभकार्याच्यावेळी आमच्या घरीच होते. मुंज लागल्यानंतर जेव्हा पित्याने पुत्राला गायत्रीमंत्राचा उपदेश द्यावयाचा असतो तेव्हा मंडपात पू.स्वामींच्या आदेशावरून फक्त हे, चि. रमेश व पू. स्वामी उपस्थित होते. उपदेश देण्यापूर्वी गायत्री मंत्रोपदेश देण्याचा अधिकार प्राप्त व्हावा म्हणून आवश्यक असणारा जपही ह्यांनी केला होता. ह्यांनी जेव्हा चि. रमेशला गायत्री मंत्रोपदेश केला त्यावेळी चि. रमेशला साक्षात श्रीगायत्रीचे दर्शन झाले होते.

(त्यांनी मंगलाष्टकेही करून दिली होती. ती मी इतरांना त्यांच्या मुलांच्या मुंजीच्यावेळी म्हणण्यासाठी देते.)

पू. स्वामी नंतर माडीवरील त्यांच्या खोलीत जाऊन स्थानापन्न झाले होते. मी खाली आमच्या देवघरात जप करीत बसले होते. तेवढ्यात मंडपातून चि. रमेश थेट माझ्याकडे आला आणि मला विचारू लागला की, 'आई, हातात चाबूक असणाऱ्या देवीचे नांव काय?' मी म्हटले, 'मला

माहित नाही रे! असे कर तू वर जाऊन पू.स्वामींना विचार ना!' तेव्हा तो वर जाऊन त्याने पू. स्वामींना तोच प्रश्न विचारला तेव्हा पू. स्वामींना फार आनंद झाला आणि ते म्हणाले की, 'अरे ती तर साक्षात गायत्री होती!' नंतर पू. स्वामींनीच आम्हा उभयतांना हे सर्व सांगितले. तेव्हा आम्हाला वाटले की पू. स्वामी साक्षात स्वत: तेथे उपस्थित होते म्हणूनच देवीने दर्शन दिले! पुढे 'संध्योपासना' या ग्रंथात पू.स्वामींनी या घटनेचा उल्लेख केला आहे.

तसेच पू. स्वामींच्याकडून पू. बाबा गंगादासांची गोष्ट ऐकून एक दिवस चि.रमेशनेही हट्ट धरला आणि तो रात्री मच्छरदाणीशिवाय पू. स्वामींच्याच खोलीत झोपला. त्याने पू. गंगादासांप्रमाणेच प्रार्थना केली होती आणि मुख्य म्हणजे पू.स्वामी त्याच खोलीत झोपले होते. त्यामुळे त्याला रात्री एकही डास चावला नाही आणि छान गाढ झोपही लागली. पुढे 'मानस-गूढार्थ-चंद्रिके' च्या प्रस्तावना खंडात पू.बाबा गंगादासांच्या चरित्रात पू.स्वामींनी या घटनेचा उल्लेख केला आहे.

एकदा श्री. लंबोदर काशीकर आले असता आणि पू.स्वामींचा मुक्काम असताना आमच्याकडे सप्तशतीचे दहा पाठ दोन दिवसांत करून नवचंडीचे अनुष्ठान केले गेले कारण श्री.काशीकर हे परमहंस रामकृष्णांचे एकनिष्ठ भक्त होते. त्यावेळीही त्या दोन्ही दिवशी रात्री चि.रमेशला रात्री स्वप्नात कालीमातेचे दर्शन झाले म्हणून तो घाबरून रडत उठला! 'काय झाले' म्हणून विचारले तेव्हा तो म्हणाला, 'मला देवी दिसली पण तिच्या गळ्यांत मुंडक्यांची माळ होती, केस मोकळे सोडलेले होते आणि तिने जीभ बाहेर काढलेली होती म्हणून मला भीती वाटते आहे' मी हे पू. स्वामींना सांगितले तेव्हा ते रमेशला म्हणाले, 'तू घाबरू नकोस. तू झोपण्यापूर्वी देवीची प्रार्थना कर की मी लहान आहे मला तुझे हे उग्र रूप पाहून भीती वाटते. तू सौम्य रूपात दर्शन दे.' मग त्याने तशी प्रार्थना केल्यावर त्याला स्वप्नात महालक्ष्मीचे दर्शन झाले. ती कमळात बसलेली होती आणि दोन्ही बाजूंनी हत्ती उभे राहून पाण्याने तिला अभिषेक करीत होते मग त्याची भीती गेली असे अद्‌भुत सामर्थ्य होते आमच्या श्रीसद्‌गुरूंचे!

चि. मंगल व चि. रविकला दोघींना त्यांनी श्रीदत्तमंत्र दिलेला होता

आणि त्यांना रोज तुळशीची पूजा, वृंदावनाला व श्रीगुरूचरित्राची पूजा करून त्याला रोज प्रदक्षिणा सोवळ्याने घालावयास सांगितल्या होत्या. त्याप्रमाणे त्या रोज करीत असत. त्यांच्या दोघींच्या पत्रिकेत मंगळ होता. पू. स्वामी म्हणायचे 'प्रदक्षिणा घाला म्हणजे दत्त प्रभूंच्या कृपेने उत्तम नवरे मिळतीलफ पू. स्वामींनी एकदा सांगितल्यावर त्या न चुकता ते सर्व करीत असत. परत कधीही त्यांना सांगावे लागले नाही आणि पू. स्वामींच्या कृपेने खरेच दोन्ही आमचे जावई खूप हुशार, निर्व्यसनी आणि सुस्वभावी मिळाले होते. नंतरही ज्यांनी ज्यांनी उत्तम वर मिळावा म्हणून श्रीगुरूचरित्रास प्रदक्षिणा घातल्या त्यांना त्यांना चांगला अनुभव आला आहे. तसेच चि. सौ. मंगलचा विवाह झाल्यावर सुपुत्र प्राप्तीसाठी पू.स्वामींनी तिला सोळा पौर्णिमा, दर पौर्णिमेस श्रीदत्तात्रेयांच्या यंत्राची पूजा करून त्यास प्रदक्षिणा घालण्यास सांगितले होते. त्याप्रमाणे तिने घालून सोळा पौर्णिमा झाल्यावर १६ मेहुणांना भोजन व दान दक्षिणा देऊन व्रताचे उद्यापन केले होते. या व्रताचे अनुष्ठान करणारांनाही एक, दोन अपवाद सोडून चांगला अनुभव आला आहे. सकाम अनुष्ठानाबद्दल पू. स्वामी म्हणत की, 'निष्काम कर्मे करावीत हे उत्तम आहे खरे! पण ते जमत नसेल तर आपल्या उपास्य देवतांशी एकनिष्ठ राहून व एकच परमेश्वर निरनिराळी रूपे धारण करतो ही जाणीव बाळगून सकाम अनुष्ठान केले तरी चालते!'

पू. स्वामी किती प्रेम करीत याला सीमाच नसे. त्यावेळी माझे पाय फुटून पावलांना इतक्या भेगा पडत की कधी कधी त्यातून रक्त येऊ लागे. पू. स्वामींच्या हे लक्षात आल्यावर त्यांनी मुद्दाम बिब्बा मागवून घेऊन माझ्या पावलावरील भेगात तो भरला होता. आता टाचांना भेगा पडत नाहीत. पण दुसऱ्या कुणाच्या टाचांना भेगा पडलेल्या पाहिल्या की, तो प्रसंग आठवतो आणि त्यांची आठवण येऊन डोळ्यात अश्रु येतात.

ह्यांना आजारी असताना जवळजवळ एकूण छत्तीस बाटल्या रक्त द्यावे लागले होते. रामभैय्याच्या कृपेने आमच्या जवळजवळ सर्वच नातेवाईकांनी त्याची भरपाई आपापले रक्तदान करून केली होती. ह्या गोष्टीचा परिणाम असा झाला की, पुढे मंगलने रक्तपेढीत (सांगलीच्या) नांव नोंदवून ठेवले होते व तिच्या रक्तगटाची आवश्यकता असेल तेव्हा ती

.जाऊन रक्तदान करीत असे. याप्रकारे ३६ पेक्षाही रक्तदान करून तिने पितृऋण उत्तमप्रकारे फेडले. तिचा यासाठी एकदा सत्कारही झाला होता. पू.स्वामींच्या कृपेने मंगल, रवि यांनी पतिव्रता धर्माचे उत्तम पालन केले व त्यांचा गृहस्थाश्रमही अत्यंत सुखाचा झाला. नातवंडेही सद्गुणी आहेत ही पण गुरूकृपाच! श्री. श्रीकृष्ण भा. अभ्यंकर यांना आम्ही भैय्यासाहेब म्हणत असू. हे C.A. होते व त्यांनी चांगला नावलौकिक मिळविला होता. त्यांना मधुमेह होता. त्यांना २००९ मध्ये देवाज्ञा झाली. धाकटे जावई श्री. नारायण रामकृष्ण वैद्य यांना आम्ही मधुभाऊ म्हणत असू. हे इंजिनिअर होते व ते अत्यंत परिश्रम करून उद्योगपती बनले होते.(सबमर्सिबल पंपस्चे उत्पादक म्हणून) त्यांना मात्र १९९० सालीच देवाज्ञा झाली. दोन्ही जावयांना लोक देवमाणूस म्हणून ओळखत असत. चि. रमेशने लहान असताना एकदा पू. स्वामींना 'स्वाक्षरी' च्या अल्बमध्ये स्वाक्षरी व संदेश देण्याची विनंती केली होती तेव्हा त्यांनी 'मातृदेवो भव, पितृदेवो भव, आचार्य देवो भव' असा संदेश दिला होता. ह्यांना १९६५ मध्ये देवाज्ञा झाली म्हणजे ४७ वर्षे जवळजवळ झाली. तो 'मातृदेवो भव' या आज्ञेने पालन करीत आहे. कुठलीही गोष्ट मला मागावी लागत नाही. तत्पूर्वीच ती प्राप्त होत असते. अर्थात याचे श्रेय माझी सद्गुणी पतिव्रता सून सौ. सुरेखा हिलाही आहे. त्यांचे लग्न १९७३ मध्ये डिसेंबर २० तारखेस झाले आहे. पुढील वर्षी ४० वर्षे पूर्ण होतील. श्रीसद्गुरूकृपेने सून इतकी चांगली मिळाली आहे की, मी म्हणेन की 'कुणालाही सून कशी मिळावी तर आमच्या सौ. सुरेखा सारखी!' तिच्या सहकार्यामुळेच घरांतील कुलधर्म, कुलाचार सर्व व्यवस्थित चालू आहेत. सर्वांची मने तिने जिंकून घेतली आहेत. ती ही डॉक्टर आहे, पण कुठलेही काम करण्यात तिला कधी कमीपणा वाटत नाही. चि. सौ. आरती व चि. सचिन यांना माझा लळा लागला याचे श्रेय तिलाही आहेच.

ह्यांच्या दुखण्यात १५ जून १९६५ ला मंगळवारी पहाटे जेव्हा डॉक्टरांनी सांगितले की आता काहीही आशा नाही. तेव्हापासून मी ह्यांच्याजवळ बसून होते. ते पूर्ण शुद्धीत होते. मला म्हणाले, 'माझ्या अंगाची आग होत आहे' तेव्हा मी डॉक्टरांना सांगितल्यावर त्यांना नुसताच ब्लड प्लाझमा

देण्यात आला. मग ते म्हणाले, 'आता मला बरे वाटते आहेफ मी म्हटले 'आपण आता घरी रोज म्हणायचो त्याप्रमाणे 'करूणात्रिपदी' म्हणून या. तेव्हा प्रथम म्हणाले, 'म्हणत नाही जा! काय केले तुझ्या दत्ताने?' मी म्हटले, 'अहो! असे म्हणू नका. त्यांनी काय करायचे ते ते बघून घेतील! पण आपल्याला दुसऱ्या कुणाचा आधार आहे कां?' तेव्हा म्हणाले, 'नाही! मग मी म्हटले की, मग म्हणा माझ्याबरोबर!' आणि म्हणून आम्ही दोघे मिळून 'करूणात्रिपदी' म्हटली आणि नंतर जवळजवळ तोपर्यंत सकाळचे नऊ वाचले असावेत तेव्हापासून दुपारी अडीचपर्यंत दोघेही 'दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा' हे भजन म्हणत राहिलो होतो. देवाज्ञा होण्यापूर्वी त्यांचा आवाज हळूहळू मंद होत गेला व नंतर नुसते ओठच हलत होते. ते हलायचे थांबले आणि मला कळून चुकले की सर्व संपले आहे! मी पहाटेपासून शेजारी उभी होते. ती एकदम चक्कर येऊन खाली पडले. डोळ्यासमोर अंधारी आली. पण तेवढ्यात कानात शब्द ऐकू येऊ लागले की 'क्षितिजल पावक गगन समीर । पंच-रचित अतिअधम शरीर ।। प्रगट पुढे तनु ती निद्रित तव । जीव नित्य रडसी कोणास्तव ।' आणि एकदम रडू फुटले होते त्यास आवर बसला. हा अनुभव सतत येत असे. पुढेही ज्यावेळी दोन्ही जावयांना देवाज्ञा झाली तेव्हाही हा अनुभव आला. हा अनुभव आला की रडू कुठल्याकुळे नाहीसे होई आणि मन शांत होई! खूपवेळा भेटायला लोकांना असेही वाटे की, यांना काहीच कसे दु:ख वाटत नाही? असो.

अशी जरी स्थिती झाली तरी ह्यांची संगती म्हणजे सत्संगती, गुरूभक्त, देवभक्तांची संगती होती! त्यामुळे गुण आठवून डोळ्याला पाणी येईच. शिवाय हे मला इतकी फुलासारखी जपत असत की काय सांगावे? नंतरच्या अनेक बिकट प्रसंगातून जाताना आठवण येऊन हृदय भरून येई. परत जन्म घ्यावाच लागला तर 'जन्मोजन्मी तुम्हीच यावे माझ्या संसारी' अशी भावना अजूनही आहे!

***

## पू. स्वामी प्रज्ञानंद सरस्वती यांची कृपा

प. पू. स्वामींचे सविस्तर चरित्र लिहीलेले आहेच, त्यांच्या संबंधी इतक्या असंख्य आठवणी आहेत की किती लिहीणार? ते समाधिस्थ झाले असले तरी आहेत. अंतर्यामी आणि शिवाय परम कृपाळू! त्यामुळे त्यांच्या कृपेचे अनुभव तर सारखेच येत असतात. लग्नापूर्वी मी मॅट्रिकही नव्हते. त्यामुळे आयुष्यात कधी पी. एच. डी. पर्यंत मजल गांठता येईल असे स्वप्नातही वाटले नव्हते. मी मंगल, रवीचा एस. एस. सी. चा अभ्यास घेत असे त्यामुळे माझाच एस. एस. सी. चा अभ्यास झाला होता. म्हणून ह्यांच्या मनात आले की माझा एस. एस. सी. चा अभ्यास झाला होता म्हणून मी External एस. एस. सी. ची परीक्षा दिली तर अगदी सहज पास होऊ शकेन. म्हणून मी रविबरोबर एस. एस. सी. ला Externally बसले. त्यातही असे झाले की परीक्षा ज्या दिवशी सुरू होणार होती त्याच्या आदल्या दिवशी रात्री हे, मी आणि मंगल मुंबईहून चि. मंगलचा विवाह निश्चित करून कार्यालय वगैरे ठरवून मुक्कामास इस्लामपूरला घरी आलो. आमच्याबरोबर चि. भैय्यासाहेबही आले होते. मी येऊ शकले म्हणून परिक्षेला बसू शकले. नंतर दोनही मुलींची लग्ने झाली. चि. रमेश पुण्याला शिकायला होता. म्हणून हे मला म्हणाले की मी External BA करावे. घरी अभ्यास करून पुणे विद्यापीठाची परिक्षा द्यावी असे त्यांना वाटत होते. म्हणून सर्व माहितीपत्रक, फॉर्मस् वगैरे मागवले होते. पण तेवढ्यात हे आजारी पडले आणि सर्वच राहून गेले.

नंतर जून १५ (१९६५) मध्ये यांना देवाज्ञा झाली. पण ह्यांची इच्छा होती म्हणून मी जुलै मध्ये मुंबईला S. N. D. T. विद्यापीठात P. D. साठी नाव नोंदवून P. D. ची पुस्तके आणली. नंतर काही कारणाने सौ. रविचे ऑगस्टमध्ये ऑपरेशन झाले नंतर आम्ही सामान बेळगावला नेवून तिथे नोव्हेंबर मध्ये रहावयास गेलो. नंतर अभ्यासास सुरूवात केली आणि पुढील वर्षी P. D. ची परीक्षा मुंबईला जाऊन दिली. नंतर घरच्या जबाबदाऱ्या सांभाळून, रोज दु. ३ ते ५ सत्संग करून व अभ्यासही करून १९७१ पर्यंत एम. ए. पदवी मिळाली. संस्कृत विषय पहिल्यापासूनच घेतला होता. ज्याची जी पुस्तके उपलब्ध होती ती इंग्रजी अथवा हिंदी अर्थासह असत

आणि मला पेपर तर मराठीत लिहावयाचे असत म्हणून 'राणी पार्वतीदेवी कॉलेज' किंवा नगर वाचनालय वगैरे मधून ग्रंथ आणून मी त्यांचे मराठीत भाषांतर सर्व लिहून काढीत असे व त्यावरून अभ्यास करीत असे. एका वर्षी मम्मटांचा काव्यप्रकाश ग्रंथ लावलेला होता. त्यावर संपूर्ण शंभर मार्कांचा पेपर होता. त्यात जवळ जवळ साठ-सत्तर अलंकारांच्या व्याख्या व त्यांची उदाहरणे होती. आता परीक्षेत व्याख्या आल्या तर मम्मटांच्या शब्दात द्यावयास हव्या म्हणून मी स्वयंपाक घरात एक बोर्ड टांगून ठेवला होता व त्यावर एका अलंकाराची व्याख्या व त्याचे उदाहरण लिहून ठेवत असे व जाता येता ते वाचून पाठ करण्याचा प्रयत्न करीत असे. एक अलंकार पाठ झाला की तो पुसून दुसरा लिहून तो पाठ करीत असे. असे सर्व अलंकार व त्यांची उदाहरणे पाठ झाली होती. तसेच एका वर्षी Sprcial Author हा विषय होता. तेव्हा मी स्वातंत्र्यवीर सावरकर हा विषय घेतला होता. त्यांच्या वाङ्मयाचे मला वाटते आठ खंड होते. ते क्रमशः एकेक ग्रंथालयातून आणून त्यांचा अभ्यास करून notes काढून दुसरा खंड आणून त्याचा अभ्यास करीत असे. अशा रितीने अभ्यास करून एम. ए. ची पदवी प्राप्त झाली आणि त्यावेळी केवळ चार मार्कांनी माझा प्रथम क्रमांक चुकला होता. असो. नंतर श्री सद्गुरू कृपेने श्री. कृ. ब. निकुंब यांनी झह. ऊ साठी एकनाथी भागवत हा विषय सुचवला. त्यामुळे तर पुनः प्रत्ययाचा आनंद अनेक वर्षे मिळाला. पंधरा वर्षे अभ्यास चालू होता. त्यामुळे 'ताटस्थास म्हणती समाधि । त्यांची ठकली बुद्धी' हे मनात ठसून सर्वांभूती भगवद्भाव व त्यामुळे सहज समाधी यांचे महत्त्व अंतःकरणात ठसले. ह्या गोष्टीलाही २५ च्याहून अधिक वर्षे होऊन गेली आहेत. श्रीसदंगुरू कृपेमुळे ब्रिटीश कौन्सिलचा Article writing चा पोस्टल कोर्सही केला.हे सर्व करताना नित्य उपासना, नित्याचा सत्संग यात खंड पडला नाही. ही श्रीसद्गुरूंची कृपाच नाही का? एकीकडे श्रीसद्गुरू सेवाही या ना त्या रूपाने घडतच राहिली. कौटुंबिक जबाबदाऱ्याही समाधानकारकपणे निभावण्याचा प्रयत्न केला गेला. पू. स्वामींचे चरित्र लिहीताना असा प्रसंग आला की त्यांनी लिहीले होते की एका विशिष्ट क्षणी त्यांची 'समलोष्टाश्मकाञ्चनः' अशी स्थिती झाली आणि हे सर्व लिहीत

असता १९८० मध्ये मला त्याक्षणी असे वाटले आता या क्षणापासून आपलीही स्थिती गुरूकृपेने तशीच झाली आहे. आणि मी तात्काळ अंगावरचे सर्व सोन्याचे दागिने उतरवून ठेवले. सौ.सुरेखाच्या स्वाधीन केले आणि ते सर्व नातवंडांत समप्रमाणात दिले जावे असे सांगितले. त्याप्रमाणे ते दिले गेले तेव्हापासून कधी सोन्याच्या अलंकारांचा मोह उत्पन्न झालेला नाही.

***

या आधी जीवनात ज्यांच्याशी घनिष्ठ संबंध आला त्या अनेक महान संतांचा परिचय देण्याचा प्रयत्न केला गेला. पण ज्यांच्याशी घनिष्ठ संबंध आला आणि ज्यांच्या सहवासात सत्संगतिचा आनंदही लुटता आला असे असंख्य लोक आहेत. त्यांच्या विषयी सविस्तर लिहीणे अशक्य आहे आणि ब्रह्मालीन श्री सद्गुरूंच्या चरित्र ग्रंथांत बऱ्याच गुरूबंधुभगिनीचे व इतरही सज्ञनांचे अनुभव देण्यात आले आहेत ते वाचले तरी यावर थोडा फार प्रकाश पडेल. गोस्वामी तुलसीदासांनी म्हटले आहे की ज्यावर प्रभुरामचंद्र कृपा करतात त्यांच्यावर सर्वच जीव कृपा करतात. याचा अनुभव गेली साठ वर्षे येत आहे. याहून अधिक काय बरे सांगावे?

ह्यांच्या दुखण्यात तर या गोष्टीचा भरपूर अनुभव आला. ते हॉस्पिटलमध्ये होते तेव्हा सर्व नातेवाईकांनी इतकी मदत केली की कधीही मनुष्यबळ कमी पडले नाही. कोणी ना कोणी सतत माझ्याबरोबर हॉस्पिटलमध्ये हजर असे. रात्री झोपावयासही आळपाळीने कोणी ना कोणी येऊन सारी रात्र बाहेर बाकावर बसून काढीत असत. तसेच ३६ बाटल्या रक्तदान सर्वांनी मिळून केले होते. चि. रमेशसाठी जमशेटपूरच्या मेडिकल कॉलेजमध्ये बारा हजार रूपये फी त्याकाळात भरावयास हवी असे कळताच श्री. बापूसाहेब अभ्यंकरांनी तात्काळ ते पैसे भरले होते. पूर्वी हे आजारी होते तेव्हाही माझ्या वडिलांनी एवढेच नव्हे तर श्री. बाबूशेट कटारियांनीही न मागता सर्व लागेल ती मदत केली. रामभैय्याच्या कृपेने अद्यापही रामभैय्या माझा योगक्षेम वाहत असतात असा अनुभव क्षणोक्षणी, पदोपदी येतच असतो. याची असंख्य उदाहरणे आहेत किती म्हणून देणार? चि. रमेश शिकत असतानाही डॉ. श्रीकांत गोगटे व त्याचे स्नेही डॉ. मनोहर आपटे (माझ्या मानस बहिणीचा मुलगा) आणि त्यांचे स्नेही डॉक्टर सर्वांनी

वेळवेळी मी त्यांचीच मामी व मावशी असल्यासारखी मदत केली आहे.

बेळगाव येथे आमराईत रहात असतां श्रीमती घाणेकर वहिनींच्या घरी रोज ३ ते ५ आमचा सत्संग चाले. तेथील भगिनींनीही माझ्यावर अपार प्रेम केले. श्रीमती ताई रानडे, सौ. जोशी, श्रीमती गद्रे आजी, श्रीमती तुळसाक्का कल्लोळकर, श्रीमती लीला आत्या, राव वगैर तसेच मारूती गल्लीत आल्यावर तेथील डॉ. लागूंच्या घरीही रोज ३ ते ५ आमचा सत्संग चाले. तेथील अनेक भगिनींनी माझ्यावर अत्यंत प्रेम केले. सौ. मामी काळकुंद्री, सौ. गाडगीळ वहिनी, ती. अक्का लागू व त्यांच्या मैत्रिणी, सौ. गोदूताई साठे, सौ. छत्रे, सौ. मराठे, लेले आजी किती नावे लिहीणार? विश्रामबाग येथे रहावयास आल्यावर श्री. मराठे यांच्या 'सावली' बंगल्यात रहात होते तेव्हा सौ. मराठे वहिनी, श्री. दामले काका व सौ. कमलाताई तसेच सौ. जोशी, श्री. कानिटकर (गिरीश कानिटकरांच्या वहिनी) सौ. अम्मा तिलवल्ली वगैरेंचा सत्संग लाभला व मिरज येथे वैद्यकीय कॉलेजच्या कर्मचारी निवासात रहात असतां सौ. परिचारक आजी, सौ. रायते आजी, श्रीमती मालवतकर आजी, डॉ. जुन्नरकरांच्या सासुबाई, कलघटगी आजी, डॉ. सौ. कान्हेरे यांच्या मावशी, सौ. भावठणकर, सौ. हेगिस्ते असे आमचे मुख्यतः आजी मंडळ स्थापन झाले होते व मी संध्याकाळी तेथील बाळगोपाळ मंडळींसाठी संस्कार वर्गही घेत असे. त्यांच्याकडून गीता, काही स्तोत्रे वगैरे पाठ करून घेई. शेजारच्या लोकमान्य नगरातील सौ. पोंक्षे, सौ. बोरगावकर, सौ. गाडगीळ वगैरे भगिनी एकत्र जमून भजने करीत. एक वर्ष तिथे कॉलेज निवासातील लॉनवर मी रामनवरात्रात 'मानसा' वर नऊ दिवस प्रवचनेही केली होती. या सर्व सत्संगांमुळे माझा अधःपात झाला नाही. सर्वांचे उदंड प्रेम लाभले आणि मुख्य म्हणजे चित्त रामभैय्याच्या चरणी पडून राहिले! आम्ही सर्वजण मिळून श्रीगोंदवले येथे दर्शनासही गेलो होतो. सौ. इंदिराबाई परिचारक यांनी तेथे समाधीची पूजा करून श्रीमहाराजांचा अनुग्रहही घेतला होता. अशी मी जिथे जाईन तिथे मला सत्संग लाभेल अशी व्यवस्था रामभैय्यांनी करून ठेवलेली असते.

सन १९९० मध्ये श्रीसद्गुरूंचा आदेश झाल्यावरून ज्यांना त्यांचा अनुग्रह घेण्याची इच्छा असेल त्यांना श्रींच्या समाधिची श्री गुरू भावनेने

पूजा करावयास सांगून समाधिवर माळ ठेवून त्या व्यक्तीला जी इष्टदेवता प्रिय असेल तिचा मंत्र सांगून मी इतर बाबतीत मार्गदर्शन करीत आले आहे. ज्यांनी अशाप्रकारे अनुग्रह घेतला आहे त्यांची काळजी सद्‌गुरू घेतात असा जवळ जवळ २१ वर्षांचा अनुभव आहे. ज्यांची ज्याप्रमाणात श्रद्धा असेल त्याप्रमाणे त्यांना प्रचिती येते. मी फक्त त्यांच्यातील दुवा आहे. पण श्रीसद्‌गुरूंच्या व रामभैय्याच्या कृपेने, तरूण पिढीतील अनेक स्वयंसेवकांमुळे श्रीसद्‌गुरूसेवा अत्यंत उत्तमप्रकारे संपन्न होत आहे. आणि त्यांच्या सत्संगतिचा आणि प्रेमाचा ही मला सतत लाभ होत असतो. शिवाय सौ. शामला दिवाकर आणि सौ. रेखा पटवर्धन यांनी 'मानस' मराठीच्या सामुहिक पारायणांचा संकल्प करून त्यांची अंमलबजावणी केल्याने त्यात सहभागी होणाऱ्या रामायण प्रेमी भगिनींचा सत्संग व प्रेमही श्रीसद्‌गुरूंच्या व रामभैय्याच्या कृपेने मला लाभत असते.

मी एकदा श्रीसद्‌गुरूंना विचारले होते की, कुणालाही आपण असंत आहोत, आपला संग दुःसंग आहे असे वाटतच नाही. तसेच आपल्याला नेहेमी सत्संगच लाभावा असेही वाटते. सर्व जग, सर्वच व्यक्ती, पदार्थ गुणदोषमय असतात. अशावेळी कुणाची संगति करावी हे कळत नाही. अशावेळी काय करावे? तेव्हा श्रीसद्‌गुरू म्हणाले होते की, 'आपला जन्म तर आपल्या हातात नसतो, आपले मातापिता, नातेवाईक वगैरे कसे असावेत, कोण असावेत हे आपण ठरवू शकत नाही, पण आपल्याला भगवंतानि बुद्धि दिलेली आहे. तिचा उपयोग करून कोणाची संगति करावी, कोणाची टाळावी हे आपण ठरवू शकतो.'

ते पुढे म्हणाले होते की, 'ज्याच्या संगतीत आपल्याला सतत श्रीभगवंताचे स्मरण होईल, भगवन्नाम व भगवत्कथा यांचे स्मरण, मनन व चिंतन होत राहील, मनुष्य जन्माचे सार्थक कशायोगे करावे याचे मार्गदर्शन मिळेल, आपल्यातील दोषांची यथार्थ जाणीव होऊन ते दूर व्हावे म्हणून प्रामाणिकपणे प्रयत्न करावे असे वाटू लागेल, असत्य भाषण परनिंदा चहाडी इ. किती घातक आहेत हे जाणून आपण त्यांपासून दूर रहाण्याचा अटोकाट प्रयत्न करू लागू अशांची संगति ही आपल्यासाठी सत्संगति असते. ती मिळावी असे प्रयत्न करावे, 'सुसंगति सदा घडो' अशी प्रार्थना

नित्य भगवत्चरणी करावी. सर्व सिद्ध असतात असे नाही पण उत्तम साधक आणि सद्ग्रंथ यांची संगती केल्यानेही आपले निश्चित कल्याण होते. यासाठी दुःसंग मात्र टाळायलाच हवा यात संशय नाही.

आता प्रथम माझ्या गुरूबंधू–भगिनींचा परिचय करून देणार आहे. श्री. श्रीरामजी गिल्डा व सौ. भाभींबद्दल उल्लेख आलेलेच आहेत. श्री. आदिनाथ यादव व सौ. कौसल्या वहिनी, यांच्यावर पू. स्वामींची फार कृपा होती. इतर सर्वांना सोडून पू. स्वामी 'रामविश्रामधाम' या श्री आदिनाथ यादव यांच्या घरीत सात आठ वर्षे राहिले होते. ते त्यांची निष्ठा पाहूनच होय. श्री. आदिनाथ वकील असून रोज पू. स्वामी येण्यापूर्वी शौचकूप, मोरी, अंगण सर्व स्वतःच झाडून ठेवीत असत. पू. स्वामींचा शब्द त्यांनी कधीच खाली पडू दिला नाही. पू. स्वामींनी प्रयोप्रवेशनाचा निर्णय घेतला तेव्हा गावातील काही लोकांनी 'आत्महत्येचा प्रयत्न' म्हणून पू. स्वामींना अटक व्हावी असे प्रयत्न चालविले होते. पण त्यावेळी श्री आदिनाथांनी उद्गार काढले होते की, 'पाहू कोण पू. स्वामींच्या पर्यंत जातो ते? त्यांना माझ्या प्रेतास ओलांडून मगच पुढे जावे लागेल.' तशी वेळ भगवंत कृपेने आली नाही. कारण जज्ज (मामलेदार) जे अधिकारी होते ते जैन होते व जैन धर्मातील अनेक साधु संलेखना म्हणजे प्रयोपवेशन करून देहत्याग करतात. त्यामुळे त्यांना उलट पू. स्वामींच्या बद्दल आदरच वाटला.

आदिनाथला पू. स्वामी प्रेमाने 'शंभू' म्हणत असत आणि समाधिनंतर विशिष्ट मापाचे कळक कापताना 'शंभू' हात कापून घेईल म्हणून त्यांनी स्वतःच ते कापून ठेवले होते.

श्रींच्या समाधिनंतर कित्येक वर्षे श्री. आदिनाथ यांच्या मळ्यातच पुण्यतिथीस तीर्थपूजा आणि महाप्रसाद वगैरे होत असे. नंतर मठात सर्व सोयी झाल्यावर मग तेथे तीर्थपूजा, महाप्रसाद आदि होऊ लागले. श्रीसद्गुरूंनी १९६८ मध्ये समाधि घेतली व तेव्हापासून श्रींच्या पुण्यतिथी उत्सवाची सर्व व्यवस्था श्री. आदिनाथच पहात. गेल्या वर्षी म्हणजे २०११ मध्ये त्यांचा एकुलता एक मुलगा चि. अभिराम अत्यंत आजारी असतानाही त्यांनी सर्व सेवा केली. यंदा म्हणजे २०१२ मात्र त्यांचे स्वतःचे हिमोग्लोबिन ५ पर्यंत उतरल्याने डॉक्टरांनी त्यांना परंड्यास जाण्यास परवानगी दिली

नाही म्हणून ते येऊ शकले नव्हते. पण परंड्याहून महाप्रसाद बार्शीस पोहोचेपर्यंत त्यांनी अन्नग्रहण केले नव्हते. त्यांचा सर्व परिवारच भगवत् भक्तीत रंगलेला असून त्यातील बऱ्याच सदस्यांना पू. रविशंकरजीची कृपा प्राप्त झाली आहे. श्री. मुळे, डॉ. मोरे यांच्याकडे तर ते भोजन, विश्रांतीसाठीही येतात. श्री. आदिनाथ यांस देवाज्ञा होऊन ते............................

**प्रिय मंगला ओक व ओक काका**

प्रिय मंगला ओक व ओक काका यांचा अनुग्रह आमच्या घरीच इस्लामपूर येथे झाला होता. ती दोघे वरेच वेळा ध्यानास भजनास आमच्या घरी येत असत, कारण पू. श्रीसद्गुरूंचाच मुक्काम आमच्या घरी होता. पू. ओककाकांची ध्यानाभ्यासात खूपच प्रगती झालेली होती. बरेच वेळा ते इतके अंतर्मुख होत असत की त्यांना बाहेरचे भान रहात नसे. सौ. मंगला माधवनगरला रहावयास गेल्यापासून कीर्तने सुंदर करीत असे. हे गेल्यावर चि. रमेश व मी आमचे वास्तव्य निरनिराळ्या ठिकाणी झाले तरी आमचा ओककाका व मंगलाशी संपर्क तुटला नाही. बेळगावलाही ती आमच्याकडे आली होती. नंतर १९७४ मध्ये आम्ही सांगली मिरजला राहू लागल्यावर तर आमची सारखीच गाठ पडत असे. पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वतींचे चरित्र लिहावयाचे ठरल्यावर श्री. दामलेकाका, श्री. ओककाका, सौ. मंगला व मी अशा आम्ही चौघांनीच गोरे मंगल कार्यालयात साधक मेळावा आयोजित केला होता व त्यामुळेच बरीच माहिती गोळा करता आली. श्री. ओककाकांना हृदयविकाराने देवाज्ञा झाली मिरज मिशन हॉस्पिटलमध्ये. या घटनेची आधी कल्पना आल्याने मी चि. शशीजवळ गंगाजल व तुलसीपत्र नेऊन दिले होते व त्यांच्या आग्रहावरून प्रिय मंगलाने त्यांना हरिपाठ ऐकवला होता. तसेच ते जानेवारी १० तारखेस स्वर्गवासी झाले, पण झटका आल्यावरच ते मंगलास म्हणाले होते की, 'मी असेन वा नसेन पण तू पू. स्वामींच्या पुण्यतिथीस परंड्यास जाऊन नेहेमीप्रमाणे कीर्तनसेवा कर व त्यांच्या आदेशानुसार प्रिय मंगला माझ्याबरोबर उत्सवासाठी परंड्यास आली व तिने कीर्तन सेवा केली होती. पू. श्रीसद्गुरूंची कृपा लाभलेली असल्यामुळेच पति निधनाच्या वेळी व पुढे तिचे जावई अविनाश रानडे

यांचे अपघाती निधन झाले, तेव्हाही ती शांतपणे ते आघात सोसू शकली.

तिचे पाठांतर खूप आहे. अभ्यासपूर्ण निरनिराळी आख्याने तर तिने बसवलेली आहेतच. शिवाय महाभारत, भागवत, गीता वगैरेवरही ती फार सुंदर प्रवचने करते, आवाज तर इतका मधुर आहे की काय सांगावे? प. पू. स्वामी तेजोमयानंदजीनाही तिची कीर्तने व प्रवचने फार आवडतात व त्यांनाही तिच्याबद्दल अत्यंत प्रेमादर असून तिचे कौतुकही ते करतात. दोन तीन वर्षांपूर्वी तिचे प्रथम कमरेचे हाड मोडून ऑपरेशन करावे लागले व त्यानंतर एकाएकी तिचा आवाजच उमटेना असे झाले. तेव्हा स्वरयंत्राचा पॅरालिसिस असे निदान झाले. त्यावेळी ती काय बोलते हे नीट कळत नसे. मी हे पू. तेजोमयानंदजींना कळविल्यावर त्यांनी मुद्दाम दोनदा फोन करून तिची विचारपूस करून तिला, 'ये सद्गुरू राया कीर्तनी, ये सद्गुरू राया' म्हणा, असे सतत म्हणा, बरे वाटेल असे सांगितले व श्रीसद्गुरू कृपेने आणि सर्वांच्या सदिच्छेने तिला परत चांगले बोलता येऊ लागले. आता परत ती प्रवचनेही करू शकते. त्यानंतर चि. शशी व सौ. सुनिता तिला घेऊन 'चिन्मय विभूति' वर मुद्दाम प. पू. तेजोमयानंदजींच्या दर्शनास गेली होती. तेव्हा प. पू. स्वामीजींना खूप आनंद झाला. अद्यापही तिचा संत वाङ्मयाचा अभ्यास चालू असतो. ती जेथे जाते तेथील लोकांना आनंद प्रदान करते. चि. शशी ओकमुळे पुण्यात व इतरत्र नाडी ग्रंथाच्या अभ्यासाची केंद्रे चालू झाली आहेत. व त्याच्यावर भगवंताची व विविध ऋषींची ही फार कृपा आहे, याचे मला फार कौतुक वाटते. अशी गुरू भगिनी मिळाली ही फार मोठी भगवत्कृपा आहे. पुण्यातील नारद मंदिरात कीर्तन महोत्सव झाला तेव्हा त्याची सुरुवात मंगलाच्या कीर्तनाने करण्यात आली होती. आमचे प्रेम गेली साठ वर्षे टिकून आहे यावरून काय ते जाणावे.

***

## डॉ. वि. ना. जोशी व सौ. शशी उर्फ जानकी

१९५१ मध्ये ह्यांना आणि मला चैत्र शुद्ध दशमीस पू. स्वामींकडून अनुग्रह मिळाला. आणि त्याच वर्षी अक्षय्यतृतीयेस या उभयतांचा विवाह इस्लामपूर येथेच मंत्रीवाड्यात संपन्न झाला. सौ. शशीचे वडील पूज्य

गुळाणीकर काका व चि. तात्याचे वडील पू. ना. भी. जोशी उर्फ बाबूकाका दोघेही प. पू. प्रज्ञानानंद सरस्वती स्वामींचे अनुग्रहीत होते व पू. स्वामी एकदा गुळाणीकरांना म्हणाले, 'तुझी शशी बंडाला दे', लगेच ते म्हणाले, 'दिली महाराज' आणि हा विवाह ठरला होता. दोन्ही घराण्यांवर गुरूकृपा आहे आणि त्यामुळे चि. तात्या व सौ. शशी यांचा ६१ वर्षे सुखाने संसार झाला आहे. प्रपंच आणि परमार्थ दोन्ही उत्तमप्रकारे होऊन मनुष्य जीवनाचे सार्थक झाले आहे. चि. तात्याला नामाचा छंद असून तो सतत नामानंदात मग्न असतो. त्याने लिहीलेले 'नामसुधा' पुस्तक नुकतेच प्रकाशित झाले आहे. सौ. शशी शिराळा येथील राममंदिरात भगिनींना जमवून नित्य रामायण वाचन, भजन इत्यादि उपासना कित्येक वर्षे नियमाने चालवीत होती. आता वृद्धापकाळामुळे ती उभयता बत्तीस-शिराळा सोडून कोल्हापूर येथे मुलगा व सौ. शीला (सून) यांच्याजवळ रहावयास आली आहेत. दोघांचा स्वभाव अत्यंत प्रेमळ आहे. गेली जवळ जवळ २४ वर्षे परंडा येथे श्रींच्या पुण्यतिथी उत्सवात त्यांच्या हातून ब्राह्मण पूजा, तीर्थपूजा घडत आली आहे! हे फार मोठे भाग्य त्यांना लाभले आहे.

***

## श्रीहरी व विजू जोशी आणि परिवार

चि. श्रीहरी हा पू. जोशी काकांचा मुलगा. तो मिलिटरीत नोकरी करीत होता. त्याची पत्नी विजया हिचे वडील हे ही पू. स्वामींचे अनुग्रहीत होते. त्यामुळे श्रीहरी व विजया यांनाही श्रींचा अनुग्रह प्राप्त झाला होता. श्रीहरी निवृत्त झाल्यावर कुंडल पासून जवळ किर्लोस्कर वाडी येथे राहू लागला व ती. काका व सौ. काकी त्याच्याजवळ निवृत्तीनंतर रहात होते. श्रीहरी व विजया यांनी पू. काका आणि काकी यांची अतिशय प्रेमाने सेवा केली आणि त्यांच्याच घरी त्यांचा देहांत झाला. कुंडलचे पू. स्वामी ब्रह्मानंद यांच्यावर जोशी घराण्याची अत्यंत श्रद्धा असून ती. काका व त्यांच्या नंतर श्रीहरी आणि त्याच्या नंतर श्रीहरीची मुले शेखर, अंबरीष व कन्या सौ. सुकन्या ही परिवारासह पू. ब्रह्मानंद महाराजांचा पुण्यतिथी उत्सव प्रेमाने साजरा करतात. सौ. सुकन्यावर पू. ब्रह्मानंद महाराजांची विशेष कृपा असून

तिने त्यांचे चरित्रही लिहीले आहे. चि. शेखर, सौ. वैशाली, सौ. अस्मिता यांनी प. पू. स्वामी प्रज्ञानानंदांचा अनुग्रह घेतला असून चि. अंबरीष व चि. शेखर प्रपंच, परमार्थ दोन्ही उत्तम प्रकारे करीत आहेत. सर्वांची 'मानस' पारायणे सतत चालू असतात.

***

## पू. पद्मा पारखी आणि परिवार

प्रिय पद्मा ही पू. जोशीकाकांची लाडकी कन्या. तिचा विवाह पुण्यातील प्रसिद्ध श्री. विनायकशास्त्री पारखी यांच्याशी झाला होता. देवराष्ट्र येथे पू. सदाशिवशास्त्री पारखी यांची वेद पाठशाला असून तेथून अनेक शास्त्री पंडीत शिकून विविध स्थळी आपापला व्यवसाय करीत आहेत. त्यांच्या घराण्यात अग्निहोत्र असून सर्व कुटुंब आचार धर्माचे निष्ठेने पालन करीत असते, अशा घराण्यात विवाह झाल्याने पद्माला प्रथम अवघड गेलेही असेल पण पू. जोशीकाका व काकी यांचे संस्कार व मूळचा कष्टाळू, प्रेमळ स्वभाव यामुळे तिने पू. विनायक शास्त्रींना प्रसन्न करून घेतले होते. ते अत्यंत विद्वान होते. एका वर्षी दोघेही परंड्यास श्रींच्या पुण्यतिथी उत्सवास आली होती. कारण पद्मास विवाहापूर्वीच श्रींचा अनुग्रह लाभला होता. पण परंडा येथेही परान्न, दुसऱ्याच्या हातचे पाणी वगैरे न घेण्याचे नियम त्यांनी पाळले होते व स्वतंत्र स्वयंपाक यावेळीही तेथे सौ. पद्माने दोघांसाठी केला होता. सायंकाळी पू. विनायक शास्त्री यांचे आचार धर्मासंबंधी फार सुंदर व हृदयस्पर्शी प्रवचन झाले होते आणि मुख्य म्हणजे ते भगवत भक्त होते. पूज्य विनायक शास्त्री यांना देवाज्ञा झाल्यावर पद्माने संन्यास धारण केला असून ती घरातच संन्यास वृत्तीने राहून भगवद् आराधना व कुटुंबाची सेवा करीत असते. तिची संन्यस्त वृत्ती पाहून मस्तक प्रेमादराने झुकते.

***

## बेळगाव- श्री नागेश गोविंद हेर्लेकरशास्त्री

पू. जोशीकाकांना पित्याप्रमाणे मानणारा त्यांचा मानसपुत्र म्हणावा असा श्री. हेर्लेकर शास्त्रीबद्दल मी डॉ. तात्या, सौ. शशी वगैरेंकडून बरेच

[illegible] होते. पू. काकांच्या सांगण्यावरून मला वाटते त्याने पू. विनायक शास्त्री पारखी यांच्या हाताखाली त्याचं वैदिक अध्ययन पूर्ण केले होते व तो बेळगांव येथे विठ्ठल मंदिराच्या आवारात राहून पौरोहित्य करीत असे. त्याने स्मार्ताग्नि ठेवलेला आहे. त्यामुळे श्री. पारखींच्या प्रमाणे त्याच्या घरींही कडक ओवळेसोवळे आहे. आचार धर्माचे कटाक्षाने पालन केले जाते. प. पू. स्वामी प्रज्ञानानंदानाही या गोष्टी फार प्रिय होत्या. ही व्रते पाळणे फार अवघड असते. मनावर फार संयम असावा लागतो. त्यांच्या घरातील मुलांनाही तसेच वळण लागलेले आहे. ती पण वाटेल तेथे, वाटेल त्याच्या हातचे खातपीत नाहीत. हे मी अनेकदा प्रत्यक्ष पाहिलेले आहे. मला या गोष्टीचे आश्चर्य आणि कौतुकही वाटले आहे. त्यांच्या घरी माणिकनगरच्या माणिकप्रभूंची गादीही आहे व नित्य उपासना होत असते. मी त्याला किशोर म्हणते. तो प्रवचन, कीर्तन फार छान करतो. संगीताची चांगली जाण असून हार्मोनियम, तबला वगैरे वाजवता येतात. त्याची वेदपाठशाला असून तेथे राहणाऱ्या मुलांची उत्तम काळजी घेतली जाते. वैदिक शिक्षणाबरोबरच त्यांना संगीताचे शिक्षणही दिले जाते. तबला, पेटी वाजवता येते. त्यामुळे पुढेही त्यांना या कलांचा उपयोग उदरनिर्वाहासाठी होऊ शकतो. तसेच पू. जोशी काकांच्यामुळे त्याला 'रामचरितमानस' या ग्रंथाची गोडी लागली आहे. त्यामुळे पाठशाळेतील मुलांना 'श्रीरामचरितमानस' गानाचे धडे मिळतात. घरातही सर्वजण मानस प्रेमी आहेत. त्याचे दोन्ही मुलगे श्री. नीळकंठ व श्री. हृषिकेशही वेद विद्येत पारंगत झाले आहेत व पू. मातोश्री (आक्का) ही पद्मा पारखीप्रमाणे घरातच संन्यस्त वृत्तीने रहात आहेत.

चि. किशोरने काही काळ 'श्रीरामचरितमानस प्रेमी' मंडळाचे अध्यक्षपदही भूषविले होते. तसेच मिरज, अहमदनगर, उस्मानाबाद, कोल्हापूर येथे मंडळातर्फे त्याचे श्रीरामायणयज्ञ, श्री भागवत्सप्ताह वगैर ही आयोजित करण्यात आले होते व लोकांचा उत्तम प्रतिसाद लाभला होता. गेली १० वर्षे श्रींच्या पुण्यतिथी उत्सवात पुण्यकालांची कीर्तन सेवा तोच करतो व रामविश्रामधाम मधील सर्व श्री विग्रहांच्या प्राणप्रतिष्ठापनाचे मुख्य पुरोहित पद त्यानेच भूषविले होते. श्रींच्या पुण्यतिथी उत्सवातील धार्मिक कृत्याची

जबाबदारी आता त्यांच्यावर सोपवण्यात आली आहे. त्याच्याबद्दल जितके लिहावे तेवढे थोडेच आहे! श्रीकृपेने अशीच सेवा त्याच्या हातून घडो हीच प्रार्थना!

***

## सौ. मंदाताई केसराळीकर

श्री. हेर्लेकर शास्त्री यांची ही भगिनी. ही श्रीमत् भागवत् संहिता उत्तमप्रकारे वाचते. तिचा आवाज मधूर असून उच्चार अगदी स्पष्ट व शुद्ध आहेत. त्यामुळे श्रीमत् भागवत सप्ताहात 'संहिता पठणाचे' महत्त्वाचे कार्य तिच्यावर सोपविले जाते. शिवाय अर्थही ती फार सुंदर सांगते. श्रीभागवत् ग्रंथाची तिच्यावर कृपा झाली आहे. याचा प्रत्यय श्रोत्यांनाही येतो. कित्येकदा ती इतकी भावविवश होते ते पाहून श्रोतेही भारावून जातात. तिची ती विद्वत्ता पाहून आदरणीय श्री. विश्वास भिडे यांनी तिला संपूर्ण श्री भागवत् संहिता इंटरनेटवर टाकण्यासाठी तिचे रेकॉर्डिंग करावे अशी विनंती केली होती व त्याप्रमाणे निवांतजागी एकांतात तिने संपूर्ण श्रीमद् भागवत संहितेचे मधुर स्पष्ट शुद्ध स्वरात वाचन करून रेकॉर्डिंग केले आहे. तिच्या हातून श्रीकृष्ण कृपेने आणखी अशीच सेवा घडून तिचे जीवन सार्थक होवो! तिचे मला फार कौतुक वाटते, विलक्षण आत्मियता वाटते हेच खरे!

***

## श्री. बाबूशेट कटारिया आणि परिवार

श्री. गुळाणीकर काका, श्री. जोशी काका यांच्याप्रमाणे श्री बाबूशेट कटारिया यांचा अनुग्रह आमच्या पुर्वीच झाला होता. मला वाटते आम्ही श्री गुरू पौर्णिमेसाठी चास-कमानला गेलो. तेव्हा त्यांची प्रथम ओळख झाली व तेथे गेल्यावर श्री. बाबूशेटनी श्रींची किती सेवा केली होती ते कळले. ते जैन असूनही त्यांची श्रींवर श्रद्धा होती श्री पैशाला स्पर्श करीत नसत त्यामुळे चासला असताना कधी जर श्रीसद्गुरू दर्शनासाठी आळ्याला जावे असे वाटले तर पहाटे नित्यकर्म उरकले की सरळ आळ्याला जाण्यासाठी चालू लागत. श्री बाबूशेट सकाळी लवकर दर्शनास येत, आणि मठात श्री दिसले नाहीत की त्यांना कळून येई की हे चालत निघालेले

आहेत. मग श्री. बाबूशेट सरळ पळत जावून त्यांना गाठत आणि मग एस. टी. चे तिकीट वगैरे काढून श्रींच्या बरोबर त्यांना जेथे जावयाचे असेल तेथे घेऊन जात असत. मला तर त्यांना पाहिले की हनुमंताची आठवण येई.

ह्यांच्या दुखण्यात आम्ही चासला होतो तेव्हा त्यांनी खूप मदत केली होती. नंतर हे गेल्यावर जवळ जवळ दहा वर्षे म्हणजे १९७५ पर्यंत त्यांची भेट होऊ शकली नव्हती. करण आमचे रहाणे बेळगाव, मुंबई वगैरे ठिकाणी झाले. १९७४ ला सौ. मंगला व मी परंड्यास गेलो आणि त्यानंतर आमचे पुण्यतिथीस जाणे एखाद्या वर्षीच चुकले असेल. नंतर श्री. बाबूशेट यांचे नातू श्री. भोगीलालचे मुलगे श्री. भरतकुमार, श्री. अशोक कुमार कटारिया हे इचलकरंजीस स्थायिक झाले म्हणून त्यांचे तेथे रहाणे होऊ लागले व ते मिरजेस मला येऊन भेटले होते. मी पण नंतर इचलकरंजीस जाऊन सौ. भाभींना, त्यांच्या नातवांना नातसुनांना पतवंडांना भेटले होते. त्यांनी खूप आदर सत्कार केला, त्यांना इतका आनंद झाला होता.!

नंतर एका वर्षी श्री. भोगीलाल व त्यांच्या पत्नीनेही श्रीप्रज्ञानानंद सरस्वती स्वामींच्या समाधिची पूजा करून अनुग्रह घेतला आहे. अशोक कुमार व भरतकुमारही श्रीरामचरितमानसप्रेमी मंडळास नेहेमी सहाय्य करतात. त्यांच्या कारखान्यात श्री. श्रीरामजी गिल्डांनी जाऊन हनुमान यज्ञही केला होता. अद्यापही त्यांचे सहकार्य आणि प्रेम आम्हाला लाभत आहे ही श्रीसद्‌गुरूंची व रामभैय्यांची कृपाच आहे. श्रींनी ज्यांना ज्यांना अनुग्रह दिला होता त्यांची मुले, मुली, सुना, जावई एवढेच नव्हे तर नातवंडे पतवंडे यांचीही श्रींच्यावर दृढ निष्ठा असून त्यांतील अनेकांनी श्रींचा अनुग्रह घेतलेला आहे. यावरून श्रींची थोरवी कळून येत आहे. 'वेदांतसार अभंग रामायण' नवीन आवृत्तीसाठी त्यांनी योगदान दिले आहे.

***

### श्री. पुरमवार गुरूजी आणि कुटुंबीय-

श्री. पुरमवार गुरूजींना पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती यांच्याकडूनच अनुग्रह प्राप्त झाला होता. ते परांड्यातच रहात होते, त्यामुळे त्यांच्या घरच्या लोकांनाही पू. स्वामींचे प्रत्यक्ष दर्शन झाले होते. त्यांचा प्रभाव

आता श्री समाधिस्त झाल्यावर ३५-४० वर्षांनी दिसून येत आहे. आता त्यांच्या घराण्यातील बहुतेकांनी श्रींची पूजा करून शिवमंत्र घेतला आहे व नित्यनेमाने जप, रामायण वाचन वगैरे करीत असतात. सौ. शांता वहिनी, श्री. उमाकांत, सौ. माधुरी, श्री. शिवकांत, त्याची पत्नी, श्री. व्यंकटेश व सौ. विद्या व त्यांची मुले सुना तसेच श्री. राजाराम व सौ. द्वारका व त्यांची मुले सर्व अनुग्रहीत आहेत आणि तनमनधनाने श्रीसद्गुरू सेवा करीत आहेत. त्यांच्या मुळेच 'रामविश्रामधाम' मध्ये 'अन्नछत्र' सुरू झाले असून भव्य जेवणघर, स्वयंपाकघर व इतर टेबल खुर्च्या, पलंग आदि आवश्यक सर्व सुविधा उपलब्ध झाल्या आहेत. श्री. व्यंकटेश, श्री. राजाराम या दोघांच्या पायाची हाडे मोडल्याने शस्त्रक्रिया कराव्या लागल्या तरी त्यांची श्रींच्यावर अटळ श्रद्धा आहे. याबद्दल मला खरोखरच कौतुकही वाटते आणि आश्चर्यही वाटते.

श्री पुरमवार गुरूजीतर निष्ठेने इतकी वर्षे उपासना करीत आहेत व श्रीसद्गुरूकृपाही त्यांच्यावर अपार आहे. त्यामुळे आध्यात्मिक क्षेत्रात त्यांचा अधिकार खूपच वाढलेला आहे. पण हे परम रहस्य सर्वांनाच कळत नाही. त्यांनी नांदेड येथे चिन्मय मिशन मध्ये बरेच वर्षे काम केले होते. वेदांताचा व तुलसी रामायणाचा त्यांचा सखोल अभ्यास असून त्यांनी संपूर्ण रामायण ऐकवून अनेकांना आनंद प्रदान केला आहे. विनम्रता तर इतकी आहे, शिवाय स्थितप्रज्ञताही आहे. त्यांच्या निकट सहवासाने, त्यांच्या विशुद्ध आचरणानेच त्यांचे आप्तेष्टही श्रींच्याकडे आकर्षित झाले असे म्हटले तर ती अतिशयोक्ती ठरणार नाही.

त्यांच्याप्रमाणेच श्री. बळीराम पाटील (देशमुख) हे गुरूबंधुही अत्यंत नेमनिष्ठ गुरूभक्त असून त्यांना अनेक संतांचे कृपाशिर्वाद लाभले आहेत. ते पैठणला राहतात. त्यांच्या मुळेच मला पैठणला श्री नाथांचा वाडा, त्यांची विजय विठ्ठलाची मूर्ती, हस्ताक्षरातील पोथ्या, श्रीखंड्याचा स्पर्श झालेल्या वस्तू वगैरेंचा लाभ घेऊन माझी राखी त्या विठ्ठलापर्यंत पोहोचली! या सर्व गुरूबंधुंचा सत्संग व अपार प्रेम मला लाभत असते! त्यांच्या रूपाने रामभैय्याच कृपावर्षाव करतात.

***

## कै. श्री माधवराव जोशी आणि कुटुंबीय– (काळे परिवार भूम)

कै. श्री. माधवराव जोशी आणि त्यांची पत्नी माई दोघेही श्रींचे अनुग्रहीत होते. त्यांची ओळख परंड्यास झाली. श्रींच्या पुण्यतिथीस तीर्थपूजा १९६९ पासून जवळ जवळ १९८७/८८ पर्यंत श्री. माधवरावच करीत असत. पण ते वृद्ध झाले व पुढे त्यांना देवाज्ञा झाली. म्हणून गेली २४ वर्षे डॉ. तात्या जोशी व सौ. शशी ही सेवा करीत आले आहेत. श्रींनी प्रयोपवेशन करून देह ठेवला तेव्हाही श्री. माधवराव व माई हजर होते. चि. मालूलाही श्रींच्याकडूनच अनुग्रह प्राप्त झाला होता. आता १९९० नंतर मात्र श्री. अनंतराव व सौ. सरला वहिनी, कै. डॉ. विलास व श्रीमती प्रभा, तिची मुले, सुना, तसेच श्री. अनंतरावांची मुले, सुना, मुली, जावई, नातवंडे त्यांच्या सर्व बहिणी थोडक्यात सर्वच कुटुंबीयांनी श्रींचा अनुग्रह घेतला असून सर्वांची श्रींच्यावर अपार निष्ठा आहे. कित्येक संकटे आली कसोटीचे प्रसंग आले तरी त्यांची निष्ठा ढळलेली नाही. सर्व निष्ठेने जप, रामायण वाचन वगैरे करतातच पण श्री गुरूपौर्णिमेचा उत्सव, श्रींच्या पुण्यतिथीचा उत्सव यांत जी सेवा करतात ती पाहून थक्क व्हावयास होते.

श्री. मालूचे यजमान श्री. मधुकरराव यांनी तर मुद्दाम कानडी भाषा शिकून श्रींच्या मराठी चारित्र्याचे कानडीत भाषांतर करून ते प्रकाशित केले हा फार मोठा चमत्कारच म्हणावा लागेल. तसेच प्रिय मालूने घरात कुर्डया करून विकून पैसे उभे करून 'रामविश्रामधाम' मंदिरातील सर्व श्री विग्रहांसाठी चांदीचे मुकुट बनवून अर्पण केले हे विशेष होय! आता ती परंडा येथे राहून श्रींच्या हस्तलिखित मानसाच्या हिंदी पोथीवरून पारायणे करीत आहे. मंदिरात काय काय सुविधा आवश्यक आहेत यावर तिचे बारीक लक्ष असते व त्यासाठी ती तन, मन, धनाने झटत असते. शिवाय मराठी मानसाच्या सामुदायिक पारायणांतही नित्य सहभागी होते. श्री सद्गुरू कृपेने तिची अध्यात्मात प्रगति होऊन तिला रामभक्ती लाभो हीच ईश्वरचरणी विनम्र प्रार्थना आहे.

श्री. अनंतराव जोशी यांचा मुलगा चि. अजित आणि जावई श्री. संतोष उर्फ व्यंकटेश चिटगोपकर यांचा 'रामविश्रामधाम' च्या मंदिराच्या निर्मितीत सिंहाचा वाटा आहे. श्री. श्रीरामजी गिल्डा यांनी द्रव्यराशी उभारली त्याचा

योग्य वापर करून संगमरवरी भव्य सुंदर मंदिर उभे करण्यासाठी या दोघांनी फार परिश्रम घेतले. श्रींच्या जयंतीस परंड्यास जाऊन श्रींच्या समाधिवर अभिषेक करण्याची सेवा चि. संतोष प्रेमाने करतो.

मालूस अन्नपूर्णा हे नाव जास्त शोभून दिसते कारण कोणीही मंदिरातून तृप्त होऊन जावे यासाठी ती या वयात वृद्धपणाकडे व अनेक व्याधींकडे दुर्लक्ष करून धडपडत असते.

***

**सौ. श्यामला दिवाकर–**

परंडा येथील श्री. वैद्य घराणे सर्वच ईश्वरनिष्ठांचे आहे. सौ. श्यामलाचे वडील श्री. सद्‌गुरू असतांना परांड्यात जी जी अनुष्ठाने झाली त्यांचे पौरोहित्य करीत असत. पू. कल्याण स्वामींचा परंडा येथे जो मठ आहे तेथे श्री राममंदिर व श्री कल्याण स्वामींचा श्री विग्रह यांची पूजाअर्चा वैद्या कुटुंबीयच प्रेमाने करतात. सौ. श्यामलाला श्रींनी स्वतःच अनुग्रह दिलेलाआहे व तिच्या नावाभोवती त्यांच्या डायरीत त्यांनी वर्तुळही काढलेले आहे. यावरून तिच्या हातून काही विशेष सेवा घडणार आहे याची कल्पना श्रींना असावी. तिने मराठी मानसाचा प्रचार प्रसार व्हावा म्हणून की काय मराठी मानसाची १०८ सामुदायिक पारायणे करण्याचा संकल्प केला होता. तो तिच्या उस्मानाबादमधील अनेक मैत्रिणी व काही गुरूबंधुभगिनी व इतर अनेक नवीन भाविक सहकारी यांच्या मदतीने सुफल संपूर्ण होऊन उस्मानाबाद मध्ये थाटात सांगता समारंभ झाला. तिचे पाहून सौ. रेखा पटवर्धनलाही प्रेरणा मिळून तिनेही तसाच संकल्प केला आहे. व तशी जवळ जवळ सत्तर पारायणे आत्तापर्यंत झाली आहेत. या दोघी आता श्रीरामचरितमानस प्रेमी मंडळाच्या विश्वस्तही झाल्या असून सौ. श्यामला सचिव व सौ. रेखा उपाध्यक्ष म्हणून अत्यंत प्रेमाने आणि उत्साहाने कार्य करीत आहेत. विशेष म्हणजे त्या दोघींचे पति श्रींचे अनुग्रहीत नसूनही त्यांना इतके सहकार्य करीत असतात की सर्वांना आश्चर्य वाटावे. ही खरोखरच फार मोठी गुरूकृपा आहे यात शंका नाही. त्यांच्याहातून अशीच सेवा निरंतर घडावी हीच श्रीसद्‌गुरूंच्या आणि रामभैय्यांच्या चरणी प्रार्थना आहे.

सौ. श्यामलाचा भाऊ श्री. नरहरी व भावजय सौ. चारूलता यांनी तसेच भाची सौ. सुनिता कुलकर्णी व तिचे पती श्री. संजय कुलकर्णी, त्यांची मुले सर्वांनीच श्रींचा अनुग्रह घेतला असून सर्व गुरू सेवारत आहेत. श्री. संजय कुलकर्णी परंड्यास व्यवस्थापक म्हणून काम पहातो व अक्षरशः पडेल ते काम करतो, याबद्दल त्याचे कौतुक करण्यास शब्द अपुरे आहेत. सौ. सुनितानेही आता परंडा येथे भजनी मंडळ स्थापन केले असून राममंदिरात दासबोध पारायणे, मानस पारायणे, सुंदरकांड व हनुमान चालिसाचे पाठ व भजन सेवा इत्यादि करीत असते. सौ. श्यामला प्रमाणे तीही या कार्यात अग्रेसर व्हावी व तिच्या हातूनही उदंड गुरूसेवा घडावी हीच ईश्वरचरणी प्रार्थना आहे! सौ. श्यामलाचे भाऊ श्री. विष्णुपंत, त्यांच्या पत्नी, दुसरा भाऊ पुरूषोत्तम वगैरे सर्वच अत्यंत भाविक आणि आचार संपन्न आणि पू. कल्याण स्वामींची भक्त आहेत. तसेच आपल्यावर जी जबाबदारी सोपविली जाईल ती निष्ठेने आणि तत्परतेने पार पाडीत असतात.

***

**श्री. ग. वि. जोशी (मुंबई)–**

श्री. ग. वि. जोशी यांच्याशी पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती यांचा संबंध आमच्या पूर्वीच आला होता. ते मुंबईला श्री. जोशींच्या घरीच उतरत असत. त्या सर्व कुटुंबीयांची पू. स्वमीजींवर फार श्रद्धा होती. त्याच्या घरी सोवळे ओवळे, नैवेद्य, वैश्वदेव, स्नान संध्या इत्यादि आचार धर्म व्यवस्थित पाळला जाई. त्यामुळे पू. स्वामीना तेथे रहावयास आवडत असावे. त्यांच्या घरांतील श्री. ग. वि., त्यांची पत्नी, बहीण माई, व मुली शांता व कुसूम यांना अनुग्रह मिळालेला होता. शांता 'शारदा सदन' मध्ये शिक्षिका होती. कुसूम बी. ए. होती पण नोकरी करत नव्हती त्यामुळे इस्लामपूर येथे पू. स्वमींचे वास्तव्य आमच्या घरी असताना ती बरेच वेळा आमच्या घरी त्यांच्या सत्संगासाठी येऊन राहिलेली होती. त्यामुळे तिचा सहवास लाभल्याने तिच्या विषयी बरीच आत्मीयता उत्पन्न झाली होती व अद्यापही आहे. ती सर्वच मंडळी नित्य नेमाने निष्ठेने उपासना करणारी होती. कुसुम परांडा येथेही श्रींच्या सत्संगासाठी जाऊन राहिली होती. मात्र शांता व

कुसूम यांचे लग्न झाल्यावर बरीच वर्षे मध्यंतरी त्यांची गाठभेट होत नव्हती. पण १९८१ मध्ये डॉ. रमेश व डॉ. सौ. सुरेखाची मुंबईला ग्रॅंट मेडिकल कॉलेजला बदली झाल्यानंतर परत आमच्या गाठीभेटी होऊ लागल्या व येणे जाणेही वाढले. मालाडला प. पू. किशोरजी व्यास यांचे दोन श्रीमद् भगवत सप्ताह झाले. त्यावेळी श्री. श्रीरामजी गिल्डा यांच्याबरोबर माझे मालाडला बरेच हेलपाटे झाले. तेव्हा रात्री मुक्काम करावा लागला तर मी श्री. मोने यांच्या घरीच जाई. त्यामुळे त्यांचाही चांगला परिचय झाला. कुसुमची अध्यात्मिक प्रगती उत्तम होती व भावावेश होत असे त्यावेळी तिच्या चेहेऱ्यावर वेगळेच तेज दिसे. तिने दासबोध संपूर्ण अभ्यासक्रम पूर्ण केला होता व कित्येक वर्षे परिक्षक (मार्गदर्शक) म्हणून काम केले होते. शांताच्या यजमानांशीही परिचय झाला होता. तिची मुलगी सौ. माधवी (घाणेकर) भावे हिनेही श्रींचा अनुग्रह घेतला आहे व जमेल तशी साधना करीत असते. श्री. नाना जोशी यांचा मुलगा श्री. राम यांच्यावर पू. स्वामींची फार कृपा होती व आहे. तोही सपत्निक परांड्यास उत्सवासाठी आला होता. या सर्वांचा संग म्हणजे सत्संग असतो. प्रापंचिक गोष्टींपेक्षा परमार्थांत रस असल्याने आमचे एकमेकांशी छान जमते. या सर्वांचे अकृत्रिम प्रेम मला लाभले आहे. प्रिय कुसुमच्या दोन्ही मुली सौ. निलिमा व सौ. मनिषा याही श्रीरामचरितमानस प्रेमी मंडळास आर्थिक सहाय्य करून परंड्यास दर्शनास येऊन आपली निष्ठा व्यक्त करीत असतात.

***

## श्री. आबासाहेब व श्री. तात्यासाहेब मुगांवकर काळे (परंडा)

श्री. ना. भा. जोशी यांच्याबरोबर प. पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती यांचे गीता धर्म प्रचारासाठी परांडा येथे जाणे झाले होते. तेव्हा ते श्री. मुगांवकर यांच्या शेतात श्रीमहादेव मंदिर आहे तेथेच उतरले होते. श्री. मुगाांवकर घराण्यावर श्रीहंसराज स्वामी व श्रीअनंतदास महाराज यांचीही कृपा होती व घरांतील सर्व मंडळी अत्यंत सत्वशील, आचार धर्माचे पालन करणारी अशीच होती. श्री. तात्यासाहेब कित्येक वर्षे शिवाची पार्थिव पूजा करीत, असे ऐकिवात आहे. श्री. आबासाहेब, सौ. वत्सला वहिनी, त्यांची

कन्या सौ. कावेरीताई अन्नछत्रे व जावई श्री. नरहर अन्नछत्रे सर्वांनाच श्रींचा अनुग्रह लाभला होता. तसेच श्री. तात्यासाहेबांच्या मुली कालिंदी, यमू, सुधा सर्वांनाच लग्नापूर्वी अनुग्रह लाभला होता. परंडा येथे पूर्वी पाण्याचे फार हाल होते. श्रींचा मुक्काम तेथे असल्याने पाहुण्यांची सतत वर्दळ असे. तेव्हा या सर्व बहिणी खूप लांबून पिण्यासाठी पाणी वगैरे भरून आणून खूप सेवा करत. या सर्वजणींचीच श्रींवर अत्यंत श्रद्धा आहे. सौ. कालिंदीचे यजमान श्री. मधुसूदन देसाई यांचीही श्रींच्यावर खूप श्रद्धा असून श्रीरामचरितमानस प्रेमी मंडळास त्यांचे सहकार्य सदैव लाभत आलेले आहे. आता त्यांनी प. पू. स्वामी गोविंददेवजी गिरी यांचा अनुग्रह घेतला असून ते त्यांच्या विशेष कृपेस पात्र ठरलेले आहेत. सौ. कालिंदी परंडा येथे रामविश्रामधाम येथे संपूर्ण श्रीराम नवरात्रात राहून आम्हा सर्वांच्या वतीने श्रीरामचरितमानस (मराठी)चे सामुदायिक पारायण व त्याकाळातील उत्सव मोठ्या प्रेमाने आणि थाटाने संपन्न करते. सौ. कावेरीताईचा मुलगा चि. अनिल हा सुरूवातीपासून 'रामचरितमानस प्रेमी मंडळा' चा विश्वस्त असून श्री. हंसराज मठात त्यांच्यामुळे फरशी घातली गेली आहे. श्रीराममंदिरचे बांधकामही त्याच्या देखरेखी खालीच फार उत्तम झाले आहे. अद्यापही जी लागेल ती मदत तो आत्मीयतेने करतो. डॉ. कल्याण काळे यांनी पू. हंसराजस्वामींच्यावर प्रबंध लिहीला असून त्यांच्यावर श्रीहंसराजांची पूर्ण कृपा असल्याने श्री हंसराज स्वामींच्या सर्व प्रसिद्ध ग्रंथांच्या नवीन आवृत्त्या निघाल्या असून त्यांनी आपले जीवनच या कार्यास वाहून घेतले आहे. त्यांनी आईवडीलांची खूप सेवा केली असून अविवाहीत राहूनही त्यांनी काळे कुटुंबाची खूप सेवा केली आहे व करीत असतात. श्री. रामभाऊ यांची पत्नी विजू वहिनी हिने श्रींचा अनुग्रह घेतला आहे. श्री. तात्यासाहेब काळे यांचे चिरंजीव श्री. अप्पा व कुमुदवहिनी यांच्या घरीच पूर्वी आम्ही उतरत असू. श्री. हंसराज मठात खोल्या बांधल्या जाऊन पाण्याची, संडास–मोऱ्यांची सोय झाल्यावर आम्ही तिकडे उतरू लागलो. कुमुद वहिनी व अप्पांचेकडे आमचे माहेरपण होत असे. त्यांच्या इतके निरपेक्ष प्रेम करणाऱ्या व्यक्ती क्वचित पहावयास मिळतात. सर्व कुटुंबीयांना सादर सप्रेम अभिवादन! ***

## वै. सौ. कुसुमताई लेले-

श्री. ना. भा. जोशी यांनी इस्लामपूर सोडल्यावर ते सातारा येथे नोकरी करीत होते व साताऱ्यात अदालत वाड्यात रहात होते. तेथे शनिवार माची येथे श्रीविष्णू मंदिरात मला वाटते, ते रामायणावर प्रवचन करीत. सामुदायिक पारायणेही होत असत. तेथे त्यांच्याकडे श्रीसद्गुरू स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती यांचा मुक्काम असता साताऱ्यात काही लोकांनी त्यांचा अनुग्रह घेतला. त्यात श्री. अण्णा पाठकजी, त्यांची पत्नी, श्री. मारूतराव देशपांडे, व सौ. कमुताई यांच्याशी माझा अधिक संबंध आला. ही सर्व नंतर इस्लामपूर येथेही आमच्या घरी आली होती. सौ. कमुताई व आमचे जरा नातेही होते. तिच्या सासूबाई ह्या ह्यांच्या चुलत मावशीही लागत होत्या आणि ह्यांच्या सख्ख्या मावशी, त्यांचे यजमान, मुलगा, सून, नाती सर्व अगदी जवळच रहात होते. त्यांचे सर्वांचे एकमेकांकडे येणे जाणे होते. मावशी सातारला होत्या त्यामुळे हे होते तेव्हा घरच्या गाडीने पुणे अथवा मुंबईकडे जाताना आम्ही नेहेमी सातारला त्यांना भेटून पुढे जात असू.

सौ. कमुताई उंच, स्वच्छ गोरी, नाकी डोळी सुंदर, प्रमाणबद्ध बांधा अशी होती. नऊवारी चापून चोपून नेसलेली असे., पदर नेहेमी खोचलेला, चटपटीत, कष्टाळू हसतमुख अशी कमुताई सर्वांचे मन जिंकून घेई. तिचे माझे एकमेकींवर फार प्रेम होते. प. पू. स्वमींच्या चरणी तिची अनन्य निष्ठा होती. ह्यांना देवाज्ञा झाली, त्यानंतर आमच्या वरचेवर गाठी भेटी होत नसत. मग श्रीसद्गुरू समाधिस्थ झाले. पण आमचे प्रेम मात्र टिकून होते. प्रिय मंगलाताई ओक दरवर्षी 'समर्थमंदिर, सातारा येथे प्रवचने वा कीर्तनासी जाई तेव्हा त्या दोघींची मात्र गाठ पडे. मंगला आमच्या दोघींच्या मधला दुवा होता असे म्हणता येईल.

एकदा मंगला आणि मी मुद्दाम सौ. कमुताईला भेटायला सातारला गेलो होतो आणि डोंबिवलीच्या गणेश मंदिरात मंगला ताईची कीर्तने होती. तेव्हा आम्ही मुंबईत होतो म्हणून त्या दोघी कार्यक्रमाआधी एक दिवस भायखळ्यास आमच्या घरी आल्या होत्या व मीही नंतर एक दिवस मुद्दाम डोंबिवलीस कीर्तन ऐकायला गेले होते. त्या दोघी गणेश मंदिरातच राहिल्या

होत्या. सकाळी श्री. गिल्डांच्या घरी रामायण वाचन होई व संध्याकाळी देवळात कीर्तन होई. यानंतर सौ. कमुताई आजारी पडल्याने आमची गाठच पडली नव्हती. पण भगवंताचे नियोजन काही विलक्षणच असते असे म्हणण्यासारखा अनुभव आला एवढे मात्र खरे!

चि. आरती भायखळ्यास सेंट ॲग्नस या मुलींच्या कॉन्व्हेंट स्कूलमध्ये होती. तिचा नेहेमी प्रथम क्रमांक असे म्हणून तिच्या क्लास टिचरने (वर्ग शिक्षिकेने) तिला विचारले की, कोण अभ्यास घेते? तेव्हा तिने ग्रॅनी (आजी) अभ्यास घेते म्हणून सांगितले तेव्हा तिच्या शिक्षिकेने मुद्दाम मला भेटायला बोलावले होते. त्यामुळे आमची ओळख झाली होती. चि. आरती बास्केट बॉलच्या टीममध्ये होती. मुंबईतल्या सामन्यात त्यांची टीम जिंकली होती व नंतर राज्य स्तरावरील सामने सातारला होणार होते. आम्ही सांगली-सातारा विभागातून मुंबई येथे आलो होतो हे तिच्या शिक्षिकेस कसे कळले, ते एक रामभैय्याच जाणोत पण तिच्या शिक्षिकेचा फोन आला की, बास्केट बॉल टीमला घेऊन सातारला जावयाचे आहे. त्या भागात आम्ही कधी गेलेलो नाही. तरी तुम्ही आम्हाला मदत कराल का? मला आश्चर्य वाटले आणि त्यांनी मला विनंती केली की मीही त्यांच्याबरोबर यावे. मी म्हटले ठीक आहे आणि मी सातारला रजताद्रि हॉटेलवर फोन करून आवश्यक तेवढ्या जागांचे बुकिंग केले. मॅचेस ज्यादिवशी होत्या त्याच्या आदल्या दिवशीच्या एशियाड (रातराणी) चे रिझर्व्हेशन केले. बॉम्बे सेंट्रल बस-स्थानकावर सर्व एकत्र जमून रातराणीने साताऱ्यास निघालो. गाडीत थोडावेळ मुलींनी गाणी वगैरे म्हटली, नंतर सर्व बसल्याबसल्याच डुलक्या घेऊ लागल्या. साताऱ्यास बस तशी अपरात्रीच पोहोचली. बस स्थानकावरून आम्ही रजताद्रिवर गेलो. आधी रिझर्व्हेशन असल्यामुळे लगेच आमचे सामान आत नेऊन आमच्या खोल्यांत ठेवण्यात आले व सर्वांनी जाऊन आपापल्या बिछान्यावर स्वतःला झोकून दिले.

दुसरे दिवशी सर्वांनी नित्यक्रम आवरून ज्या क्रिडांगणावर सामने होते तिकडे कूच केले व तेथे समोरच असणाऱ्या एका हॉटेलमध्ये न्याहारी केली व सर्व क्रिडांगणाकडे जाण्यास निघाल्या. मी शिक्षिकेस म्हटले की, 'आमचे नातेवाईक सातारा शहरात आहेत त्यांना भेटून तिकडेच जेवून मी

दुपारी ४।। पर्यंत परत रजताद्रिवर येईन.' त्यांनी अनुमति दिल्यावर मी रिक्षा करून सरळ सातारा, शनिवार माची येथे सौ. कमूताईचे घर गाठले. त्यावेळी ती अगदी अंथरूणास खिळूनच होती. तिचा मुलगा अनंता मुद्दाम तिची सेवा करण्यासाठी तेथे येऊन राहिला होता. चि. अश्विनीकुमार, सौ. क्षमा सर्वांनाच मला पाहून आश्चर्य वाटले. सौ. क्षमा, सौ. कमूताईला म्हणाली की, ''पहा, तुम्ही म्हणत होता ना की, 'पू. स्वामींना माझा विसर पडला की काय? मी अशी आजारी, कुणी गुरूबंधूभगिनीही भेटत नाहीत!' आता तरी पटले ना की पू. स्वामींना तुमचा विसर वगैरे काही पडलेला नाही! पहा त्यांनी कसे कमाताईंना धाडून दिले!'' हे सर्व ऐकून मला फारच आश्चर्य वाटले आणि अत्यंत आनंदही झाला. सौ. कमूताई व ती. अप्पा (तिचे यजमान) यांनाही खूपच आनंद झाला. सौ. क्षमाने बजावले की जेवायला इकडे या. मी बरे म्हटले आणि नंतर समोरच माझे मावसदीर ती. अण्णा भाऊजी व जाऊ सौ. इंदूताई यांच्याकडे गेले. त्यांनाही मला पाहून फार आश्चर्य वाटले व आनंदही झाला. त्यावेळी तेथे डॉ. ओक आलेले होते. तेही आमच्या नात्यातलेच होते. पण आमची त्यापूर्वी कधी गाठभेट झालेली नव्हती. ती. अण्णा भाऊजींनी 'ही बाळची बायको!' अशी माझी ओळख करून दिली व मग ते माझ्याशी गप्पा मारू लागले. त्यांनी त्यांच्या घरी येण्याचाही आग्रह केला आणि त्यांचा फोन नंबरही दिला. मी त्यांना कशासाठी आले आहे वगैरे सांगून ह्यावेळी जमेलच असे नाही; असे म्हटले व सौ. इंदूताईंच्या कडे चहा वगैरे घेऊन त्यांचा निरोप घेतला व जेवायला परत सौ. कमूताईकडे गेले. तेथे जेवून भरपूर गप्पा वगैरे करून मी परत रजताद्रिवर गेले. संध्याकाळी क्रिडांगणावरून सर्व टीम परतली व जेवून सर्व आपल्या खोलीत गेल्या.

दुसरे दिवशीच्या रात्रीचे 'रातराणी' चे आमचे सर्वांचे सातारा – मुंबई चे रिझर्व्हेशन होते आणि दुसरे दिवशी उठलो तर बरोबर आलेल्या शिक्षिका आजारी पडल्या होत्या. डोके दुखत होते, उलट्या झाल्या, तापही भरला, दुसऱ्या शिक्षिका टीमला घेऊन क्रिडांगणावर गेल्या. मी म्हटले, ''घाबरू नका. माझे एक दीर येथे डॉक्टर आहेत त्यांना मी बोलावते, ते औषध वगैरे देतील आणि प्रवास करावा की नाही हेही सांगतील.'' मी लगेचच डॉ.

ओक यांना फोन करून सर्व परिस्थिती सांगितली. आदले दिवशीच्या गप्पा गोष्टीत मी सातारला का व कशी आले हे मी बोलले होते. त्यामुळे माझा फोन जाताच ते ताबडतोब रजताद्रिवर हजर झाले. त्यांनी या शिक्षिकेस तपासून लगेच औषधे दिली व दुपारपर्यंत त्यांना बरे वाटेल. काळजीचे कारण नाही. रात्री तुम्ही जाऊ शकता असे सांगितले. त्यांनी सांगितल्याप्रमाणेच झाले. शिवाय त्यांनी पैसेही घेतले नाहीत. हे सर्व ज्याप्रकारे घडले त्यावरून रामभैय्या कसे 'कारणरहित दयाल' आहेत असे मनात येऊन अंतःकरण भरून आले. सौ. कमूताईची व माझी अकस्मात भेट झाली त्यामुळे आम्हाला दोघींना तर आनंद झालाच शिवाय सहज ती. अण्णा भऊजींच्या घरी डॉ. ओकांची ओळख होते काय, नेमकी ती शिक्षिका आजारी पडते काय आणि माझ्याजवळ फोन नंबर असल्याने डॉ. ओक येऊन लगेच उपचार करतात काय! तिला बरे वाटले म्हणून आम्ही सर्व ठरलेल्या 'रातराणीने' मुंबईस परतू शकलो! भगवंताची कृपा सर्व जीवांवर असते याची प्रचिती आली. वै. सौ. कमूताईचा एक मुलगा अनंता याने अध्यात्मालाच वाहून घेतले आहे. तोही मुद्दाम येऊन मला भेटून गेला होता आणि त्याने प्रेमाने मला शालही दिली होती ती मला घ्यावीच लागली. चि. अश्विनीकुमारही काही ना काही निमित्ताने भेटतो. तिची मुलगी सौ. सुशीला फडके ही पण मुद्दाम परंड्यास श्रींचे दर्शनास येऊन गेली. सौ. कमूताईचा पारमार्थिक अधिकार बराच मोठा होता. श्रींच्या चरित्रग्रंथात तिचे अनुभव नोंदवले आहेत. तिला रामनवमीला देवाज्ञा होऊन ती गुरूचरणी लीन झाली.

***

## श्री. दामले काका, सौ. कमला ताई व सौ. रेखा पटवर्धन

श्री. दामलेकाकांचा व सौ. कमलाताईंचा अनुग्रह इस्लामपूरला आमच्या घरीच झाला होता. मला वाटते त्याच वेळी माधवनगर मिलचे मालक श्री. नातू शेठ यांचाही अनुग्रह झाला होता. एका चार्तुमासात पू. स्वामी सांगलीला नदीकाठी विष्णूमंदिरात राहिले होते. भिक्षेला गावात जात. त्यावर्षी भयंकर पाऊस पडून कृष्णेला पूर येऊन विष्णुमंदिराचा तळ मजला संपूर्ण पाण्यात

बुडाला होता. पू. स्वामी पहिल्या मजल्यावर रहात होते. ते रोज होडीतून धाबळी नेसून गावात येत आणि करपात्र भिक्षा ग्रहण करून परत होडीतून मंदिरात परत जात. त्यावेळी श्री. कुलकर्णी मास्तर, श्री. बापट, श्री. दामले काका यांना २ महिने चातुर्मासात श्रींची सेवा घडली होती. आम्ही सांगली, विश्रामबाग, मिरज येथे होतो तोपर्यंत श्री. दामले यांची गाठ पडे. १९७४ मध्ये तर आम्ही 'सावली' बंगल्यात विश्रामबागलाच रहात होतो. त्यावेळी खूप येणे जाणे होई. त्यावेळी चि. रेखाचे लग्न झालेले नव्हते. नंतर १९८० च्या जानेवारीत श्री. दामलेकाका, ओक काका, सौ. मंगला व मी असे आम्ही सर्वांनी मिळूनच मिरजेला गोरे मंगल कार्यालयात साधक मेळावा भरविला होता. नंतर १९८१-८२ मध्ये आम्ही मुंबईस गेल्यापासून त्यांची व सौ. कमलताईची गाठ १९९३ पर्यंत जवळ जवळ पडलीच नाही. त्या अवधितच सौ. कमलताईंना देवाज्ञा झालेली होती व श्री. दामले काका मिरजेला सौ. रेखाकडे रहावयास गेले होते. तेव्हा एकदा तिच्या घरी श्री. श्रीरामजी गिल्डा व मी त्यांना जाऊन भेटलो होतो व 'श्रीरामचरितमानस प्रेमी मंडळाची' स्थापना झाल्याची तसेच पू. स्वामींची टीका प्रकाशित व्हावी म्हणून आम्ही प्रयत्न करीत असल्याचे सांगितले. त्यांना आनंद झाला. ते कागवाड - नवबाग येथील पू. स्वामी ब्रह्मानंद यांच्या मंदिराचेही ट्रस्टी होते व त्याच्या विकासासाठीही त्यांनी प्रयत्न केले होते. त्यांनी त्या काळात दहा हजार रूपयांचे डिपॉझिट ठेवून त्याचे व्याज दरवर्षी परांडा येथील श्री. च्या पुण्यतिथी उत्सवाच्या वेळी देण्यात यावे अशी व्यवस्था केली होती. त्याप्रमाणे अजून ते व्याज जमा होत असते. श्री. दामले, दोघा पती-पत्नींनी मरणोत्तर नेत्र दान केले होते. तसेच आमची एक गुरूभगिनी सौ. शांताबाई आठले हिनेही केले होते. सौ. आई व वडील यांच्या संस्कारामुळे चि. रेखास लग्नापूर्वीच 'श्रीरामचरितमानस' या ग्रंथाची गोडी लागली होती. शिवाय ती व तिची बहिण दोघी श्रींच्या कृपेनेच जगल्या होत्या. म्हणूनच ती पुढे श्रींच्या कडे ओढली गेली आणि १९९४ नंतर आम्ही मिरजेस आल्यापासून तर तिने श्रींच्या सेवेस संपूर्ण वाहून घेतले आहे. व 'प्रज्ञा शिष्या रामदासी हे नाव धारण करून ती तन, मन, धनाने 'श्रीरामचरितमानस प्रेमी मंडळा' च्या कार्यासाठी झटत आहे. तिने अनुग्रह घेतल्यानंतर तिच्या

घरी साधक मेळावा भरविला होता. तेव्हाच श्री. हरेरामपंत बोडसांना प्रवचनास बोलावले होते तेव्हा त्यांची ओळख झाली. नंतर तिने 'श्रीरामचरितमानसाचे' (मराठी) व सामुदायिक पारायण तिच्या घरी ठेवले व संध्याकाळी त्यावर हेर्लेकर शास्त्रीची प्रवचने ठेवली. प्रत्येक कार्यक्रमासाठी तिने परिश्रम घेऊन अचूक सूत्र संचालन केले आहे. नंतर तिचे घर रेल्वे स्टेशन बसस्थानकाच्या अगदी जवळ असल्याने व तिच्या व चि. सुहासच्या प्रेमळ अतिथ्यामुळे सर्व गुरूबंधुभगिनी तिच्याकडेच उतरू लागली. शिवाय साधारण २००० पासून माझ्याही पाठीच्या दुखण्यामुळे मी परस्वाधीन झाले. त्यामुळे ही तिच्या घरी उतरल्याने त्यांची सोय झाली. तसेच पुढे रामविश्रामधाममध्ये पू. मुरारी बापूंच्या हातून श्रीराममूर्तीची प्राणप्रतिष्ठा दि. २८ मार्च २००३ ला झाली तेव्हा तसेच पुढे पू. श्री. किशोरजी व्यास यांच्या हातून भरत, शत्रुघ्न, माखनचोर व शिवलिंगाची प्रतिष्ठापना झाली तेव्हा तसेच त्याआधी मिरजेत २८ कुंडे घालून १०८ यजमानांनी हनुमान चालिसाचे हवन करून हनुमान यज्ञ केला तेव्हा तिन्ही प्रसंगी दरवेळी एक लाख रूपये अनुदान देऊन चि. सुहास आणि सौ. रेखा यांनीच यजमानपद भूषविले होते. श्रीसद्गुरूंची व रामभैय्यांची सेवा करणे याबाबत तिने आम्हा सर्वांवर मात केली आहे. माझ्या मानसकन्यांपैकी ती एक आहे. ती इतके प्रेम माझ्यावर करते की शब्दांत सांगता येत नाही! महाराष्ट्रात 'श्रीरामचरितमानस' या ग्रंथाशी तिचे नाव जोडले जाईल यात शंका नाही. ती इतके काम करू शकते ते श्री. नीळकंठ उर्फ चि. सुहासचा तिला मनःपूर्वक सहयोग लाभत आहे म्हणूनच शक्य होत आहे. तिचे सासरे हेही चिन्मय मिशनच्या मिरज शाखेत उत्साहाने कार्यरत असत.

***

**श्री. अप्पा महाजन– वकील परंडा व सौ. सरला वहिनी**

श्री. अप्पांच्या ती. आईंना (आम्ही त्यांना अक्का म्हणत असू) ही श्रींचा अनुग्रह लाभला होता. तसेच त्यांची बहीण लता हिलाही अनुग्रह लाभला होता. श्री. अप्पा मातृभक्त असल्याने त्यांच्या आईमुळे त्यांच्याशी निकट संबंध आला. शिवाय ज्या श्रीहंसराज स्वामींच्या मठात श्रींची समाधि आहे

त्या हंसराज मठाच्या विश्वस्त मंडळाचे ते अध्यक्ष असल्याने त्यांच्या सहकार्याशिवाय आम्ही काहीच करू शकलो नसतो. १९८७ मध्ये प. पू. श्रीडोंगरे महाराजांच्या कृपेने अन्नछत्र व समाधीच्या नैवेद्यासाठी जे अनुदान मिळाले ते हंसमंडळाकडेच जमा होत आलेले आहे कारण त्यावेळी 'श्रीरामचरितमानस प्रेमी मंडळा' ची स्थापना झालेली नव्हती. श्रींच्या पुण्यतिथी उत्सवात जे कोणी विशेष संत-महात्मे वगैरे येत त्यांची उतरायची, राहण्या-जेवण्याची व्यवस्था ती. अप्पांच्या घरीच केली जात असे. सौ. सरला वहिनींच्या प्रेमळ व कष्टाळू स्वभावामुळेच हे शक्य होत असे. मला ते माझे माहेरच वाटते. त्यामुळे एखादी गोष्ट त्यांना कशी सांगावी, ते काय म्हणतील असे कधीही माझ्या मनातच येत नाही. मी प्रेमाने एखादी विनंती केली आणि ती. सौ. सरला वहिनी व ती. अप्पांनी मानली नाही असे आत्तापर्यंत कधीच झालेले नाही. प. पू.स्वामी तेजोमयानंद, प. पू. किशोरजी व्यास, प. पू. शंकराचार्य विद्याशंकर भारती स्वामी, करवीर पीठ श्री. पू. मुकुंद महाराज जाटदेवळेकर, पू. डुंगरदासजी महाराज, श्री. जाखोटिया वगैरे सर्वांची व्यवस्था त्यांच्याच घरी करण्यात आली होती. तसेच श्रीरामचरितमानस प्रेमी मंडळाच्या प्रत्येक कार्यात त्यांचा सक्रिय सहभाग असतो. ती. अप्पा प्रवचनही सुंदर करतात. त्यांचे इतर तिघे बंधूही भगवत् भक्त आहेत. प्रिय लताच्या घरींही आम्ही सर्व गुरुबंधुभगिनी राहिलो होतो व नगरच्या ब्राह्मण सभा कार्यालयात श्री. हेर्लेकर शास्त्रींचा श्रीमद् भागवत सप्ताह झाला होता. नंतर सौ. लताने मुद्दाम भाड्याच्या गाडीची व्यवस्था करून आम्हा गुरू बंध भगिनींना पू. श्रीरसागर महाराजांचे देवस्थान, व श्री दत्तदेवस्थान, शनि-शिंगणापूर, नेवासे वगैरे आसपासच्या तीर्थक्षेत्रांचे दर्शन घडवून आणले होते. सौ. रेखा पटवर्धन प्रमाणेच ती माझी प्रेमाने वैयक्तिक सेवाही करते आणि सामुदायिक पारायणांतही तिचा सहभाग असतो. तिच्यामुळे नगर येथील सौ. भिडे यांनी आमच्या मंडळास रू. ७५ हजारांची देणगी दिली. तिच्या घरी प. पू. प्रसाद महाराज, अमळनेरकरही दरवर्षी येतात व सर्व कुटुंबावर त्यांचीही कृपादृष्टी आहे.

***

**श्री. नानासाहेब देशमुख–**

श्री. नानासाहेब देशमुखांच्या पू. मातोश्रींना पू. श्री. प्रज्ञानानंद सरस्वती स्वामींचा अनुग्रह प्राप्त झाला होता. जेव्हा श्रींनी प्रयोपवेशन करून देहत्याग करण्याचा निश्चय केला तेव्हा श्रीरामविश्रामधाममधून श्री नानासाहेब देशमुख यांच्या घरी मंगळवार पेठेत मुक्कामास आले व त्यांच्या घरीच माडीवर श्रींनी पार्थिव देहाचा त्याग केला व ते ब्रह्मालीन झाले होते. नंतर मिरवणुकीने हंसराज मठात नेऊन समाधि देण्यात आली. मी काही पू. मातोश्रींना पाहिलेले नाही. पण श्री. नानासाहेब श्रींच्या पुण्यतिथी उत्सवात नेहेमी भेटत असत व त्यांच्याबद्दल आम्हा सर्वांनाच आदर वाटत आला आहे. आता श्रीरामचरितमानस प्रेमी मंडळातर्फे बांधल्या जाणाऱ्या भक्तनिवासाची जबाबदारी श्री. मुकुल देशमुखवर सोपविण्यात आलेली आहे व तो ती समर्थपणे पेलत आहे. कारण त्यांच्या घराण्यावर असलेली श्रींची कृपाच होय.

***

**परंड्यातील इतर भक्त मंडळी–**

श्री. मधु डाके यांस श्रींनी स्वतः अनुग्रह दिलेला होता. श्रींनी १९६८ मध्ये समाधि घेतल्यापासून ते आत्तापर्यंत इतकी वर्षे श्रींच्या उत्सवात समाधिमंदिर असो वा राममंदिर दोन्हीकडे मांडव घालणे, माईकची, पंख्याची व्यवस्था वगैरे जे पडेल ते काम श्री. मधु करीत आला आहे. श्री. ग. स. नाईक येऊन हंसराज मठातील खोलीत राहिले असता ते आजारी पडून जवळ जवळ स्मृतिभ्रंश झाल्यासारखी त्यांची स्थिती झालेली होती. तेव्हा त्यांच्या अंतकाळापर्यंत त्याने त्यांची सेवा केली हे विशेष होय. ही त्याची सेवा श्रींच्या चरणी रूजू होईल अशी खात्री वाटते.

तसेच हंसराज मठात व्यवस्थापक म्हणून राहिलेले श्री. पाटील पतिपत्नी, श्री. श्रीहरी जोशी, पुजारी श्री. अविनाश यांचा निदान कृतज्ञता पूर्वक उल्लेख करायलाच हवा. तसेच श्रीराम मंदिरात सेवा भावनेने स्वच्छता करणारा संजू तसेच श्री हेर्लेकर शास्त्रींच्या हाताखाली शिकून तयार झालेले चि. अमित जोशी व त्याची तिथे रहात होती ती कै. आजी व

त्यांच्या हाताखाली शिकून आता सेवा करीत असलेला चि. अनुप जोशी यांच्यामुळे श्रीराम मंदिरातील पूजेची व्यवस्था उत्तमप्रकारे संपन्न होत आहे. नाहीतर हल्ली अशी परिस्थिती झालेली आहे की मंदिरात पुजारी उपलब्ध होत नाहीत. श्री. हेर्लेकर शास्त्रींच्या हाताखाली शिकल्याने त्यांना संगीताची जाण असून तबला पेटी वाजवू शकतात. आणि वेळीप्रसंगी कीर्तनही करू शकतात. याशिवाय सौ. घारकर ताई, श्री. विजू वहिनी वगैरे अनेक भक्तमंडळी मनापासून श्रींची सेवा करीत असतात. किती नावे घेणार?

***

## पूज्य श्री. श्रीरामजी गिल्डा

ह्यांना व मला १९५१ मध्ये शक्तिपात दीक्षा मिळाली होती तर श्री. आदिनाथ यादव, श्रीरामजी गिल्डा यांना मला वाटते १९५६ मध्ये अनुग्रह प्राप्त झाला. मला वाटले होते त्यापेक्षा श्री. श्रीरामजी बरेच तरूण निघाले. आम्ही परंडा येथे श्रीगुरुपौर्णिमा उत्सवास गेलो होतो. तेव्हा प्रथम या दोघांची प्रत्यक्ष गांठ पडली. त्यावेळी आम्ही श्री. गोपीनाथकाका माढेकर यांच्याकडे उतरलो होतो. पू. श्री सद्‌गुरु त्यावेळी भुताचावाडा म्हणून प्रसिद्ध असलेल्या वाड्यात राहात होते. श्री व्यासपूजा श्री. आबासाहेब मुगांवकर यांच्या वाड्यात ओसरीवर झाली व समोरच कॉंग्रेसभुवनचा हॉल होता तेथे संध्याकाळी प्रवचने झाली. दुसऱ्या दिवशी आम्ही परंड्याहून निघून नळदुर्ग, माणिकनगर व अक्कलकोट वगैरे ठिकाणी दर्शने घेऊन मुक्कामास गाणगापूर येथे गेलो होतो. त्यावेळी फारसे संभाषण होऊ शकले नाही. श्री.भाऊंचा खरा परिचय हे गेल्यावर तसेच पू. स्वामींची महासमाधि झाल्यानंतरच झाला. १९८० मध्ये पू. स्वामींचे चरित्र लेखनासाठी माहिती गोळा करण्यासाठी मिरज येथे गुरूबंधुभगिनींचा मेळावा भरविला होता. तेव्हा ३०/३५ इतर गुरूबंधु भगिनींचा परिचय झाला. पण श्री. श्रीरामजी व सौ. भाभी आल्या नव्हत्या. त्यामुळे त्यांचा विशेष परिचय झाला नाही. शिवाय श्री. ओककाका, सौ. मंगला, मी आम्ही १९७६ पासून परंड्यास श्रींच्या पुण्यतिथी उत्सवास जात होतो. पण तेथेही त्या दोघांची कधी भेट झाली नव्हती. पण चि. डॉ. रमेश व चि. डॉ. सौ. सुरेखाची मिरजेहून १९८१

मध्ये मुंबईत (जे.जे. हॉस्पिटल) ग्रँट मेडिकल कॉलेजला बदली झाली आणि आम्ही मुंबईत आलो. तेव्हापासून मात्र आमचे जाणेयेणे सतत वाढतच गेले. त्यावेळी ते मालाडला राहात होते. पण नंतर ते डोंबिवलीला राहावयास गेले. त्यानंतर मी त्यांच्याकडे व ते आमच्याकडे कितीवेळा आलो गेलो हे सांगणे कठीण आहे. त्यांच्यामुळेच पू. मुरारीबापू, पू. किशोरजी व्यास, पू. स्वामी तेजोमयानंद यांची ओळख झाली. खरोखर त्यांचे माझे अनेक जन्मींचे नाते बंधुभगिनींचे असले पाहिजे. त्याशिवाय इतकी आत्मीयता, इतका विश्वास, इतके निरपेक्ष प्रेम असूच शकणार नाही. त्यानंतर १९८१ पासून त्यांना देवाज्ञा होईपर्यंत म्हणजे २०११ मधील १३ जानेवारी पर्यंत त्यात कधी अंतर पडले नाही. आम्ही बरोबर काम केले, बरोबर सत्संगाचा आनंद लुटला आणि एकमेकांच्या सुखदु:खात नेहमी सहभागी झालो. त्यांच्या डोळ्यादेखत त्यांची विवाहीत मुलगी सौ. सावित्री व धाकटा मुलगा चि. विष्णु यांना देवाज्ञा झाली. या दोन्ही प्रसंगी त्यांची स्थितप्रज्ञता प्रत्यक्ष दिसून आली. तसेच त्यांनी त्यांच्या सुनेला प्रिय रेखाला व नातवंडांनाही मोठा आधार दिला. ते महुवाला

२/३ वेळा सत्संग व साधनेसाठी जाऊन राहिले होते. त्यामुळे पू. मुरारीबापू त्यांच्या घरी येऊन गेले होते व त्यांची विशेष कृपा पू. भाऊंच्यावर होती.

***

## कुसूम– सौ. रजनी पूर्णचंद्र तांबे

माझे लग्न १९४२ मध्ये मी पंधरा वर्षाची असताना झाले तेव्हा चि. कुसूम १२ वर्षाची होती. तिचा जन्म ३ एप्रिल १९३० चा आहे. माझे लग्न ठरले म्हटल्यावर तीच रडायची! सर्व तिला म्हणत की, ‘अगं तू का रडतेस? तुझे लग्न ठरले आहे की ताईचे?’ ती फार हळवी होती. ती सौ. पद्माकाकू बरोबर कऱ्हाडला चि. माधव, वसंताच्या मुंजीला गेली होती तेव्हा घरची आठवण काढून रडत असे असे ऐकले होते. सौ. सुशिलाकाकूला देवाज्ञा झाली, मला वाटते १९४६ मध्ये असेल. त्यावेळी चि.मकरंद अगदी १० दिवसांचाच होता. त्याचे सर्व करण्यात ती. सौ. आईबरोबर कुसूमनेही

खूप कष्ट घेतले होते. म्हणूनच चि. मकरंदाच्या लग्नात तिचा आठवणीने मान करण्यात आला. तिने S.N.D.T. विद्यापीठांतून B.A. म्युझिकची पदवी प्राप्त केली होती.

भारताला स्वातंत्र्य मिळून पाकिस्तानची निर्मिती झाल्यावर काही ना काही कारणाने ती. अण्णासाहेबांना पाकिस्तानात जावे लागले. ते जाऊन परत येईपर्यंत सौ. आईंच्या मनावर एक प्रकारचे दडपण असे. त्यामुळे की काय पण तिला दम्याचा विकार जडला. त्यामुळे तिला खूप त्रास सोसावा लागे. त्यात माझ्या चुलत्यांचीही स्वतंत्र बिऱ्हाडे झाली होती. प्रिय कुसूमने त्या काळात सौ. आईची खूप सेवा केली. मी सासरी असल्याने प्रत्यक्ष काहीच पाहिलेले नाही. पण कुसूम आणि नंतर सरला यांनी आई-वडिलांची खूप सेवा केली हे मात्र खरे.

सौ. कुसूमचे लग्न श्री. पूर्णचंद्र तांबे यांच्याशी १ मे ला महाराष्ट्र राज्य दिनादिवशी उद्यान कार्यालय, पुणे येथे झाले. तांबे कुटुंब हे मनुताई तांबे उर्फ झाशीच्या राणीच्या वंशातील म्हणून त्या कुळांतील सर्वांनाच अभिमान वाटतो. श्री. तांबे कुटुंब पूर्वी कराचीत राहात होते. फाळणीच्यावेळी त्यांना कराची सोडून भारतात यावे लागले. बडोदा येथे त्यांचे भाऊबंद होते म्हणून ती सर्व मंडळी बडोद्यास राहिली. श्री.पूर्णचंद्र नोकरीनिमित्त कलकत्त्यात होते. या सर्व मंडळींनाच समाजसेवेची अत्यंत आवड होती. असो. सौ. कुसूमच्या लग्नाचा मुहूर्त सकाळी ७ चा होता. त्यामुळे पहाटे ३ लाच सर्वांना उठावे लागले होते. सुप्रसिद्ध गायक श्री. भीमसेन जोशींचे श्री. तांबे यांच्याशी स्नेहसंबंध असल्याने त्या रात्री उद्यान कार्यालयात श्री. भीमसेन जोशी यांचे गाणे झाले होते. त्यावेळी ते नुकतेच प्रसिद्धीच्या झोतात येऊ लागले होते. पुढे 'भारतरत्न' म्हणून ते ख्यातनाम झाले. हे सर्वश्रुतच आहे.

सौ. कुसूमचे वास्तव्य प्रथम कलकत्ता, नंतर बांगलादेशच्या युद्धापासून बडोदा येथे व परत मुलांची शिक्षणे झाल्यावर परत कलकत्ता येथे झाल्याने त्या सर्वांचा सहवास फार कमी लाभला. पण मी चि. चंद्रकिरणच्या लग्नानंतर वऱ्हाडाबरोबरच कलकत्त्यास गेले तेव्हा म्हणजे तिच्या लग्नानंतर ३०/३५ वर्षांनी मी प्रथम तिच्याकडे गेले. तिचे पण माझ्यावर खूप प्रेम आहे. श्री.

पूर्णचंद्र व ती अलिकडे ४/५ वर्षे मुंबईत होती. पण श्री. पूर्णचंद्रांना अचानक २००७ मध्ये देवाज्ञा झाली.

***

## श्री. सरला नार्वेकर

माझे लग्न झाले तेव्हा सरला फक्त आठ वर्षाची होती. तिचा जन्म १९३५ चा आहे. तिला माझी खूप सवय होती. ती माझ्याजवळच रोज झोपत असे. तिचे केस कुरळे होते. म्हणून आम्ही तिला शर्ली टेंपल म्हणत असू. चि. मंगलचा जन्म १९४४ चा व चि. रविचा १९४५ चा म्हणजे त्यावेळी ती ९/१० वर्षाची होती.त्यानंतर १९४५ मध्ये आमच्या ती. काकांना देवाज्ञा झाली. त्यानंतर माझे मुंबईला राहाणे होतच नसे. १९४८ मध्ये जानेवारी ३० मध्ये गांधी वधामुळे दंगली झाल्या म्हणून मला मुंबईला यावे लागले. नंतर मार्च ३० ला चि. रमेशचा जन्म झाला व नंतर त्यावर्षी मे अखेर आम्ही इस्लामपूरला गेलो. नव्या बंगल्याची वास्तुशांत जूनमध्ये झाली आणि तेथे राहावयास गेलो. त्यानंतर एकदम १९५३ मध्ये हे आजारी झाले तेव्हा परत मुंबईला गेलो व तेथून चास-कमानला पू. स्वामींच्याजवळ राहून इस्लामपूरला गेलो. त्यानंतर मला वाटते एकदम १९६१ मध्ये चि. सौ. मंगलच्या लग्नानिमित्त परत मुंबईस येणे झाले. सौ. मंगल व सौ. रविच्या लग्नाच्यावेळी सौ. आईची व सरलाची फार मदत झाली.

१९६५ मध्ये हे आजारी पडले. बहुतेक फेब्रुवारीमध्ये असावे. तेव्हापासून १५ जूनला ह्यांना देवाज्ञा झाली. तोपर्यंत ह्यांच्या दुखण्यात ती. अण्णासाहेब, ती.सौ.आई व चि.सरला यांनी इतके कष्ट सोसले की सांगता येत नाही. त्यावेळी चि. अरविंद एअरफोर्समध्ये होता व मला वाटते चंदीगडला होता व चि बाळ प्रथम मुंबईस होता तोवर त्याची व सौ. सुधाची मदत झाली पण नंतर त्याची कलकत्त्याला बदली झाली. त्यामुळे त्यांची मदत होऊ शकली नाही. चि. सरला रोज ऑफीसमधून थेट हॉस्पिटलमध्ये येत असे. न चुकता शहाळी वगैरे घेऊन येई व रात्री जवळजवळ ९ पर्यंत थांबत असे. तेव्हा तिचे लग्न झालेले नव्हते. हे म्हणत, 'सरला, आपली किती सेवा करते!' तिचे लग्न होईल तेव्हा आपण तिला काहीतरी छानशी भेट देऊ!

तिच्या लग्नांत ते नव्हते! पण तिची गाठ वरचेवर पडे व तिची इतकी मदत होई की मुलांनाही तिचा लळा लागला होता. अजूनही तिचे माझ्या जीवनात विशिष्ट स्थान आहे. तिने प. पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती यांचा अनुग्रह घेतलेला होता व ती त्यांच्याशी एकनिष्ठ होती. या कारणाने इतर श्री श्रीरामजी गिल्डा वगैरेंच्या बद्दलही तिला आत्मीयता होती हे ही कारण यामागे आहेच.

तिचा विवाह मला वाटते १९७० मध्ये झाला होता. चि. प्रणयचे लग्न झाले त्यानंतर श्री. रमाकांत तसे आजारीच होते. पण त्यांनी तिला एकदा विचारले की, तू इतकी वर्षे सेवा केलीस, तेव्हा तुला काय देऊ? तेव्हा तिने म्हटले की, 'माझी इच्छा आहे की तुम्ही माझ्याबरोबर एकदा परंडा येथे श्रीसद्‌गुरू स्वामींच्या दर्शनास यावे.' या आधी चि. प्रणय लहान असताना ती त्याला घेऊन परंडा येथे श्रींच्या समाधीच्या दर्शनास आली होती पण त्यावेळी श्री. रमाकांत आले नव्हते. तिने अशी विनंती केल्यावर त्यांनी मान्य केले व ती दोघे मुंबईहून 'सिद्धेश्वर' ने कुर्डूवाडीला आली. तेथे सौ. सुरेखा व चि. रमेशने त्यांना उतरवून घेतले व परंड्यास दर्शनासाठी नेले. तेथे दर्शन घेऊन ती सर्व मिरजेस आली व तेथे आमच्याकडे १/२ दिवस राहून परत मुंबईस गेली. याप्रमाणे तिची इच्छा पूर्ण झाली. १९८० पासून ती अखंड श्रीराम चरितमानसप्रेमी मंडळास आर्थिक सहाय्य करीत असते. कुठे उच्चारही न करता ती ही जी सेवा करी त्याबद्दल श्री. श्रीरामजी गिल्डांना तिचे फार कौतुक वाटे.

प. पू. स्वामी तेजोमयानंदजी यांच्याबद्दलही तिला प्रेमादर असून ती त्यांचे ज्ञानयज्ञाचा लाभ वरचेवर घेते. पवई, बडोदा, अंदमान निकोबार, चिन्मय विभूति वगैरे ठिकाणच्या निवासी शिबिराचा लाभ तिने घेतला आहे व ते पवईला येतात तेव्हा ती आवर्जून त्यांच्या दर्शनास जाते. तिची साधनाही चालू असते. पू. स्वामींनी तिला शिवमंत्र दिलेला आहे. माझ्यावर तर तिचे इतके प्रेम आहे की, ते शब्दात सांगता येणार नाही. 'सरला' म्हणजे नावाप्रमाणे 'सरला' आहे. 'सरल सुभाव न मनि कुटिलाई' अशी ती आहे.

***

## श्री हरेरामपंत बोडस

सौ. रेखा पटवर्धनचा अनुग्रह झाल्यावर तिच्या घरीच तिने गुरूबंधु भगिनींचे शिबिर भरविले होते. त्यावेळी सौ. कावेरीताई अन्नछत्रे व इतरही बरीच मंडळी आली होती. तेव्हा तिने दुपारी श्री. हरेरामपंत बोडस यांची प्रवचने ठेवली होती. ते फारच सुंदर प्रवचने करीत असत. तेव्हा 'येनकेन उपायेन मन: कृष्णं निवेशयेत' यावर बोलले. त्यावेळी त्यांचाही चांगला परिचय झाला. नंतर श्री. हेमराज उर्फ पापालालजी जारवोटिया यांची गाठ पडली असता त्यांनी श्री दत्तवाडकर महाराजांचे चरित्र वाचावयास दिले. त्यात असे लिहिले होते की, श्री. हरेरामपंत बोडस यांच्या वडिलांवर त्यांचा अनुग्रह होता त्यामुळे ते ज्ञानसंपन्न झाले होते. ते निरनिराळ्या संतांना भेटायला जात तेव्हा आपल्या मुलांना बरोबर नेत असत, की त्यांच्यावरही योग्य संस्कार व्हावे.

पुढे असे झाले की, सर्वत्र प्लेगची साथ आली असता श्री. हरेराम पंत यांचे दोन बंधु प्लेगने अत्यवस्थ झाले तेव्हा त्यांचे वडील त्या आपल्या दोन्ही चिरंजीवांना म्हणाले की, मृत्यु तर अटळ असतो. तर आता अंत:काळी भगवन्नाम घ्या, तुम्हाला निरनिराळ्या संतांकडे कशासाठी नेत होतो? हे ऐकून त्या दोन्ही मुलांनी भगवत् स्मरणपूर्वक देहत्याग केला. श्री. हरेरामपंतांच्या वडिलांनी आपल्या श्रीसद्‌गुरूंना पत्राने ही हकीगत कळविली तेव्हा त्यांना इतका आनंद झाला की सर्वांना ते पत्र दाखवून ते म्हणू लागले की, 'पाहिलंत, पोरे परीक्षेत पास झाली!' असा असतो सत्संगाचा महिमा!

हे सर्व मी वाचले होते आणि मी खरोखर भारावून गेले होते. पुढे आम्ही श्री.नागेश गोविंद हेर्लेकर शास्त्री यांचा श्रीमत् भागवत सप्ताह मंडळातर्फे मिरजेत 'आदर्श मंगल कार्यालया' त करण्याचे ठरविले. तेव्हा श्रीमत् भागवत सप्ताहापूर्वी दीप प्रज्वलन श्री. हरेरामपंत बोडस यांच्या हस्ते व्हावे म्हणून त्यांना आमंत्रण देण्यास त्यांच्या घरी गेलो होतो. तेव्हा मी वरील घटनेचा उल्लेख करून त्या घटनेने मी प्रभावीत झाल्याचे सांगितले. तेव्हा त्यांना आश्चर्य वाटले व आनंदही झाला व एक प्रकारची आत्मीयताही उत्पन्न झाली. त्यामुळे आम्ही निघालो होतो तेव्हा ते दाराच्या बाहेरपर्यंत पोहोचविण्यास आले होते व समारंभासही उपस्थित राहिले. पुढे माझा

प्रबंध मी त्यांना भेट दिला तेव्हा तो त्यांना आवडल्याचे व त्यांनी त्यांचे चिरंजीव श्री. विश्वेश यांना तो मुद्दाम वाचावयास सांगितला आहे असेही ते म्हणाले.

***

## श्री. हेमराज उर्फ श्री. पापालालजी जाखोटिया

श्री. मंगलाताई हिच्याबरोबर मी प्रथम माधवनगर येथे श्री. जाखोटिया यांच्या कार्यालयांत पू. हरेकृष्ण शंकरशास्त्री म्हणून श्रीमत् भागवत कथाकार आले होते त्यांची भागवत कथा ऐकावयास गेले होते. सकाळी व दुपारी दोनदा कथा होती. दुपारी कार्यालयांतच गच्चीत मांडव घालता होता. तेथे प्रसादाची व्यवस्था केलेली होती. त्यांनी प्रेमाने व आदराने स्वागत केले. ते चि. भय्यासाहेब अभ्यंकरांना (माझ्या जावयांनाही) चांगले ओळखत होते. कथा खूपच रंगली होती आणि नेहमीप्रमाणे माझा गोंधळही झालाच. पण संकीर्तनाचा आनंदच असा असतो की देहभानच हरपून जाते. तर काय करणार? नंतर मी दुसऱ्या दिवशी मुंबईला निघून गेले. पण मला असे कळले होते की, श्री. जाखोटिया दरवर्षी स्वर्गाश्रम येथे प. पूज्य स्वामी रामसुखदासजी महाराजांच्या सत्संगासाठी जातात तेव्हा मी ठरवले की, श्रीरामचरितमानसप्रेमी मंडळाच्या द्वारा 'मानस गूढार्थ चंद्रिका' हिंदीचे जे जे खंड प्रकाशित होतील ते त्यांच्या द्वारा प. पू. रामसुखदासजी महाराजांच्या चरणी भेट म्हणून धाडायचे. प्रथम किष्किंधाकाण्ड, नंतर सुंदर काण्ड व नंतर अरण्यकांड प्रकाशित झाले होते. ती जसजशी प्रकाशित झाली तसतशी श्री. जाखोटियांबरोबर धाडली गेली होती. नंतर बालकाण्ड खंड १ ला प्रकाशित झाला.

सन १९८६ मध्ये राठीभवन, काळबादेवी येथे प. पू. रामसुखदासजी महाराजांचे प्रथम दर्शन होऊन कृपा लाभली होती. म्हणून अगदी प्रथम किष्किंधाकाण्डा बरोबर मी प. पू. रामसुखदासजींना पत्रही धाडले होते व त्यास माझा परिचय दिला होता. ते त्यांना बहुतेक पू. डुंगरदासजींनीच वाचून दाखवले असावे. पूज्य रामसुखदासजी महाराज म्हणायचे की, 'वह रामजी को भाई मानती है वह ना?' त्यामुळे ते मला बरोबर ओळखत

असत. अशी काही वर्षे गेली होती आणि मग माधवनगर येथील राधाकृष्ण गीता मंदिराच्या प्राणप्रतिष्ठापन उत्सवात एक दिवस प.पू. रामसुखदासजी महाराज आले होते. तेव्हा जाखोटियांच्या कार्यालयात पूज्य श्रद्धेय स्वामी रामसुखदासजी महाराज आले होते तेव्हा त्यांचे दर्शन घडले होते. तेव्हा श्री. जाखोटिया यांनी पूज्य डुंगरदासजींशी माझा ओझरता परिचय करून दिला होता की मीच 'मानस गूढार्थ चंद्रिकां' चे हिंदी खंड पू. स्वामीजींना भेट म्हणून धाडत असते.

नंतर श्री. जाखोटियांना काय प्रेरणा झाली माहित नाही पण त्यांनी मुद्दाम मला फोन केला की श्री. श्रीरामजी गिल्डा व मी जर समक्ष जाऊन परम श्रद्धेय स्वामी रामसुखदासजींना प. पू. स्वामी प्रज्ञानानंद व मानस गूढार्थ चंद्रिके संबंधी निवेदन करून गीताप्रेस द्वारा हिंदी टीका छापली गेली तर फार उत्तम होईल. अशाप्रकारे विनंती करून पाहावी. तेव्ही मी पूज्य भाऊंना फोनवरून त्यांचे हे मत निवेदन केले व आपण प्रयत्न तर करून पाहू या असे म्हटले. तेव्हा त्यांनाही हे म्हणणे पटले व 'मानस गूढार्थ चंद्रिका टीके' चा थोडा नमूना घेऊन ते श्री.ग.स.नाईक यांना घेऊन प.पू.स्वामी रामसुखदासजी यांचा ज्ञानयज्ञ जेथे चालू होता तेथे त्यांच्या दर्शनासाठी गेले. तेथे 'गीताप्रेस' चे काही विश्वस्तांचीही भेट झाली. त्यावेळी श्री. श्रीरामजींना वाटले की, काम होणे कठीण दिसते. पण श्रीरामभैय्यांच्या कृपेने परम श्रद्धेय स्वामी रामसुखदासजींची भेट झाली आणि त्यांनी पू. डुंगरदासजींना त्या टीकेबद्दल त्यांचे मत विचारले. पू. डुंगरदासजी म्हणाले की, 'टीका (मानस गूढार्थ चंद्रिका हिंदी) भाष्य बिल्कुल यथार्थ है' हे ऐकून परम श्रद्धेय स्वामी रामसुखदासजी प्रसन्न झाले आणि त्यांनी मला वाटते श्री विष्णुप्रसादजी चाँदगोठियाजी यांना बोलावून घेतले आणि ही टीका प्रकाशित व्हावी अशी इच्छा व्यक्त केली आणि रामभैय्याच्या कृपेने आमची इच्छा सफल झाली. गीताप्रेसची मान्यता मिळाली. याचे बरेच श्रेय श्री.जाखोटियांना जाते यात शंका नाही. भगवान् कुणाला ना कुणाला निमित्त बनवतात पण सच्चरित्र, पुण्यवान् असतील त्यांनाच ते चांगल्या गोष्टीसाठी निमित्त बनवतात हे तर खरेच.

अद्यापही त्यांच्याशी उत्तम संबंध आहेत. ते सिद्ध आहेत की नाही हे

तर रामभैय्याच जाणतात. पण उत्तम साधक असून त्यांचा सहवास हा सत्संगच असतो यात जराही संशय नाही. सातत्याने, निष्ठेने साधन करतात आणि गीतेचा व गीताप्रेसच्या सत्साहित्याचा प्रचार आणि प्रसार करण्यासाठी निरंतर झटत असतात. त्यांच्यामुळे दासबोध गद्य-रूपांतर करण्याचे भाग्य मला लाभले. अद्यापही ते दरवर्षी स्वर्गाश्रम येथे महिनाभर सत्संगासाठी जाऊन राहतात. त्यांचे भगवान् श्रीकृष्णावर व परमश्रद्धेय रामसुखदासजी महाराजांवरील अनन्य प्रेम कौतुकास्पद असून त्यांच्या नरदेहाचे नक्कीच सार्थक झाले आहे असे मी भगवत् गीतेतील भगवान् श्रीकृष्णांच्या वचनावर विश्वासून खात्रीपूर्वक म्हणू शकते.

***

### श्री. मीराताई गोगटे (१९ मार्च २०१२)

इतर कुणावर लिहिण्यापूर्वी आज चि. मीराताईवर लिहावे लागत आहे. कारण आजच पहांटे तिला झोपेतच देवाज्ञा झाली आणि ती श्रीसद्गुरूचरणी म्हणजेच ब्रह्मलीन पू. स्वरूपानंद स्वामींच्या चरणी लीन झाली आहे. ती नात्याने माझी भाचेसून लागत असली तरी तिच्याशी माझे अंतरिक नाते जुळले होते. त्याला काय नाव द्यावे हे कळत नाही. तिला मात्र मी तिची सासू असल्याचा अभिमान वाटत असे आणि ती तसे वारंवार बोलूनही दाखवित असे. माझा भाचा चि. राम गोगटे याचा अपघाताने मृत्यु झाला. तेव्हा चि. आमोद खूप लहान होता. चि. अनिलही शिकत होता. पण तिने खचून न जातां 'गोगटे अँड सन्स' हे चष्म्याचे दुकान लक्ष्मीरोडवर पुणे येथे होते ते अनेक वर्षे श्री. आगाशे (जुने व्यवस्थापक) ह्यांच्या मदतीने उत्तम प्रकारे सांभाळले आणि कुटुंबाचा भार इतरांवर पडू दिला नाही.

सुप्रसिद्ध भगवद्भक्त श्री. भाऊराव आठवले यांची मीरा कन्या होती. त्यामुळे भगवत् भक्तीचे संस्कार तिच्यावर झाले होते. मीराची एक बहीण पावसचे श्री. वसंतराव देसाई यांना दिलेली होती. ते पुण्यात राहात होते. पण पावसचे श्री. देसाई कुटुब प.पू. स्वामी स्वरूपानंदांच्या चरणी समर्पित होते. त्यामुळे मीरालाही पू. स्वरूपानंदजींचा अनुग्रह प्राप्त झाला होता. ती नित्य सोऽहं साधनाही करीत असे. चि. रामच्या दुकानाचे ऑडिट श्री.

गोडबोले यांच्याकडे होते व चि. सौ. पद्मावन्स व श्री. गोडबोले यांचा विवाह चि. रामच्या द्वाराच जमला होता. त्यामुळे त्यांचे येणेजाणे सारखेच होते. सौ. पद्मावन्स उर्फ सौ. उमाताई गोडबोले यांचा प.पू. स्वामी पुरूषोत्तमानंदजी, चिन्मय मिशन यांच्याशी चांगला परिचय होता व मला वाटते त्या चिन्मय मिशनच्या मराठी भाषांतर समितीमध्येही प्रूफे तपासणे वगैरे सेवा करीत असत. चि. रामला देवाज्ञा झाल्यावर सौ. पद्मावन्सच्यामुळे चि. मीराही चिन्मय मिशनकडे आकर्षित झाली व चिन्मय मिशनच्या कार्यात रस घेऊ लागली. ती व सौ. पद्मावन्स उत्तरकाशी व सिद्धबारी येथे मला वाटते परमपूज्य स्वामी चिन्मयानंदजी व प.पू. स्वामी पुरूषोत्तमानंदाच्या ज्ञानयज्ञासाठीही गेल्या होत्या.

तिचा पावसशी संबंब असल्याने तेथील संस्थेचे विश्वस्त व पुणे चिन्मय मिशनच्या सहकार्याने तिने पावसला प.पू. स्वामी पुरूषोत्तमानंदांची व प.पू. स्वामी तेजोमयानंदजींचीही निवासी शिबिरे–ज्ञानयज्ञ आयोजित केले होते. त्यामुळे साधकांना लाभ तर झालाच शिवाय दोन्ही संस्थांनाही आर्थिक लाभ झाला.

एकदा मी मीराकडे गेले होते तेव्हा तिच्याबरोबर तिच्या माहेरी गेले होते. त्यावेळी तिचे वडील ती. भाऊराव आठवले जरा आजारीच होते सौ. आईही तेथे होती. त्यावेळी मी 'एकनाथी भागवता' वर Ph.D. करीत आहे हे त्यांना कळले तेव्हा त्यांना फार आनंद झाला व त्यांना आलेला नाथांच्या कृपेचा अनुभव त्यांनी मला सांगितला. ते एका वर्षी नाथषष्ठीच्या उत्सवासाठी आपल्या कांही मित्रमंडळीबरोबर आदले दिवशी पैठणला गेले होते; आणि अचानक रात्री एकदम थंडी वाजून त्यांना खूप ताप भरला. तापाने फणफणल्याने त्यांना एकदम थकवाही आला. अशा परिस्थितीत दुसऱ्या दिवशी पहाटे असे झाले की नाथांचे जे गोदातटी मंदिर आहे तेथील पुजारी श्री. भाऊराव आठवल्यांचा शोध घेत घेत तेथे येऊन पोहोचले होते. श्री. भाऊराव आठवले येथेच उतरले आहेत हे कळल्यावर त्यांना आनंद झाला आणि त्यांनी त्यांना दृष्टान्त होऊन संगमावरील देवळातील पूजा श्री. भाऊराव आठवले यांच्या हस्ते व्हावी असा आदेश झाल्याचे सांगितले. हे ऐकून सर्वांनाच आश्चर्य वाटले. श्री. भाऊरावांना तर काय वाटले असेल

हे सांगणे कठीणच आहे. ताप अंगात असतांनाही ते तसेच उठले आणि स्नान करून गोदाकाठीच्या मंदिरातील पादुकांची मोठ्या भक्तिभावाने प्रेमाने पूजा केली. त्यांना धन्य धन्य वाटले. भगवंताचे भक्तवात्सल्य पाहून त्यांच्या डोळ्यांत अश्रु आले. हे सर्व सांगतांनाही त्याचे अंत:करण भरून येत होते. मला हा अनुभव त्यांनी सांगितला ही माझ्यावर फार मोठी भगवत्कृपाच झाली. यानंतर परत ती. भाऊरावांच्या दर्शनाचा योग आला नाही.

सहज प्रसंगावरून मलाही जो श्री एकनाथ महाराजांच्या कृपेचा अनुभव पुढे आला तो येथे निवेदन करते. १९७१ मध्ये एम.ए. पदवी प्राप्त झाल्यावर प्रा.कृ.ब. निकुंब यांच्या मार्गदर्शनाखाली Ph.D.साठी नाथभागवताच्या अभ्यासास सुरुवात केली होती व सन १९८६ मध्ये S.N.D.T. विद्यापीठ, मुंबई येथे प्रबंध सादर केला गेला. यामुळे ' एकनाथी भागवता' चा अभ्यास जवळजवळ १५ वर्षे घडला.

श्रीसद्गुरुकृपेमुळे अभ्यास करतांना पुन: प्रत्ययाचा आनंद तर मिळालाच. शिवाय अगदी निर्विकल्प समाधि जरी लाभली तरी सर्वांभूती भगवद् भाव जोपर्यंत दृढ होत नाही तोपर्यंत सर्व व्यर्थ होय ही गोष्टही अंत:करणात ठसली होती आणि मुख्य म्हणजे पैठणला जाऊन नाथांचे दर्शन घ्यावे अशीही तीव्र इच्छा उत्पन्न झाली होती.

एका वर्षी परंड्यास श्रींच्या पुण्यतिथी उत्सवास गेले असतां ठरवले की परत लगेच घरी न जातां गुरुबंधु श्री. बळीराम पाटील, देशमुख जे पैठणचे रहिवासी होते त्यांच्याबरोबर पैठणला जाऊन श्रीनाथांचे दर्शन घेऊन मगच घरी जावे. फाल्गुन वद्य षष्ठिला पैठणचा उत्सव झाला होता व लगेच फाल्गुन वद्य दशमीला श्रींच्या पुण्यतिथीचा उत्सव झाला. श्री.. श्रीरामजी गिल्डा, श्री. बळीराम, सौ. स्नेहलता कुलकर्णी व मी अशी सकाळी परंड्याहून सात वाजताच्या गाडीने अहमदनगरला जाण्यास निघालो. साधारण ११.०० च्या सुमारास नगरला पोहोचलो. तेथे सौ. लताच्या घरी जाऊन जेवण करून जरा विश्रांती घेऊन श्री. श्रीरामजी, श्री. बळीराम पाटील व मी दुपारी चारच्या एस्.टी. ने नगरहून पैठणला गेलो व श्री. बळीरामच्या घरी उतरलो.

संध्याकाळी आम्ही तिघे श्री एकनाथ महाराजांच्या वाड्याकडे निघालो.

तेथे दारावरच श्रीदत्तप्रभूंचे दर्शन झाले. नाथांच्या वाड्यात पाऊल टाकतांना अनेक वर्षांची इच्छा पूर्ण झाल्याने अंत:करण भरून आले. आत मोठे सभागृह हाते व समोर देवघर होते. काही अंतरावर डाव्या बाजूस खोली होती त्या खोलीत गेलो. तेथे बहुतेक पू. नाथांच्या वंशजांपैकी कुणी राहात होते. श्री. बळीराम पाटीलांची ओळख होतीच. त्यांनी आमची ओळख करून दिली व मी 'एकनाथी भागवता' वर प्रबंध लिहिल्याचे सांगितले. नंतर जरा वेळ गप्पागोष्टी झाल्यावर मी त्यांना मला पूज्य एकनाथ महाराजांचे हस्ताक्षर पाहावयास मिळेल कां म्हणून विचारले. प्रथम ते पटकन हो म्हणाले नाहीत. पण नंतर त्यांना काय प्रेरणा झाली ते रामभैय्याच जाणोत त्यांनी तेथील तिजोऱ्या उघडून मला म्हणजे आम्हां सर्वांना त्यांच्या हस्ताक्षरांतील पोथ्या दाखवल्या. त्यामुळे फार आनंद झाला. नंतर आम्ही विचारले की, आम्हांला नाथ पूजा करीत असत ती विठ्ठल मूर्ती पहावयास मिळेल कां? तेव्हा ते म्हणाले की, ती मूर्ती आम्ही दर एकादशीस खाली काढून तिला अभिषेक करून ती देव्हाऱ्यात स्थापन करतो. नंतर पंधरा दिवस ती तेथून हलवत नाही. पण तुमचे भाग्य चांगले आहे, कारण आज स्मार्त एकादशी असून उद्या भागवत एकादशी असल्याने उद्या सकाळी ९.०० वाजतां आलात तर ती मूर्ती तुम्हांला जवळून पहाता येईल. 'आम्ही दुसरे दिवशी येतो' असे सांगून आम्ही तेथून बाहेर पडलो व गांवातून चालत नदीकाठच्या मंदिरात जाऊन दर्शन घेऊन परत घरी गेलो. नाथांच्या वाड्यांत श्रीखंड्या पाणी भरीत असे तो मोठा रांजण, तो जिच्यावर गंध उगाळीत असे ती सहाण, तो रोज ज्या खांबाला टेकून बसून नाथांचे कीर्तन ऐके तो खांब वगैरे सर्वांचे दर्शन झाले.

दुसऱ्या दिवशी सकाळी पावणे नऊ ला आम्ही परत नाथांच्या वाड्यात जाऊन त्यांच्या देवघरात गेलो. तेथे अभिषेकाची सर्व तयारी झालेली होती व एकनाथांची विठ्ठल मूर्तीही ताम्हनांत ठेवलेली होती. मी आमचे गोत्र, नांव वगैरे सांगून आमच्या वतीने अभिषेक करा अशी विनंती केली. ती त्यांनी मान्य केली. नाथांची विठ्ठलमूर्ती आमच्या अगदी जवळच ठेवली होती. ती फिरवून त्यांनी आम्हांला दाखवली. तेव्हा मागील बाजूस 'दास जेऊ घाल वा न' अशी अक्षर दिसून आली. नंतर अभिषेक करण्यात आला

आणि नंतर मी आणलेली राखी त्या विठ्ठलाच्या हातावर बांधण्यात आली. रामभैय्यानेच नाथांच्या विठ्ठलाच्या रूपाने माझी राखी स्वीकारली होती! कृपा तरी किती करावी? गोस्वामी तुलसीदास म्हणतात की, 'जासु कृपा नही कृपा अघाती' याचा अनुभव आला! नंतर आम्ही पैठणहून लगेच निघालो!

आता परत मीराताईकडे वळू या. तिचे गर्भाशय काढून टाकण्यासाठीचे ऑपरेशन बेळगांवला डॉ. श्रीकांतच्या हॉस्पिटलमध्ये झाले होते. त्यावेळी तिचा बेळगांवला बराच मुक्काम झाला होता. तेव्हांही पहांटे नित्यनियमाने तिची सोऽहं साधना, उपासना चालत असे, असे मला डॉ. सौ. नलिनीकडून कळले होते. तिची गुरूनिष्ठा अलौकिक होती. ती दरवर्षी पावसाळा संपल्यावर २/४ महिने तरी पावसला जाऊन राहात असे. तिथे ती बुकस्टॉलवर बसूनही सेवा करी. शिवाय ध्यान, जप, मानसपूजा व श्रवण, मनन सुरुच असे. मी प.पू. स्वामी तेजोमयानंदांच्या ज्ञानयज्ञासाठी दोनदा पावसला गेले होते. शिवाय बेळगांव व पुणे येथे त्यांचे ज्ञानयज्ञ झाले तेव्हाही मला तिचा सहवास लाभला होता. (२०१० मध्ये) दोन वर्षापूर्वी मी तिच्याकडे राहावयास गेले होते. तेव्हा तिने बोलण्याच्या ओघात मला सहज सांगितले की, रामला देवाज्ञा झाल्यावर तिचे वडील पू. भाऊराव आठवले मुद्दाम तिला पावसला प.पू. स्वामी स्वरूपानंदांच्या दर्शनासाठी घेऊन गेले होते. तेव्हा पू. स्वामींनी तिची नाना प्रकारे समजूत घालून आपला अंगरखा तिला देऊन म्हटले की, 'तुला जेव्हा केव्हा एकटे वाटेल, अस्वस्थ वाटेल तेव्हा हा अंगरखा तू हृदयाशी धर म्हणजे तुला शांती समाधान लाभेल'. तिने मला तिजोरीतून तो अंगरखा काढून दाखवला होता. तेव्हा मला खरेच तिच्याबद्दल इतके प्रेम, इतके कौतुक वाटले की सांगता येत नाही! तिला देवाज्ञा झाल्यावर तिच्या देहावर तो अंगरखा ठेवून पू. स्वामी स्वरूपानंदांनी दिलेली शाल तिला पांघरविण्यात आली. ती श्रीसद्गुरूचरणी लीन झाली आहे यात जराही संशय नाही! अत्यंत शांतपणे देहत्याग घडणे हे भाग्यानेच घडते!

एकदा ती माझ्याबरोबर 'धर्मश्री' वर प.पू. आचार्य किशोरजी व्यास यांच्या दर्शनास आली होती. मी पू. आचार्यांशी तिची ओळख करून दिली की ही माझी भाचेसून असून कै. श्री. भाऊराव आठवले यांची कन्या आहे.

तेव्हा पू. आचार्य किशारजींना फार आनंद झाला. ते म्हणाले, 'मी पूर्वी युवावस्थेत पुण्याला आलो की मुद्दाम सत्संगासाठी श्री. भाऊराव आठवले यांच्या घरी जात असे.' मग त्यांनी विचारले की, तो वाडा, तो हॉल अजून तसाच आहे कां? असेल तर मला परत त्या ठिकाणास भेट देण्याची इच्छा आहे. मीराताईने सांगितले की, 'हो! अजून ते सर्व तसेच आहे. आपण जरूर यावे. मी माझ्या भावाला सांगेन' नंतर जेव्हा पू. आचार्यांनी त्या ठिकाणास भेट देण्याची इच्छा दर्शविली तेव्हा मीराताई म्हणाली की, तिकडे जाण्यापूर्वी आमच्या घराला आपले पाय लागावे अशी माझी इच्छा आहे. तेव्हा पू. आचार्य किशोरजींनी ते मान्य केले व प्रथम मीराताईच्या घरी जाऊन मग ते कै.ती. भाऊराव आठवले यांच्या वास्तूत गेले. नंतर मीराताईने पावसलाही त्यांचा एक श्रीमत् भागवत सप्ताह घडवून आणला. अशी होती आमची मीराताई, म्हटले तर सामान्य पण वास्तविक असामान्य!

***

**श्री कोळेकर महाराज**

हे वै. मामासाहेब दांडेकरांचे शिष्य होते व श्रेष्ठ गुरूभक्त, भगवद् भक्त असून अत्यंत अबोल, सदाचरणी व विनम्र होते. ते पहिल्यापासूनच श्रींच्या पुण्यतिथी उत्सवात येऊन प्रवचने करीत. ज्ञानेश्वरी जवळ जवळ मुखोद्गत होती. त्यांच्याबद्दल आम्हा सर्वांना प्रेमादर वाटे. 'रामविश्रामधाम' चे भूमिपूजन झाले ते डॉ. तात्या व सौ. शशी जोशी यांच्या हस्ते. श्री हेर्लेकर शास्त्रींच्या पौरोहित्याखाली झाले. तेव्हा संतांचे पूजनही व्हावे अशी माझी इच्छा होती. म्हणूनच श्री. कोळेकरांची पूजा करून त्यांना शाल व श्रीफळ देऊन सत्कार करण्यात आला. त्यांच्या दुखण्यात डॉ. बबनराव यादव यांनी सेवा केली होती. ते दरवर्षी सांगलीला पू. गुरूनाथ महाराज कोटणीस यांच्याकडील उत्सवात येऊन प्रवचन सेवा करीत असत. म्हणून एकावर्षी त्यांना तेथे भेटून आम्ही त्यांना श्री. मंगलाताई ओकच्या घरी घेऊन गेलो होतो. त्यांना व आम्हालाही फार आनंद झाला होता. त्यांच्या स्मृतिस विनम्र अभिवादन!

***

## श्री. सातवळेकर, पुणे

श्री गुरूदेव रानडे यांच्यावर 'कल्याणी' हा विशेषांक निघाला तेव्हापासून ओंकार ट्रस्ट, पुणे चे संस्थापक श्री. भा. वा. सातवळेकर यांची ओळख झाली. नंतर 'प्रज्ञानानंद सरस्वती' यांच्यावर २००३ मध्ये विशेषांक निघाला तेव्हा परंडा येथेही श्रीराम मंदिरात ते येऊन गेले होते. त्यानंतर 'कल्याणी' चे जे जे विशेषांक निघाले, त्या सर्वांतून सौ. रेखा पटवर्धन, सौ. मनिषा अभ्यंकर, श्री. शामराव साखरे यांचे व माझे लेख आले आहेत. याविषयीही ते आमच्या मंडळास नेहेमी सहाय्य करीत असतात. काही निमित्ताने त्यांच्या घरीही माझे दोनदा जाणे झाले आहे. शिवाय फोनवरूनही सतत संपर्क चालू असतो. त्यामुळे आत्मीयता वाढली आहे. ओंकार ट्रस्टच्या रजनीताई काळेही येऊन भेटून गेल्या हे विशेष.

***

## श्री. विश्वास रघुनाथ भिडे

श्री. भिडे यांची ओळख गेल्या ४/५ वर्षांतील आहे. पण आत्मीयता इतकी उत्पन्न झाली आहे की यावरून कित्येक जन्मांचा ऋणानुबंध असावा असे खात्रीपूर्वक वाटते. मी 'वाल्मिकी रामायणा' चा मराठी अनुवाद केला आहे हे कळले म्हणून ते मुद्दाम मला येऊन भेटले व तो अनुवाद इंटरनेटवर टाकण्याची इच्छा त्यांनी व्यक्त केली. गीता प्रेसच्या स्वाधीन मी सर्व वह्या केल्या होत्या. त्यामुळे माझ्या जवळ काहीच शिल्लक नव्हते. शिवाय गीता प्रेसने तो अनुवाद प्रकाशित करण्याचा विचार सोडून दिला होता. म्हणून मी गीता प्रेस कडून सर्व वह्या परत मागून घेतल्या. इतर वह्या मिळाल्या पण 'सुंदरकांडा' च्या वह्या न मिळता त्याची सी. डी. धाडण्यात आली व त्यावरून श्री. भिडे यांनी प्रिंट आऊट काढल्यावर त्यांत खूप चूका अढळून आल्या. ते जवळ जवळ परत लिहून काढावे लागले. नंतर श्री. भिडे यांनी श्री. संजय प्रधान यांच्या मदतीने संपूर्ण श्री. वाल्मिकी रामायणाचा मराठी अनुवाद 'सत्संगधारा' या त्यांच्या वेबसाईटवरून इंटरनेटवर टाकला. तो लोकांना आवडला असावा असे वाटते. याशिवाय त्यांनी माझा एकनाथी भागवतावरील प्रबंध, श्रीदासबोधाचे गद्य रूपांतर

वगैरे ग्रंथही इंटरनेटवर टाकले. याशिवाय डॉ. कल्याण काळे यांच्याजवळील श्री. हंसराज स्वामींचे प्रकाशित ग्रंथ, ओंकार ट्रस्ट द्वारे संत चरित्रावर प्रकाशित झालेले १८/ १९ विशेषांक, तसेच माझ्या मामंजींचे सर्व ग्रंथ (षड्चक्रदर्शन भेदन, प्रणवोपासना व साधुसंतांचा देवयान पंथ) वगैरे बरेच काही त्यांनी इंटरनेटवर टाकले आहे. मराठीतील दुर्मिळ ग्रंथ इंटरनेटवर टाकण्याच्या कार्यास त्यांनी स्वतःस वाहून घेतले आहे. अशा ग्रंथांची संख्या शंभराच्या आसपास असावी असा अंदाज आहे. त्यांच्या कार्याचे कौतुक करावे तेवढे थोडेच आहे. त्यांनी श्री. ब्रह्मचैतन्य महाराज गोंदवलेकर यांचा अनुग्रह घेतलेला आहे व त्यांचे सर्व उपलब्ध वाङ्मय इंटरनेटवर टाकलेले आहे. त्यास लोकांचा प्रचंड प्रतिसाद मिळत आहे. रामभैय्या कुणाकडून काय कार्य करून घेतात याचा अंदाजच येत नाही. श्री. भिडे यांना एकदा मुद्दाम परंड्यास श्रींचे दर्शनास नेले होते व तेथे मंडळातर्फे त्यांचा सत्कार केला होता. त्यांचे प्रचंड कार्य पाहून नतमस्तक व्हावयास होते. रामभैय्याच्या कृपेनेच त्यांची ओळख झाली. त्यांनी 'वाल्मिकी रामायण' इंटरनेटवर टाकल्याने श्री. समर्थ रामदास स्वामींची सेवा घडण्याचा सुयोग प्राप्त झाला. त्यांनी 'मानस प्रेमी मंडळ' ही वेबसाईट काढून देऊन 'श्रीरामचरितमानस मराठी अनुवाद आणि संपूर्ण श्रीमानस गूढार्थ चंद्रिका' इंटरनेटवर टाकण्याचे फार मोठे कार्य केले आहे. त्यांच्या हातून अशीच संत सेवा घडत राहो हीच प्रार्थना!

***

## श्री. दिलीप आपटे

गीता फाऊंडेशन, मिरजचे श्री. दिलीप आपटे यांनी गीता व भागवताचा तरूण पिढीत प्रचार प्रसार व्हावा हे ध्येय समोर ठेवले आहे. त्यासाठी ते सतत चंदनासारखे झिजत असतात. पाय कमकुवत असूनही ते जे जिवापाड परिश्रम करतात ते तरूणांनाही लाजविणारे असतात. गरीब होतकरू विद्यार्थ्यांना आर्थिक सहाय्य करून अनेकांना त्यांनी स्वतःच्या पायावर उभे केले आहे. प्रथम ते 'धर्मयज्ञ' हे मासिक चालवत होते. आता 'प्राजक्त' या साप्ताहिकाच्या माध्यमातून 'धर्मयज्ञ' मासिक प्रकाशित होते

व ते १६०० ते १७०० वाचकांपर्यंत पोहोचते. या अंकाला वर्गणी नाही हे विशेष. शिवाय कोणाच्याही फायद्यासाठी ते चालविले जात नाही. आपल्या संस्कृतीचा, दिव्य परंपरेचा प्रचार–प्रसार व्हावा हाच उद्देश आहे. वेदांमधील काही महत्त्वाच्या सूक्तांची ओळख करून देणे, उपनिषदाचा अभ्यास, गीता, विष्णू सहस्त्रनाम, भागवत यावर विवेचन असे या अंकाचे स्वरूप असते. प्रत्येक पानासाठी प्रायोजक मिळतात. सर्व कार्य लोकांच्या दातृत्वावर चालते आहे आणि कारभार अत्यंत पारदर्शक असल्याने भगवत् कृपेने काहीही कमी पडत नाही. जपानी भाषेचे शिक्षण मुलांना घेता यावे असा प्रयत्न श्री. आपटे यांनी केला होता. शिवाय जे विद्यार्थी गीतेचे अध्याय पाठ करतात त्यांना शृंगेरीस नेऊन तेथील पू. शंकराचार्यांच्या वतीने ज्या परीक्षा घेतल्या जातात त्यास त्यांनी बसावे यासाठी प्रयत्न केले जातात. शिवाय त्यांनी 'भोसे' गाव दत्तक घेऊन त्याचा सर्वांगीण विकास व्हावा म्हणूनही प्रयत्न चालविले आहेत. त्यांचे आणखीही उपक्रम चालू आहेत. 'हळू हळू' या वेबसाईटवर महाभारत, दासबोध, गीता उपलब्ध आहेत. 'श्रीकृष्णः शरणं मम' हे ज्यांच्या जीवनाचे ब्रीदवाक्य आहे त्यांच्या विषयी कितीही लिहीले तरी थोडेच पडणार आहे. त्यांच्या चरणी विनम्र अभिवादन!

***

## डॉ. के. वा. आपटे

सौ. रेखा पटवर्धन, सौ. अंजली पर्वते, सौ. विद्या गद्रे, प्रतिमा गद्रे, सौ. मनिषा अभ्यंकर सर्वजणी मला वाटते डॉ. के. वा. आपटे यांच्या विद्यार्थीनी (शिष्या) आहेत. प्रिय अंजली पर्वतेमुळे डॉक्टरांची ओळख झाली असावी असे वाटते. ते खरोखरच प्रकांड पंडित आहेत. आम्ही मेडिकल कॉलेज मिरज येथील कर्मचारी निवासात रहात असताना ते पत्नीसह आमच्या घरी आले होते. तेव्हा मला फार आश्चर्य वाटले होते. तेव्हा ते म्हणाले होते की त्यांच्या पत्नीची फार इच्छा होती मला भेटण्याची म्हणून मुद्दाम ते सौ. वहिनींना घेऊन आले होते. त्यांच्या भेटीने खरेच खूप आनंद झाला. परत आम्ही भेटू शकलो नाही परंतु, त्यांचे नवीन ग्रंथ ते पोस्टाने मला भेट म्हणून धाडतात ही फार भाग्याची गोष्ट आहे.

***

## डॉ. गो. रा. कुलकर्णी व डॉ. सौ. अवंतिका कुलकर्णी

मला वाटते ते सिटी हायस्कूलच्या समोर रहातात. त्यांची ओळख कशी झाली हे आता आठवत नाही. मला वाटते ते हिंदीचे तज्ज्ञ आहेत म्हणून मी त्यांना भेटले होते व प्रस्तावना खंडाचे हिंदीमध्ये भाषांतर करण्यात त्यांची मदत मिळाली तर बरे असे वाटले होते. पण मला पाठीच्या कण्याच्या दुखण्याने गाठले आणि रामभैय्याच्या कृपेने कुणाचीही मदत न घेता जसे जमेल तसे भाषांतर केले गेले आणि गीता प्रेसने ते गोड मानून घेतले! आहे ना केवढी कृपा!

***

## श्री. माधव पर्वते

श्री. माधव पर्वते हा मंगलाताई ओकचा मामेभाऊ आहे. मंगला उर्फ शांता गोखले हीची आई ती सहा महिन्यांची असतानाच गेली होती त्यामुळे तिच्या आजीने (पर्वते) तिला वाढविले. त्यामुळे तिची मामे भावंडे तिला माई म्हणतात. तिची म्हणजे अर्थात यांचीही आजी समर्थ भक्त व पू. चौंडे महाराजांची भक्त होती. त्यामुळे पू. अनंतदास महाराज त्यांच्याकडे येत असत. प्रिय मंगला, चि. माधव सर्वांना ते चांगलेच आठवतात. श्री. पर्वते मंडळी सर्वच भगवद्भक्त आहेत. श्री. माधव पर्वतेची आणि कै. श्री. ना. भा. जोशींची ओळख होती त्यामुळे तो पू. स्वामींच्याकडे आकर्षित झाला. त्याचा अनुग्रहही मला वाटते १९९४ मध्येच झाला. तेव्हा तो सांगलीतच रहात होता. त्यांच्या घराचे नावही त्यांनी रामदास ठेवले होते. त्यांच्या घरी दरवर्षी दासनवमीचा उत्सव तीन दिवस सुंदर रीतीने साजरा केला जातो. प्रिय अंजली, सौ. माया वहिनी, प्रिय श्रीहरी सर्वच भाविक आहेत. सौ. वहिनीचे आजोबा यांना मला वाटते श्री. लेले महाराज (पू. योगी अरविंद यांचे गुरू) यांचाच अनुग्रह होता. ते नित्य नामात दंग असत. प्रिय अंजली त्यांना गुरूस्थानी मानते, तिने त्यांचे चारित्रही लिहीलेले आहे. तिची अनेक पुस्तकेही प्रसिद्ध झाली आहेत. तिला महाराष्ट्र राज्य सरकार तर्फे पारितोषिकही मिळालेले आहे. प्रसाद प्रकाशनतर्फे तिच्यावर ज्या जबाबदाऱ्या सोपविण्यात येतात त्या ती व्यवस्थितपणे सांभाळते. पूर्वी ती विलिंग्डन

कॉलेजमध्ये प्राध्यापिका होती. आता ती वाईला प्राध्यापिका आहे आणि पुण्याहून रोज ये जा करून आई वडीलांची सेवा करीत अध्यापनाचे काम करीत असते. तिचे मला फार कौतुक वाटते. चि. माधवचा भाऊ चि. मुकुंद पर्वते याने आईची खूप सेवा केली आणि तोही भगवद्‌भक्त आहे. त्यालाही माझ्याबद्दल आत्मीयता आहे. तो मुद्दाम पुण्याहून येऊन मला भेटून गेला. या सर्व कुटुंबीयांचा सहवास हा सत्संग असतो कारण त्यांच्या सहवासात चर्चेचा विषय भगवान् भक्त वा त्यांचे ग्रंथ हाच असतो. प्रापंचिक नाही. प्रिय माधवला, प. पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती यांच्या काव्याला सुंदर चाली लावून ती गाण्यात खूपच रस आहे. तो तसे गाऊ लागला की मला परमानंद वाटतो. माझे काव्य इकडे-तिकडे निरनिराळ्या ठिकाणी विखुरलेले होते. ते त्याच्या स्वाधीन केल्यावर त्याने त्याचे संकलन करून ते स्वहस्ते दोन वह्यांत व्यवस्थित लिहून दिले आहे. मी हक्काने त्याला काहीही काम सांगते आणि तो ती तत्परतेने पार पाडतो. भगवत् भक्ताचे सहज सरलता असणे आणि जराहि कुटिलता नसणे हे लक्षण त्याच्या ठिकाणी दिसून येते. श्री. कल्याण पै (श्री. श्रीनिवास पैंचे चिरंजीव) यांच्याशी त्यांची मैत्री जमली आहे. या दोघांचाही मला अभिमान वाटतो.

***

### श्री. नाना आरे व श्री. संतोष दंडवते वगैरे

श्री. वासुनाना आरे हे इस्लामपूरला आमचे भाडेकरू होते. त्यांची नरसिंगपूरला जमीन होती व इस्लामपूरला 'मोहन वस्त्र भांडार' नावाचे कापड दुकान होते. त्यांची मुले मोहन, रजनी, कमल वगैरे आमच्या मुलांच्या बरोबरीची होती. आमचा खूप घरोबा होता. प. पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती आमच्या घरी रहावयास आले तेव्हा श्री. नानाही सत्संगासाठी येऊन बसत. एका सूर्यग्रहणात आमच्याच घरी ह्यांना श्रीदत्त मंत्राची दीक्षा मिळाली व त्या दिवशी श्री. नानांना देवीचा मंत्र दिला गेला. ते नित्य स्नानसंध्या उपासना वगैरे निष्ठेने करत असत. त्यांना प. पू. स्वामींनी पायी ९ वेळा इस्लामपूर ते कोल्हापूर चालत जाऊन श्रीमहालक्ष्मी दर्शन घेऊन येताना बसने येण्यास अनुमति दिली होती. त्यावेळी त्यांच्या

बोलण्यावरून ते रात्री टोप–संभापूर येथे थांबून मग दुसऱ्या दिवशी विहीरीवर स्नान करून कोल्हापूरला पायी जाऊन दर्शन घेऊन येताना बसने परत येत असत, असे कळते. आम्ही सांगली मिरज येथे होतो तेव्हा परंड्यास जाता येता त्यांची तेथे गाठ पडे. तेही इस्लामपूर सोडून नरसिंगपूरला राहू लागले होते व तेथे शेती करीत होते. आम्ही मिरजेला असताना मुद्दाम त्यांच्या घरी नरसिंगपूरला जाऊन आलो होतो. श्रींचा एक चातुर्मास इस्लामपूर येथे श्री. नानांचे बिऱ्हाड होते त्याच इमारतीत झाला होता. तेव्हा त्यांचा मुलगा चि.सतीश खूप लहान होता. त्याचे कपडे काढून सौ. अक्का त्याला पू. स्वामींच्याकडे सोडत असत. त्यावेळी त्यांचा स्पर्श त्याला लाभला होता, हे त्याचे मोठे भाग्य होते. नंतर डॉ. रमेशची मुंबईला बदली झाली म्हणून आम्ही मुंबईला गेलो. त्यावेळी मुलांच्यावर सर्व कारभार सोपवून श्री. नाना परंड्यास हंसराज मठातच राहू लागले होते. ते २/३ घरी भिक्षा मागून जे भिक्षान्न मिळे त्याचा नैवेद्य दाखवून तो प्रसाद सेवन करीत. ते तेथे राहिल्यावर त्यांनी मठाची खूप सेवा केली. पहाटे काकड आरती, संध्याकाळी बरोबर ७ ला आरती तिन्ही समाधिंची वगैरे उपक्रम सुरू केले. त्यामुळे गावातील लोकही नियमित आरतीस येऊ लागले. त्यांनी काही लोकांना अनुग्रहही दिले. त्यातील त्यांचा एक निष्ठावंत शिष्य म्हणजे श्री. संतोष प्रल्हाद दंडवते होय. तो मराठी एम. ए. असून त्याचे हृदयाचे ऑपरेशन झालेले होते. त्यानंतर त्याचे लग्न झाले. पत्नीचे नाव सौ. गीता असून मुलीचे नाव त्याने परमगुरू श्रीप्रज्ञानानंद सरस्वती स्वामींच्या वरून 'प्रज्ञा' असे ठेवले असून तिला खरोखरच शोभून दिसत आहे. ती उत्तम प्रवचने किर्तने करते. त्याच्या मुलाचे नाव श्री दत्तराज असून तोही लहान वयातच कीर्तने करू लागला आहे. त्याचे कीर्तन ऐकून उस्मानाबादला प्रिय मंगलाताई ओकनेही त्याला शबासकी देऊन त्याचे कौतुक केले होते. 'बहुत सुकृताची जोडी म्हणून विठ्ठल आवडी' असे म्हणतात. तशी भरपूर पुण्याई गाठी असल्याखेरीज या दोन्ही मुलांना इतक्या लहान वयात भगवन्नाम, कीर्तन स्मरण याची गोडी कशी वाटली असती. श्री. संतोष हा मूळचा पंढरपूरचा असल्याने लहान पणापासून विठ्ठलभक्तीचे संस्कार त्याच्यावर झालेले आहेत. पू. नानांच्या मुळे आणि स्वाामींच्या मुळे नित्य

स्नानसंध्या, जप आदि उपासनाही तो अत्यंत श्रद्धेने आणि प्रेमाने करतो. हे ही खरेच कौतुकास्पद आहे. बऱ्याचवेळा तो श्रींच्या पुण्यतिथी उत्सवात सूत्रसंचालनही करतो. तसेच त्याचा आवाज गोड असून भजने छान म्हणतो. न चुकता तो दरवर्षी ति. नानांच्या पुण्यतिथीस नरसिंगपूरलाही जातो. ति. नाना असताना कुणीही परंड्यास आले की ते हसतमुखाने सर्वांचे स्वागत करीत. ते असताना लोकांनी दिलेल्या देणग्यांतून तेथे मागील बाजू संडास, मोऱ्या, पाण्याचा हौद, पुढील बाजूस फरशी, बोअरवेल, मागे मोठे स्वयंपाकघर वगैरे अनेक सोयी झाल्या. ते स्वतः सर्व आवार झाडून काढीत. उत्सावच्या वेळेला पाण्याचा टँकर आणला गेला की ते स्वतः पाणी आत भरावयास लागत. त्यांना १९९० मध्ये परंड्यातच छातीत दुखावयास लागले म्हणून परंड्यातील मंडळींनी बार्शीस नेऊन डॉ. नेने यांच्या हॉस्पिटल मध्ये नेले. पण त्यांना तेथेच देवाज्ञा झाली म्हणून त्यांचा देह नरसिंगपूरला आणण्यात आला आणि तेथे अंत्यसंस्कार झाले. चि. सतीश त्यानंतरही अधून मधून परंड्यास येतो एवढे मात्र खरे!

डॉ. अनिता केळकर हिचा माझा पूर्वी परिचय नव्हता पण डॉ. अशोक कामत यांच्या सूचनेवरून तिने पी. एच. डी. साठी 'प्रज्ञानानंद सरस्वती यांचे जीवन व कार्य' हा विषय घेतला आणि तिचा परिचय झाला आणि ती माझी मानसकन्याच बनली. हा विषय घेतल्याने ती परंड्यास आली व तिने आम्हा सर्व गुरूबंधुभगिनींचा परिचय करून घेतला. नंतर तिने श्रींच्या वाङ्मयाचाही सखोल अभ्यास केला व जीवनचरित्रासाठी मी लिहीलेले चरित्र तिला उपयोगी पडले. या कामासाठी मी तिच्या घरीही दोनदा रहावयास गेले होते. शिवाय तिचे माहेर मिरजेत श्री. सोहोनी यांच्याकडे आहे व आम्हीही मिरजेत रहात होतो त्यामुळेही गाठभेट होत असे. पू. स्वामी प्रज्ञानानंद यांची कृपा तिच्यावर होऊन तिला नामाची गोडी लागली आहे. त्यामुळे १०/१२ वर्षे ती तिच्या घरी गुढीपाडवा ते रामनवमी अखंड नामजपाचे अनुष्ठान करते. शिवाय 'मानस गूढार्थ चंद्रिका' ही बृहत टीकाही तिने तिच्या सत्संग मंडळात समग्र वाचून चर्चा करून अभ्यासली आहे व त्या मैत्रिणींसह श्रीगुरूपौर्णिमेपूर्वी परंड्यास येऊन पाच दिवसाचे मराठी मानसाचे पारायण करते. श्री. प्रभाकर पंत व तिचा मुलगा चि. अनिरूद्ध व

त्याची पत्नी सर्वांशी प्रेमाचे धागे जूळून आले आहेत. सर्वच भाविक व भगवद् भक्त आहेत. तिचे वडीलही मिरजेत किल्ल्यात रहातात व श्री. विश्वेश बोडस, श्री. हृषिकेश बोडस यांच्या सहवासात असतात. हल्ली बोडसांच्या बरोबर सौ. अनिता पंढरपूरच्या कार्तिक वारीस जाते. फार गुणी मुलगी आहे.

***

## डॉ. सौ. उषाताई गुणे

मला वाटते मंगलाताई ओक आणि सौ. रेखा पटवर्धनमुळे माझी सौ. उषाताईंशी ओळख झाली. त्या आर्युवेदाच्या वैद्य (डॉक्टर) आहेत. व त्यांचा अध्यात्मिक ग्रंथांचा चांगला व्यासंग आहे. प्रिय प्रतिमा गद्रे यांच्या जवळ १० वर्षे अध्ययन करीत होती. त्यामुळेच ती इतकी सुंदर प्रवचने करू शकते. सौ. उषाताई गोंदवल्यासही २/४ वर्षे वैद्यकीय सेवा करण्यासाठी राहिल्या होत्या असे ऐकते. तसेच चिन्मय मिशनमध्येही बालविहार चालविणे, मुलांसाठी मासिक काढणे इ. कामे करीत होत्या असे कळते. त्यांची पू. गुरूदेवांवर फार निष्ठा होती व आहे. त्या 'श्रीरामचरितमानसा' वरही सुंदर प्रवचने करतात. आवाजही गोड आहे. तसेच श्रीमद् भगवद्गीता जवळ जवळ पाठ असून उपनिषदांचा पतंजलि योगसूत्रांचा चांगला अभ्यास असून पू. श्री. गुरूदेवांच्या 'विष्णूसहस्त्रनामा' वरील इंग्रजी भाष्याचा त्यांनी मराठीत अनुवाद केला असून तो लवकरच प्रकाशित होईल. त्या माझ्यावर फार प्रेम करतात. कित्येक वेळा त्या माझी बहिणीसारखी काळजी घेतात. त्यांच्या बरोबरचा वेळ भगवत् चर्चेत अत्यंत आनंदात जातो.

***

## प्रिय प्रतिमा गद्रे

सौ. उषाताईंच्यामुळे प्रिय प्रतिमाची ओळख झाली आणि का कुणास ठाऊक लहान वयात तिला अध्यात्माची आवड आहे हे पाहून तसेच तिचा व्यासंग पाहून व प्रवचने करते हे पाहून तिचे फार कौतुक वाटले व मुलीप्रमाणे वात्सल्ययुक्त प्रेम वाटू लागले. आम्ही मिरज मेडिकल कॉलेजच्या

कर्मचारी निवासात रहात होतो, तेथून तिचे घर जवळ होते म्हणून सौ. सुरेखा व चि. रमेश गावाला गेली आणि मी एकटी असले की ती माझ्या सोबतीला रात्री झोपायला यायची. रात्री तिचे वडील आणून सोडत आणि पहाटे ६ वाजता तिला न्यावयास येत. रात्री येताना ती कॉफी घेऊन येई आणि आम्ही कॉफीचा आस्वाद घेत खूप गप्पा मारत असू. अर्थात त्या अध्यात्मिक विषयावरच असत. त्यामुळे परमानंदाचा लाभ होत असे.तिने श्रीज्ञानेश्वर माऊलींची, श्रीसद्गुरू मानून पूजा करून, समाधिवर ठेवून माळ घेतली आहे. श्रीज्ञानेश्वर माऊलींच्या कृपेने तिचे चांगले नाव होत आहे. 'ई टि. व्ही.' दूरसंचार वाहिनीवर तिची ५३ प्रवचने ध्वनिमुद्रित होऊन प्रसारित झाली आहेत. तसेच अहमदनगरच्या पू. क्षीरसागर महाराजांच्या श्रीदत्त देवस्थानच्या तर्फे निघणाऱ्या 'श्री गुरूसेवा' या त्रैमासिकाच्या ऑफिसात ती गेली ३/४ वर्षे काम करीत असून तिचे 'नारदभक्तिसूत्रे' हे पुस्तक या संस्थेत प्रकाशित करून तिला मानधन देऊन तिचा व तिच्या आई-वडिलांचा नगर येथे सत्कारही केला गेला. ती श्री भागवत सप्ताहही सुंदर करते. आता श्री. शिरीष हर्डीकर यांच्याशी तिचा विवाह ठरला असून नोव्हेंबरमध्ये तो संपन्न होईल. श्री ज्ञानेश्वर माउलींच्या कृपेने त्यांचा संसार निश्चितच सुखाचा होईल अशी खात्री आहे.

***

## रामायण पारायणमुळे परिचित बंधुभगिनी

सौ. श्यामलाने १०८ मराठी मानसाच्या सामुदायिक पारायणाचा संकल्प केला. तेव्हा तिला उस्मानाबादमधील अनेक भगिनींचे सहाय्य मिळाले. विशेष म्हणजे त्यांनी सर्वांनी प्रथमच ठरवले होते की यासाठी श्रीरामचरितमानस प्रेमी मंडळास जराही तोशीस लागू द्यावयाची नाही. जेथे जावयाचे तेथील मंडळींनी व्यवस्था केली तर ठीकच आहे नाहीतर राहण्या जेवणाचाही खर्च वेळप्रसंगी करावयाचा आणि प्रवास खर्च तर प्रत्येकाने आपापला करावयाचा. यात रामभैय्याच्या कृपेने ज्या भगिनी सहभागी झाल्या त्यांचे खरोखरच कौतुक करायला हवे. शिवाय सर्वांना त्यांच्या त्यांच्या घरातील मंडळींचे सहकार्य मिळाले हे विशेष. गुरू भगिनींपैकी सौ.

रेखा पटवर्धन, मालूताई अघोर, स्नेहलता कुलकर्णी, कमलताई निलंगेकर या बऱ्याच पारायणातील सहभागी झाल्या होत्या व अद्यापही होत असतात. शिवाय सौ. रमा हुदली, सौ. वसुधाताई गोडबोले, श्रीमती वसुधाताई आठवले, सौ. अयाचित, सौ. भोसरीकर, सौ. कमलताई भातगलीकर, सौ. चारूलता वैद्य, ताई–माई..... वगैरे भाग घेतात. सौ. वसुधा गोडबोले ह्यातर स्वतंत्रपणे निरनिराळ्या गावातील विविध संस्थांशी, देवस्थानाशी संपर्क साधून, प्रसंगी प्रत्यक्ष तेथे जाऊन कार्यक्रम ठरवून येतात. शिवाय जेथे जातात तेथील आजूबाजूच्या तीर्थक्षेत्रांनाही या सगळ्या भेट देतात. श्री. दिवाकर, श्री. हुदली व श्री. गोडबोले हे ही यात सामील होत असतात. श्री. श्रीरामजी गिल्डा होते, त्यावेळी महुवा येथे पू. मुरारी बापूंच्या सान्निध्यातही तेथे पारायण झाले. या भगिनींना अद्‌भूत अनुभवही येतात हे विशेष. सज्जनगड, पावस, शेगाव, पवई व पवनार, सांगली येथील चिन्मय आश्रम, कसबा गणपती पुणे, अयोध्या, काशी, तिरूपती, वृंदावन, आळंदी, शिवथरघळ आदि देवस्थाने, मंगळवेढा, पंढरपूर, पनवेल, संगमेश्वर, गणपती पुळे, कोल्हापूर, शंकराचार्य मठ व गीता मंदिर आदि अनेक ठिकाणी पारायणे झाली. बेळगाव, गोंदवले, उस्मानाबाद, परंडा, मिरज, आणि सांगली, पुणे येथील चिन्मय मिशनच्या केंद्रातून त्यांची सामुदायिक पारायणे झाली.

याशिवाय अनेकांचा सत्संग प्रेम मला लाभले आहे. मुंबईत असताना आमच्याकडे कामाला येणाऱ्या अलका, शांताबाई, ललिता, बबिता नंतर मानखुर्दहून कामाला येणाऱ्या बाई यांचे स्मरण अवश्य होत आहे. काही सामान्य व्यक्तीच्या ठिकाणी असामान्य गुण आढळून येतात तेव्हा त्यांना गुरू समजून मस्तक नमवावे असे वाटते. मानखुर्दहून घरातील सर्व कामे आवरून सव्वापाच साडेपाचची लोकल पकडून सव्वासात–साडेसातला जे. जे. हॉस्पिटलच्या कर्मचारी निवासात कामावर येणाऱ्या आणि धुंवाधार पावसातही एकही दिवस खाडा न करणाऱ्या व्यक्तिविषयी तसेच घरांत कोणास देवाज्ञा झाली तरच गैरहजर राहणाऱ्या व इतर कधींही कामचुकारपणा न करणाऱ्या महिला पाहिल्या की खरोखरच त्यांच्याबद्दल प्रेमादर उत्पन्न होतो. श्री अवधूतांप्रमाणे २४ गुरू सहज करता येतील! अशा व्यक्ति

आयुष्यात भेटणे हे रामकृपेशिवाय अशक्यच आहे. जेथे जेथे वास्तव्य झाले तेथील सेवकवर्गाने उदंड प्रेम दिले. सगळ्यांची नावेही सांगता येणे शक्य नाही. इस्लामपूरला श्री. दिगंबर वाळवेकर व त्यांचे कुटुंबीय, श्री. रघुनाथ उरूणकर यांचे कुटुंबीय, लक्ष्मी, दादू वगैरे तसेच हवालदारीण सर्वांनी खूप प्रेम केले. नंतर बेळगाव, मुंबई, मिरज परत मुंबई व परत मिरज असे वास्तव्य झाले. प्रत्येक ठिकाणी प्रेमाचा सुकाळच होता. आता विजयनगर सांगली येथेही सौ. मनिषा, सौ. सखुबाई वगैरे मनोभावे सेवा करतात, प्रेम करतात.

***

# सत्पुरुष

## पू. गुळवणी महाराज

प. पू. स्वामींच्याकडूनच परमपूज्य गुळवणी महाराजांबद्दल ऐकले होते व त्यांनीच आम्हांला सांगितले होते की, तुम्ही पुण्याला गेलात तर त्यांचे दर्शनास जरूर जा. म्हणून आम्ही एकदां पुण्यास गेलो असता मुद्दाम पू.गुळवणी महाराजांच्या दर्शनासाठी गेलो होतो. तेव्हा ते नारायण पेठेत एका इमारतीत तळमजल्यावर राहात होते. आम्ही प. पू. स्वामी प्रज्ञानानंदाकडून आलो आहोत असे सांगितल्यावर त्यांना फार आनंद झाला. त्यावेळी त्यांच्या बरोबर त्यांची भगिनीही होत्या. त्यांनी आमची प्रेमाने विचारपूस केली व आम्हाला स्वहस्ते 'गुरूदत्त योग' हा ग्रंथ प्रसाद म्हणून दिला आणि परमपूज्य स्वामींच्या संबंधीही चौकशी केली. तेव्हा पू. स्वामी बहुतेक चास-कमानलाच होते. मला आठवते, त्यांनी स्वहस्ते काढलेला श्रीदत्त प्रभूंचा फोटोही तेथे आम्हाला दिसला. त्यांच्यासारख्या सत्पुरूषाच्या दर्शनाने आम्हाला खूप आनंद झाला.

त्यानंतर त्यांचे दर्शन झाले, ते 'वासुदेव निवास' मध्ये कारण पानशेताच्या पुरात नारायण पेठेतील सर्व घरांचे खूप नुकसान झाले होते व श्री महाराज 'वासुदेव निवासा' तच राहावयास आले होते. खाली देवघरातच देवदर्शन घेऊन आम्ही माडीवर त्यांच्या दर्शनासाठी गेलो. कारण काय असेल ते असो. कुणा संतांचे दर्शन झाले की आपोआप माझ्या ठिकाणी अष्टसात्विक भाव जागृत होऊन डोळ्यातून अश्रु झरत असत आणि एकप्रकारे अवर्णनीय आनंदही होई. त्या सत्पुरूषांनाही बहुतेक माझे प्रेम जाणवत असणार! म्हणूनच ते आमच्यावर कृपावर्षाव करीत असत.

सन १९५५ मध्ये जून १५ ला ह्यांना देवाज्ञा झाली. त्यापूर्वी आम्ही उस्मानाबादला पू. स्वामींच्या दर्शनासाठी जानेवारी – फेब्रुवारीमध्ये जाऊन आलो होतो. नंतर हे आजारी पडण्यापूर्वी केव्हातरी आम्ही पुण्यास गेलो

असता 'वासुदेव निवासा' त पू. गुळवणी महाराज यांचे दर्शन घेण्यासाठी गेलो होतो. ते माडीवरच होते. तेथे अर्धा तास त्यांच्या सत्संगात घालवून आम्ही खाली आलो आणि जाण्यासाठी गाडीत बसू लागलो. हे गाडीत बसले आणि मी बसण्यापूर्वी सहज वळून वर पाहिले तर पू. गुळवणी महाराज खिडकीत उभे राहून आमच्याकडे पाहात होते. मला आश्चर्य वाटले आणि मी ह्यांना म्हटले की, 'अहो महाराज! खिडकीशी येऊन आपल्याकडे पाहात आहेत' ह्यांनी लगेच उतरून खालूनच नमस्कार केला आणि मी ही नमस्कार केला. त्यांनी हसून हात उंच करून आशीर्वाद दिला आणि आम्ही गाडीत बसून निघून गेलो नंतर ह्यांना देवाज्ञा झाल्यावर मला असे वाटू लागले की आम्ही दर्शनास गेलो होतो तेव्हा त्यांना ह्यांच्या भविष्याची चाहूल लागली असेल का? म्हणून तर ते खिडकीपाशी आले नसतील ना? काय असेल ते रामभैय्याच जाणतात!

***

## पू. दत्तात्रेय महाराज कवीश्वर

यांच्याही जास्त परिचयाचा योग आला नाही. पण त्यांचे चरित्र माझ्या वाचनात आले होते आणि त्यांच्या धाकट्या बंधूशी चांगला परिचय होता. ते आमच्या घरीही येत असत. एकदा मला पू. दत्तात्रेय महाराजांचे स्वप्नांत दर्शन झाले होते आणि त्यांच्याबद्दल प्रेमादरही होता. म्हणून मी 'वासुदेव निवास' मध्ये जाऊन मुद्दाम त्यांचे दर्शन व कृपाशीर्वादही घेऊन आले होते. पूज्य गुळवणी महाराजांचे दर्शन रस्त्याकडच्या बाजूच्या माडीवर होत असे. तर पू. कवीश्वर महाराज जिना चढून आल्यावर उजव्या हातास जी माडी आहे तेथे बसले होते. सत्संगती फार दुर्लभ असते हेच खरे!

***

## पू. मामासाहेब देशपांडे

पू. मामासाहेब देशपांडे हे 'संतकृपा' मासिकाचे संस्थापक होते आणि मी लिहिलेले 'प्रज्ञानानंद सरस्वती' चे चरित्र 'संतकृपा' तर्फेच संतचरित्रमालेतील पहिले पुष्प म्हणून प्रकाशित झाले होते. तो प्रकाशन

समारंभ परंडा येथे श्रीं च्या पुण्यतिथी उत्सवाच्यावेळी झाला होता. त्यासाठी पू. मामासाहेब देशपांडे व श्री. ना. वि. काकतकर दोघेही मुद्दाम परंड्यास आले होते. विशेष म्हणजे पुण्यतिथीच्यावेळी ब्राह्मण भोजन व तीर्थपूजा वगैरे विधी असतो. तेव्हा पू. मामासाहेब स्वत: देवाच्या स्थानी बसले होते व त्यांनी पूजेचा स्वीकार केला होता. दुपारी प्रकाशनावेळी पूज्य मामांच्या शेजारी माझ्यासाठी खुर्ची ठेवली होती. पण मला त्यांच्या शेजारी बसायला अत्यंत संकोच वाटू लागला. तेव्हा ते म्हणाले, 'तुम्ही गुरूभक्त आहांत ना?' मी होकारार्थी मान डोलवली तेव्हा म्हणाले, 'मग संकोच कशाला करता! बसा, बसा!' ते ऐकून माझा संकोच गेला आणि मी त्यांच्या शेजारी खुर्चीवर बसले ते अत्यंत प्रेमळ आणि कृपाळू होते. एकदा सांगलीत 'यशवंत मंगल कार्यालयात' आणि एकदा 'डेक्कन क्विन' मध्ये त्यांचे दर्शनाचा योग आला होता. त्यावेळच्या मधुर स्मृती अद्याप मनांत ताज्या आहेत!

***

## पू. गुरूदेव रानडे

माझ्या चुलत नणंद श्री. मनुताई ह्या पू. गुरूदेव रानडे यांच्या पत्नी होत्या. आमच्या सासऱ्यांनी म्हणजे डॉ. श्री. म. वैद्य यांनीच पू. गुरूदेव रानडे यांचे स्थळ सुचविले होते असे म्हणतात. ति. काकांनी लिहिलेल्या तिन्ही ग्रंथांना पू. गुरूदेवांनीच प्रस्तावना लिहिलेल्या आहेत. पू. गुरूदेव सांगलीला येत तेव्हा सांगलीच्या श्री. राजेसाहेबांच्या गेस्ट हाऊसवर उतरत असत. एके वर्षी ते सांगलीला येऊन गेस्ट हाऊसवर उतरलेले असता श्री. भाऊकाका (महादेव विष्णु वैद्य) ह्यांना येऊन भेटले आणि म्हणाले, 'गुरूदेव, सांगलीला आले आहेत. तेव्हा त्यांना इस्लामपूर आणावे म्हणतो. तरी तुझी गाडी दे!' ह्यांनी आनंदाने संमती दिली ड्रायव्हर होताच. त्यामुळे ती.भाऊकाकांच्या बरोबर मी ही चि. रमेशला बरोबर घेऊन त्यांच्या बरोबर सांगलीस गेले. पूज्य गुरूदेव बाहेरच्या हॉलमध्ये बसलेले होते. त्यांना भेटण्यासाठी दर्शनासाठी बरीच मंडळी आली होती. ति. भाऊकाका त्यांच्याजवळ जाऊन त्यांना नेण्यासाठी गाडी घेऊन आल्याची

सूचना देण्यास गेले व मी आत सौ. मनुताईंजवळ जाऊन बसले. त्यांना खूप आनंद झाला.

थोडावेळ झाल्यावर आम्ही सर्व इस्लामपूरला जाण्यास निघालो. ति.भाऊकाका, चि.रमेश व ड्रायव्हर पुढे बसले आणि मी ड्रायव्हरच्या मागे, माझ्या शेजारी सौ. मनुताई आणि पलिकडे पूज्य रामभाऊ बसले. गाडी निघताच भजने म्हणण्यास सुरूवात झाली ती घरी पोहोचेपर्यंत सुरू होती. मात्र गाडीतून जाताना अर्धा तास झाल्यावर पू. गुरूदेवांच्या भोवती सौ. मनुताईने एक स्वच्छ धुतलेले धोतर धरले आणि दुसरे त्यांना दिले. त्याबरोबर ते दुसरे धोतर गुंडाळून पहिले नेसलेले धोतर सोडून त्यांनी सौ. मनुताईजवळ दिले ते त्यांनी गाडीत वाळण्यासाठी आडवे धरले. दर अर्ध्या तासांनी ते वस्त्र बदलत हे माझ्यानंतर ध्यानात आले. इस्लामपूरला पोहोचल्यावर गाडी दाराशी थांबल्यावर त्यांना मी घरात येण्याची विनंती केली. तेव्हा घरात येऊन नुसते एकदा घरांतून फिरून बोळांतून चालत ते त्यांच्या सासुरवाडीस गेले. मी घरात जाऊन काही कामे उरकून पू. स्वामींनी लिहिलेले मराठी तुलसी रामायण घेऊन ति. भाऊकाकांच्या घरी गेले व तेथे पू. गुरूदेवांना नमस्कार करून पू. स्वामींच्या विषयी थोडेसं सांगून ते रामायण त्यांच्या हातात दिले. तेव्हा त्यांनी ते चाळून पाहिले आणि त्यातील एक पान उघडून मला म्हणाले, 'हं हे वाच!' तो भाग होता अरण्यकांडातील खर-दूषण वधाच्या वर्णनाचा (अरण्यकांड दोहा २० पहा) ते सर्व वर्णन छंदात आहे. चौपाया वाचताना आम्ही त्या विविध चालीत संपूट लावून वाचत असू. पण छंदाला तसे काहीच करता येत नाही. पण पू. गुरूदेवांनी जे पान काढून दिले तेच वाचणे भाग होते. दोहे २० मधील 'राम राम म्हणता मरति पावति पद निर्वाण । क्षणि उपाय करूनि रिपू मारिति कृपानिधान ।। २० रा ।।' वाचताच पूज्य गुरूदेव म्हणाले, 'पुरे! छान झाले आहे' म्हणताना मी वाचन बंद केले. त्यावेळी मला या गोष्टीचे महत्त्व कळले नव्हते. नंतर सावकाश त्यावर विचार केल्यावर लक्षात आले की रामनामाचे, रामरूपाचे माहात्म्य लक्षात यावे म्हणून त्यांनी हा भाग वाचायला लावला असावा. असो.

पुढे असे झाले आम्ही श्री. ठोंबरे यांच्या संपर्कात आलो आणि त्यांना

मराठी 'मानस गूढार्थ चंद्रिका' अयोध्याकांडाची छपाई सुरू करण्यास सांगितले. तेव्हा ते म्हणाले, 'कल्याणी' वार्षिकाच्या 'गुरूदेव रानडे' विशेषांकाचे काम पूर्ण झाले की ह्या कामास सुरूवात करतो' म्हणून मी सहज त्या विशेषांकाबद्दल चौकशी केली आणि मग मी पण पूज्य गुरूदेवांच्या आठवणी देऊ शकते असे म्हटले. तेव्हा त्यांनी संपादकास विचारून मला आठवणी देण्यास सांगितले. मी वरील आठवणी लिहून दिल्या व त्या छापूनही आल्या. त्या लेखाबरोबर माझा पत्ता, फोन नंबर वगैरेही दिला गेला होता. त्यामुळे तो अंक वाचून ति. भाऊकाकांची मुलगी सौ. मीना शिंत्रे, नाशिक हिचा मला फोन आला आणि तिने तिला झालेला आनंदही व्यक्त केला. मी Ph.D. केलेलेही सर्व नातेवाईकांना माहित नव्हते. असो.

पुढे असे घडले, पुण्याचे ति. नाना गद्रे यांचा परिचय झाला आणि त्यांनी माझ्यावर अपार प्रेम आणि कृपाही केली. त्यांची हकीगत पुढे येईलच. येथे पू. गुरूदेवांच्या संदर्भात घडलेली हकीगत फक्त दिली जात आहे. एकदा मी स्वप्नातच असे पाहिले की, मी ति. नानांच्या दर्शनास गेले होते आणि त्यांना म्हटले की नाना तुम्हाला इतकी दर्शने वगैरे होतात तर मलाही जरा चुणुक दाखवाना. तेव्हा ते हसले आणि म्हणाले, 'ठीक आहे! ते बघ तिकडे कोण बसले आहे!' तसे मी स्वप्नातच वळून पाहिले तो मग तेथे पू. गुरूदेव रानडे आरामखुर्चीत बसले आहेत असे दिसले. मी स्वप्नातच धावत त्यांच्याजवळ गेले आणि त्यांना प्रेमाने प्रणाम केला आणि मला इतका आनंद झाला होता की, स्वप्नातच मला दिसले की मी आनंदाने 'नाना! कमाल आहे हं तुमची!' असे म्हणून नाचतच सुटले आणि पहाते तो श्रीगुरूदेव अदृश्य झाले होते. नाना माझ्याकडे पाहून हसत होते आणि मला अचानक जाग आली. मात्र तेव्हापासून मी रोज श्रीसद्गुरूंच्या बरोबर ज्या अनेक संतांची मानसपूजा करीत असे त्यात श्रीगुरूदेव रानड्यांची भर पडली.

अशी काही वर्षे गेली आणि अचानक एक दिवस फोन आला. 'डॉ. कमल वैद्य आहेत कां?' मी म्हटले 'हो, मी कमल वैद्यच बोलते आहे. आपण कोण?' 'मी विजया आपटे, शकू रानडे बोलत आहे.' मला आश्चर्य वाटले. मी म्हटले, 'काय काम आहे, सांगा ना!' त्या म्हणाल्या, 'मी माझ्या आईचे चरित्र लिहिले आहे. त्याला मला तुमची प्रस्तावना हवी आहे.

माझे वय बरेच आहे. तब्येतही चांगली नसते. लिहून ते पुरे झाले आहे. पण कुणी लवकर प्रस्तावना देत नाही आहे.' मी म्हटले, 'तू कुरियरने मला त्याची झेरॉक्स प्रत धाड म्हणजे मी वाचून लगेच प्रस्तावना लिहून तुला धाडीन.' हे बोलणे झाल्यावर तिने लगेच मला चरित्राची झेरॉक्स प्रत धाडली आणि मी वाचून तिला पुरस्कार लिहून धाडला. त्यावर तारीख आहे ४ एप्रिल २००५ म्हणजे ह्या गोष्टीला सुद्धा सात वर्षे होत आली आहेत.

प्रिय शकुताई माझी नात्याने भाची असली तर माझ्यापेक्षा वयाने दोन वर्षांनी मोठी होती. तिचा जन्म २९ जानेवारी १९२५ ला इस्लामपूरला आजोळी झाला होता तर माझा जन्म ८ जानेवारी १९२७ ला माझ्या आजोळी मद्रासला झाला होता. माझे लग्न लवकर १५ व्या वर्षी १९४२ मध्ये झाले त्यावेळी तिने मला पाहिले होते त्यावेळी तिचे लग्न झालेले नव्हते. मी त्यावेळी मॅट्रिक नव्हते. नंतर आमची कधी गाठच पडली नव्हती. 'त्रिवेणी संगम' या ग्रंथामुळे आम्ही परत संपर्कात आलो होतो. तिने मुद्दाम आग्रह केला होता म्हणून मी २००५ मध्येच पुण्यास गेले असता तिच्या 'रामधुन' बंगल्यावर तिला भेटायला गेले होते. तेव्हा तिने लिहिलेले पू. गुरूदेवांचे चरित्र 'जैशी गंगा वाहे' हे व आणखी एक-दोन पुस्तके मला भेट दिली. त्यावेळी तिच्या उशाशी ऑक्सीजन सिलेंडर ठेवलेलाच होता हे पाहून मला फार आश्चर्य वाटले होते. त्यावेळी आम्ही खूप मनमोकळ्या गप्पा मारल्या होत्या. ती आमची शेवटचीच भेट होती! तिने 'डॉ. श्रीमती कमलमामींना नमस्कारपूर्वक भेट दिलेली 'त्रिवेणी संगम' ची प्रत तिला देवाज्ञा झाल्यावर तिची मुलगी सौ. नंदिनी साठे हिच्याकडून मला मिळाली.' त्यात 'संतांचे आप्त होणं ही तारेवरची कसरत आहे.' शकुताई हे वाक्य लिहिलेले होते २००५ मधील रामनवमीला पुस्तक प्रकाशित झाले होते.

मी प्रत्यक्ष पू. गुरूदेवांना पाहिले होते तेव्हा ते पलंगावर बसलेले होते. पण स्वप्नात मला ते आरामखुर्चीत बसलेले दिसले आणि त्यांच्या चरित्रात ते नेहमी त्यांच्या आवडत्या आरामखुर्चीत बसत असा उल्लेख असल्याचे वाचून मला आश्चर्यही वाटले आणि आनंदही झाला.

पूज्य गुरूदेव रानडे यांना देवाज्ञा झाल्यावरही एकदा पू. मनुताई रानडे इस्लामपूर येथे त्यांचे बंधु श्री. बळवंतराव वैद्य हे त्यावेळी मंत्रीवाड्यात राहात होते. त्यांच्याकडे आल्या होत्या. त्यावेळी त्या पांढऱ्या शुभ्र वेशात एखाद्या तपस्विनीप्रमाणे भासत होत्या. तेथेही त्यांची नित्य सायं उपासना पहावयास मिळाली. त्यांनी आम्हा उभयतांना एकदा तरी निंबाळला या असा आग्रह केला होता. पण तो योग कधीच आला नाही. पू. गुरूदेवांचे शिष्य श्री. बी. आर. कुलकर्णी, सोलापूर येथे पोस्टल कॉलनीत राहात असत. त्यांची ओळख योगायोगाने झाली होती.

मी Ph.D चा प्रबंध सादर करण्यापूर्वी संदर्भसूची तयार करताना मला असे दिसून आले की, मी पू. गुरूदेवांच्या ग्रंथातील उतारा उद्धृत केला होता पण तो कोणत्या ग्रंथातील यांची नोंद केलेली कुठे सापडेना. याच काळात मी नायगांव येथील मराठी ग्रंथ संग्रहालयात गेले असता माझ्या लक्षात आले की पू.गुरूदेव रानड्यांचे अनुग्रहित डॉ. करमरकर सर्जन यांचे घर तेथून अगदी जवळ आहे. तेव्हा वाटले की त्यांना विचारले तर ते लगेच सांगू शकतील म्हणून मी तेथून सरळ त्यांच्या घरी गेले आणि त्यांना मदत करा अशी विनंती केली. तेव्हा ते म्हणाले की, 'मी तुम्हाला मार्गदर्शन करू शकणार नाही पण उद्या श्री. बी. आर. कुलकर्णी, सोलापूर येणार आहेत त्यांना तुम्ही याचवेळी येऊन भेटलात तर ते तुम्हाला बरोबर सांगतील.' त्याप्रमाणे मी दुसरे दिवशी गेले व श्री. कुलकर्णी यांना भेटले. त्यावेळी ते पूज्य गुरूदेव रानड्यांनी लिहिलेल्या प्रस्तावनांचे संकलन करीत होते. डॉ. श्री. म. वैद्यांच्या तिन्ही ग्रंथांना पू. गुरूदेवांनीच प्रस्तावना लिहिल्या होत्या. मी त्यांची सून आहे हे कळल्यावर त्यांना खूप आनंद झाला. मी संदर्भ विचारताच त्यांनी त्या ग्रंथाचे नांव, प्रकरण वगैरेसंबंधी अचूक मार्गदर्शन केले. यानंतर त्यांचा व माझा काही काळ पत्रव्यवहारही चालू होता. त्यांच्या पत्नी सौ. पद्मावती कुलकर्णी यांनी अनुवाद केलेला कानडी ग्रंथाचा मराठी अनुवादही त्यांनी मला भेट म्हणून धाडला होता.

तसेच ति. भाऊकाकांची धाकटी कन्या सौ. प्रतिभा कुंटे आणि तिचे पती डॉ.नरेंद्र कुंटे यांच्याशीही माझा चांगला परिचय झाला असून मी ही त्यांच्या घरी दोनदा जाऊन आले आहे. डॉ. नरेंद्र कुंटेही आमच्या घरी येऊन

गेले असून फोनवरून अधूनमधून आमचे संभाषण होते. डॉ. नरेंद्र कुंट्यांकडून सतत साहित्यसेवा घडत असते आणि श्रीगुरूदेवांच्या कृपेने त्यांचा कीर्ती सुंगंध दरवळून राहिला आहे. श्रीगुरूदेवांच्या संप्रदायात कट्टीच्या नेमाबरोबर नीतिला शुद्ध चारित्र्यालाही महत्त्व दिले जाते हे विशेष होय.

***

## पू. मालती बाळ

प. पू. प्रज्ञानानंद सरस्वती यांचे चरित्र 'संतकृपा' मध्ये प्रकाशित होण्यापूर्वी १९८० मध्ये जानेवारी महिन्यात पौष शुद्ध प्रतिपदा, द्वितीया (प. पू. वासुदेवानंद सरस्वती) (पोटे स्वामी) यांची पुण्यतिथी व तृतीया असे दोन दिवस आम्ही म्हणजे श्री.दामलेकाका, सौ. मंगला व श्री.ओककाका आणि मी असे सर्वांनी गोरे मंगल कार्यालय येथे आमच्या गुरूबंधुभगिनींचे शिबीर भरवावयाचे ठरविले. त्यासाठी पूर्व नियोजन करून सर्व गुरू बंधु-भगिनींना आधीच आमंत्रणे धाडली होती. त्याचा खूपच चांगला परिणाम झाला आणि आम्ही जवळजवळ ३०/३५ जण तेथे एकत्र जमलो होतो. रोज पहाटे स्नान वगैरे झाल्यावर काकडआरती वगैरे करून ध्यानाभ्यास, जप वगैरे वैयक्तिक साधना झाल्यावर नाश्ता करून झाला की प्रत्येकाने क्रमश: आपल्यावर गुरूकृपा कशी झाली, काय काय अनुभव आले, सध्या काय साधना चालू आहे वगैरे सर्व सांगायचे आणि मी ते लिहून घ्यायचे ते दुपारी १२ वाजेपर्यंत, नंतर भोजन व विश्रांती. नंतर ३ ते ४/४।। पर्यंत अशी माहिती गोळा करणे आणि नंतर तास दीड तास प्रवचन होत असे. एक दिवस पू. सौ. मालती बाळ (मिरज) (यांचे अध्यात्मपर लेख 'संतकृपात' येत असत) यांचे प्रवचन ठेवले होते व दुसऱ्या दिवशी डॉ. श्रीकृष्ण देशमुख, मुरगुड (हे माझा भाचा डॉ. माधव नारायण गोगटे, कोल्हापूर यांचे मित्र होते) यांचे प्रवचन झाले. दोघांचा या निमित्ताने परिचय झाला. दोघांची प्रवचने उत्तम झाली होती.

त्यावर्षी नंतर श्रीगुरूपौर्णिमेस पू. सौ. मालती बाळ यांनी मला त्यांच्या घरी 'बाळवाडा ब्राह्मणपुरी' येथेही बोलविले होते. तेथे मी गेले होते. त्यांची अनुग्रहित मंडळी आली होती आणि त्यांनी सौ. मालतीबाई आणि श्री. बाळ

या उभयतांची पूजा गुरूभावनेने केली होती. नंतर आम्ही १९८१ ते १९९३ मुबंईला होतो त्यामुळे त्यांची गाठ भेट या अवधीत झाली नव्हती पण १९९३ मध्ये आम्ही परत मिरजेस रहावयास आल्यावर परत आम्ही दोघी एकमेकींच्या संपर्कात आलो. मला वाटते १९९४ मध्ये पू. नाना गद्रे यांच्या बरोबर मी प्रथम मालती तपोवन मध्ये गेलो होते. त्यावेळी पू. सौ. मालती बाळ तपोवनातच रहावयास आल्या होत्या. त्यांचे श्री सद्‌गुरू पू. शिवानन्दजी यांची मूर्ती तेथे विराजमान होती. पण गर्भगृहाचे (गाभार) काम व्हावयाचे होते नंतर एक दोन वर्षानी त्यांनी तपोवन मध्ये मला त्यांच्या एका ग्रंथाचे प्रकाशन करण्यासाठी आमंत्रित केले होते. तेव्हां मात्र गाभाऱ्याचे काम पूर्ण होवून त्यांच्या श्री सद्‌गुरूंची मूर्ती तेथे स्थापित झाली होती. त्यावेळी त्यांनी त्यांच्या प्रवचनाच्या चार कॅसेटस् व काही पुस्तके मला भेट दिली. नंतर पण त्यांनी मला एकदा असेच शिबिराच्या उद्‌घाटनाला बोलावले होते. त्यावेळीच इचलकरंजी येथे परमपूज्य स्वामी तेजोमयानंदजींचा ज्ञानयज्ञ होता. पण गाडी शिवाय तर मी तिकडे जाउच शकत नव्हते. सौ. रेखा तेथे आमच्या मंडळाच्या पुस्तकाचा स्टॉल लावणार होती. आणि पाच दिवस ज्ञानयज्ञ होता. त्यापैकी एक दिवस परमपूज्य स्वामी तिच्याकडे दुपारी भिक्षेला येणार होते म्हणून मी विचार केला की त्या दिवशी तिच्याकडे प.पू. स्वामीजींचे दर्शन होईलच. म्हणून मी प.पू. मालतीबाईंच्या आमंत्रणास होकार दिला होता. शिवाय त्या मला आणण्यास गाडी धाडणार होत्या.

पण झाले असे की सौ. रेखा आणि चि. सुहास यांनी इचलकरंजीला त्यांच्या गाडीने जायचे ठरविले कारण स्टॉल ठेवायचा म्हणजे पुस्तके इचलकरंजीस न्यावी लागणार होती आणि एस.टी.ने ती नेण्यापेक्षा गाडी नेलेली बरी असे त्यांना वाटले.

सौ. रेखांचा फोन की आम्ही गाडी नेत आहोत. तेव्हां मी पू. मालती बाळ यांना फोन केला की प.पू. स्वामी तेजोमयानंदजी आज इचलकरंजीस येणार आहेत आणि श्री. पटवर्धन यांची गाडी इचलकरंजीस जाणार आहे. म्हणून आपण दुसऱ्या कोणास उद्‌घाटनास बोलवा कारण मी इचलकरंजीस जात आहे. त्यांनी फोनवर सांगितले की पूर्वी ठरल्याप्रमाणे तुम्ही इकडेच या. समारंभ होताच आमच्या गाडीने आम्ही तुम्हास इचलकरंजीस पोहोचवू.

त्याची काळजी करू नये असे म्हटल्यावर मला काही बोलता येईना. ठराविकवेळी त्यांची गाडी मला नेण्यासाठी आली मी 'मालती तपोवन' वर गेले. तेथे ठरल्याप्रमाणे सर्व कार्यक्रम व्यवस्थित पार पडला. नंतर पू. मालती बाळ यांच्या संस्थेच्या सचिव सौ. पटवर्धन यांना बरोबर देऊन मला इचलकरंजीस पोहोचविण्यास त्यांची गाडी देण्यात आली.

आम्ही इचलकरंजीस ज्ञानयज्ञाच्या मंडपाकडे गेलो. तर ज्ञानयज्ञ संपून मंडळी घरोघरी गेली होती. तेव्हा प. पू. स्वामीजी कुठे उतरले आहेत याची चौकशी करून आम्ही तिकडे गेलो. एक जिना चढून माडीवर जावे लागले. सौ. पटवर्धनही आल्या होत्या. आम्ही खोलीत प्रवेश केला आणि पू. स्वामीजी दृष्टीस पडले मात्र माझी प्रेमाने, आनंदाने, उत्कंठतेने अशी अवस्था झाली की, हुंदके देऊन मी रडू लागले, माझ्याने एक पाऊल टाकवेना. सर्व चकित होऊन माझ्याकडे पाहू लागले. पू. स्वामीजी उठून स्वत: मजजवळ आले आणि मला हात धरून एका खुर्चीवर बसवले आणि दुसऱ्या खर्चीवर ते स्वत: बसले तेवढ्यात कुणीतरी पाणी आणून दिले. ते पाणीही आपल्या हातांनी त्यांनी मला दिले. मी शांत होईपर्यंत कुणीच काही बोलले नाही. मग सौ. पटवर्धन परत 'मालती तपोवन' कडे निघून गेल्या. मग पू. स्वामीजी इतरांशी बोलू लागले. सौ. रेखा व चि. सुहास तेथेच होती. त्यांना मग पू. स्वामीजींनी म्हटले की, 'आम्ही तुमच्या घरी परवा येऊ पण आधी कमलताईंच्या घरी जाऊन मग तुमच्याकडे येऊ! काय बरोबर आहे ना?' मी एकदम चकितच झाले आणि मला आनंदही झाला आणि मी म्हटले, 'हो! स्वामीजी!' मग आम्ही थोड्यावेळाने तेथून मिरजेस जाण्यास निघालो आणि रामभैय्याची कृपा म्हणजे पुढे चार दिवसही चि. सुहास पटवर्धन मला रोज इचलकरंजीस घेऊन जात असे. ठरल्या दिवशी पू. स्वामीजी प्रथम आमच्या घरी आले. तेथे नाश्ता करून माझ्याकडून दृष्ट काढून घेतली आणि १।१।। तास थांबून मग सौ. रेखाकडे भिक्षेसाठी गेले. तेथेही मी गेलेच होते. सौ. रेखा व सुहास यांच्या विवाहास २५ वर्षे झाली होती म्हणून पू. स्वामींनी यावे अशी त्या उभयतांची इच्छा होती. पू. स्वामींनी चि. सुहासला सोन्याचे मारुती असलेले पदक भेट म्हणून दिले. श्रीरामजी गिल्डाही त्या दिवशी मुद्दाम मुंबईहून पहाटे आले होते. सत्संगतीचा त्यांनाही लाभ झाला!

इचलकरंजीला मला पू. स्वामीजी म्हणाले होते, 'मी तुमच्यावर रागावलो आहे. मी येणार हे माहित असून तुम्ही दुसरे आमंत्रण घेतलेच कसे?' अर्थात यात राग व्यक्त न होता प्रेमच व्यक्त झाले होते! आशीर्वाद तर इतके निवडून निवडून देतात की काय सांगावे! असो! वरील प्रसंगानंतर पू. मालती बाळ यांच्या दर्शनाचा वा सहवासाचा योग आला नाही एवढे मात्र खरे!

***

## डॉ. श्रीकृष्ण देशमुख – मुरगुड

माझा भाचा डॉ. माधव नारायण गोगटे याची आणि डॉ. देशमुखांची मैत्री होती म्हणून त्यांना शिबिरात प्रवचन देण्यास आमंत्रित केले होते. प्रवचन फार सुंदर झाले. त्यानंतर डॉ. माधवकडेच त्यांची परत भेट झाली होती व एक दोनदा फोनवर संभाषण झाले होते. डोंबिवली येथील श्री. व सौ. मुतालिक यांनी यांचा अनुग्रह घेतलेला आहे. ती दोघे पती-पत्नी परंड्याला एका वर्षी उत्सवास आली होती व सौ. अलकाताईंचे प्रवचनही झाले होते. माझे गुरूबंधु पूज्य श्रीराम गिल्डांचे व यांचे येणे-जाणे असे. त्या डोंबिवलीच्या गणेश मंदिराच्या विश्वस्त मंडळावर आहेत. त्या मंदिरात एकदा मंगलाताई ओकचीही कीर्तने झाली होती. एकदा गुरूभगिनींचे सामुदायिक रामायण पारायणही झाले होते. त्यांच्याशी अजूनही संपर्क आहे.

***

## प. पू. दासराम महाराज – सांगली

मला वाटते १९८२/८३ मधील हकीगत असेल. मी सांगलीला सौ. मंगलकडे राहावयास आले होते. पीएच.डी. चा अभ्यास चालू होताच. तेथे आल्यावर असे कळले की, सांगलीतील डॉ. दा. वि. कुलकर्णी यांनी 'एकनाथी भागवता' वर पीएच.डी. केली आहे. म्हणून मी त्यांची गाठ घेऊन त्यांचा प्रबंध पहावयास मिळाला तर पहावे असा विचार करून त्यांच्या घरी (सिटी हायस्कूलजवळ) गेले. त्यांनी प्रेमाने स्वागत केले. तेव्हा मी माझ्या येण्याचा हेतु त्यांना सांगितला. त्यांनी माडीवर नेवून

त्यांचा प्रबंध मला दाखवला. तो तेव्हा हस्तलिखित स्वरूपात (टंकलिखित) होता. तो त्यांनी दाखवला. एवढेच नव्हे तर मी विचारल्यावरून मला तो चार दिवस (सौ. मंगलच्या) घरी घेऊन जाण्यासही परवानगी दिली. त्यामुळे मला फार आनंद झाला. नंतर ते म्हणाले की त्यांच्या घराच्याजवळच त्यांचे श्रीसद्गुरू दासराम महाराज राहतात त्यांच्या दर्शनास मी यावे. मला आनंद झाला आणि मी लगेच त्यांच्या बरोबर केळकर वाड्यांत श्रीदासराम महाराजांच्या घरी गेली. नमस्कार करून बसल्यावर डॉ. कुलकर्णी यांनी पू. दासराम महाराजांना माझा परिचय करून दिला व मी ही 'एकनाथी भागवता' वर प्रबंध लिहित असल्याचे त्यांना सांगितले. तेव्हा मी म्हटले की, खूप वर्षे काम चालू आहे. पण अजून पूर्ण झालेले नाही.' तेव्हा श्रीमहाराज म्हणाले, 'तुमचा प्रबंध निश्चित पूर्ण होऊन यश मिळेल. आमच्या संप्रदायात माझ्या वडिलांना एकनाथांचा अवतार समजतात. तुम्ही त्यांच्या दर्शनाला आला आहात तर त्यांच्या कृपेने तुमचा प्रबंध निश्चित पूर्ण होऊन यश मिळेल.' मग तेथील त्यांच्या वडिलांच्या समाधीचे आणि श्रीरामाचे वगैरे दर्शन घेऊन व त्यांनी दिलेला प्रसाद घेऊन आम्ही तेथून बाहेर पडलो.

पुढे चमत्कार असा घडला की, कै. डॉ. भीमराव कुलकर्णी यांच्या मार्गदशर्नाखाली माझा प्रबंध पूर्ण होऊन मी तो १९८६ मध्ये श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी विद्यापीठांत सादर केला आणि १९८७ मध्ये जुलैमध्ये माझी Viva होऊन मला Ph.D. पदवी प्राप्त झाली. नंतर मी पुढील वर्षी मुंबईहून सांगलीस सौ. मंगलाकडे गेले असतां अनायासे त्यावेळी गुरूप्रतिपदा आली होती म्हणून मी मुद्दाम श्री. दासराम महाराजांकडे जाऊन श्रीसद्गुरू भावनेने त्यांची पूजा करून त्यांना त्यांच्या कृपेनेच पंधरा वर्षे रखडलेले काम सुफल संपूर्ण झाल्याचे सांगितले. त्यांना खूप आनंद झाला आणि त्यांनी प्रसाद म्हणून एक रूपयाचे एक नाणे मला दिले. नंतर आम्ही मुंबईला होतो तरी त्यांच्याकडच्या उत्सवाचे आमंत्रण ते मला आठवणीने धाडीत असत. पुढे १९९३ मध्ये डॉ. रमेशची बदली परत मिरजेस झाली. तेव्हा काही कारणाने मी सांगलीस गावात गेले की मुद्दाम त्यांच्या घरी जाऊन दर्शन घेऊन येत असे. एकदा गेले असता पू. दासराम

महाराज झोपलेले दिसले. तेव्हा चौकशी केली तर कळले की, ते पडले म्हणून झोपून राहात होते. त्यावेळी त्यांचे चिरंजीव श्री. चंद्रशेखर यांनी मला माडीवर नेऊन त्यांच्यासाठी मुद्दाम बांधलेल्या खोल्या दाखविल्या व म्हणाले की, 'एवढे सगळे केले आहे. पण ते आता वर येऊच शकत नाहीत' असो. थोडक्यात म्हणजे एक प्रकारचा घरोबा निर्माण झाला होता.

नंतर १९९४ मध्ये श्री. दासराम महाराजांच्या घरी श्री. वर्णेकर (प्रज्ञा भारती) यांचे प्रवचन होते. श्री. वर्णेकरांचीही बरीच ओळख होती. म्हणून माझे गुरूबंधु श्री श्रीरामजी गिल्डा जे मुंबईहून माझ्याकडे आले होते. त्यांच्याबरोबर प्रथम मी श्री.हरिभाऊ गाडगीळांच्या घरी श्री. वर्णेकरांना भेटावयास गेले व नंतर तेथून आम्ही पू. दासराम महाराजांच्या घरी प्रवचनास गेलो. प्रवचन झाल्यावर सर्वांशी जरा गप्पा मारून व कॉफी वगैरे पिऊन आम्ही परत निघालो. त्यानंतर परत पू. दासराम महाराज वा श्री. वर्णेकर यापैकी कुणाच्याही भेटीचा योग आला नाही.

श्री. वर्णेकरांची ओळख प. पू. किशोरजी व्यास उर्फ स्वामी गोविंददेवजी गिरी यांच्यामुळे झाली होती. त्यांच्याशी अधूनमधून पत्रव्यवहारही होत असे. त्यांनी 'संघगीता' हे पुस्तक मला भेट म्हणूनही धाडले होते.

डॉ. दा. वि. कुलकर्णी यांचा प्रबंध कॉन्टिनेंटल प्रकाशन तर्फे प्रकाशित झाला. त्यांच्या पत्नी सौ. डॉ. अनुराधा कुलकर्णी यांनी मला वाटते. श्रीधराच्या काव्यावर झह.ऊ साठी प्रबंध लिहिला होता. डॉ. दा. वि. कुलकर्णी यांनी श्रीगुरूचरित्राचे हिंदी भांषांतर केले आहे. त्या उभयतांचा व माझा स्नेह अद्याप टिकून आहे. कारण आम्ही दोघांनी 'एकनाथी भागवता' वर प्रबंध लिहिला असल्याने आम्ही 'नाथांची लेकरे' आहेत आणि म्हणून आमच्यांत बहीण-भावाचे नाते निर्माण झाले आहे.

श्री. दासराम महाराजांचे वैशिष्ट्य म्हणजे त्यांच्या पत्नी सौ. सीताबाई यांना देवाज्ञा झाली त्या दिवशीही त्यांना पोहोचवून मंडळी परत आल्यावर त्यांनी रोजच्याप्रमाणे कीर्तन केले. त्यात खंड पडू दिला नाही. श्रीमामा महाराजांनी चालू केलेली कीर्तन परंपरा अव्याहत चालू आहे.

***

## प. पू. डोंगरे महाराज

प. पू. डोंगरे महाराज महाराष्ट्रीयन असून बडोद्यात वास्तव्य झाल्यामुळे ते गुजराथी व हिंदी भाषिकात श्रीमद् भागवत कथाकार प्रवचनकार म्हणून अधिक लोकप्रिय होते. चि. रमेशची १९८१ सालात मुंबईला बदली झाल्यापासून आम्ही मुंबईत जे. जे. हॉस्पिटलच्या कर्मचारी-निवासात राहात होतो. त्यामुळे ति. कुसूममावशी (जोग) कडे जाणे - येणे वाढले होते. तिला पू. डोंगरे महाराजांनी लिहिलेले भागवत-रहस्य हे गुजराती-हिंदी फार आवडे. तसेच तिच्या विहिणबाई सौ. कुंदाची आई यांनाही ते आवडत असे. मी तिच्याकडे गेले की दरवेळी पू. डोंगरे महाराज व भागवत याबद्दल ती भरभरून बोलत असे त्यामुळे मी ही माधवबागेतून तो ग्रंथ विकत आणून वाचू लागले. याशिवाय पू. डोंगरे महाराज श्रीराम कथाही फार सुंदर सांगत. त्याचे अंत:करण भक्तिरसाद्र असल्याने भागवत वा रामायणावर प्रवचन करताना ते स्वत: भक्तिरसात चिंब भिजून श्रोत्यांनाही भिजवून सोडत असत.

आम्ही परंड्याला श्रीं च्या पुण्यतिथीला जमलो की, प. पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती यांनी लिहिलेली 'मानस गूढार्थ चंद्रिका' ही बृहत् टीका छापली जावी म्हणून काय काय करावे याबद्दल चर्चा चालत असे. पू. स्वामी म्हणत की त्यांचे साहित्य प्रकाशित होण्यात अडथळे येणार आहेत आणि त्यांनी समाधी घेतल्यावर २५/३० वर्षानंतर ते कदाचित प्रकाशित होईल आणि मराठीच्या आधी कदाचित हिंदी टीकाच आधी प्रकाशित होईल. परांडे येथे त्यांनी मराठी टीकेचा हिंदी अनुवाद तर केलाच शिवाय त्या दोन्ही अनुवादांच्या प्रेसकॉपीही करून ठेवल्या होत्या. त्याच्या नशु प्रती काढणे आवश्यक होते. आम्ही ते काम हळूहळू हाती घेतले होते. असो. प्रथम असे ठरले की, लंकाकांडात (तुलसी रामायणात) जी ब्रह्मदेवकृत श्रीराम स्तुती आहे (दोहा १११) तिची फलश्रुति आहे 'मिटति कठीण जे कुअंक-भाला' म्हणून तिचे प्रत्येकाने जमतील तेवढे पाठ पू. स्वामींची टीका प्रकाशित व्हावी या हेतूने करावे. त्याप्रमाणे सर्वांनी पाठ सुरू केले होते.

सन १९८७ मध्ये परांड्यास उत्सवास जमलो होतो. तेव्हा प्रिय मंगलताई म्हणाली, की येत्या रामनवरात्रानंतर लगेच सांगलीला पू. डोंगरे महाराजांची श्रीराम कथा होणार आहे. त्या कथेचे संयोजक माझ्या ओळखीचे आहेत. तेव्हा आपण सर्व त्यावेळी सांगलीत त्यांना समक्ष भेटून आपल्या पू. स्वामींच्याबद्दल माहिती देऊ. पू. डोंगरे महाराजांसारख्यांना हे कळले तर आपोआप प्रचार प्रसार होईल. म्हणून श्री. श्रीराम गिल्डांनी व मी मुंबईहून यावे व श्री. आदिनाथ यादव यांनी बार्शीहून यावे व मंगला तर सांगलीत तिच्या मुलीकडे सौ. लता रानडेकडे येईलच. याप्रमाणे सर्व कार्यक्रम ठरला होता. रामनवमीच्या दिवशी रात्रीची माझी व गिल्डांची महालक्ष्मीची तिकिटे काढली होती आणि एकादशीची परतीची तिकीटे 'सह्याद्री' ची (ती रात्री उशिरा सुटे म्हणून काढलेली होती) त्यादिवशी (म्हणजे रामनवमीला) दुपारी मी बाराच्या सुमारास 'श्रीरामचरितमानस' वाचनास सुरूवात केली होती. मी मुंबईला आमच्या हॉलमध्ये बसून वाचत होते. सुंठवडा करून जवळ ठेवला होता व फुले आणि गुलालही घेऊन नेहमीप्रमाणे 'रामजन्म' साजरा करावयाच्या तयारीने बसले होते. बारा वाजले आणि मी 'भए प्रकट कृपाला –' ही मानसांतील स्तुति म्हणायला सुरूवात केली आणि आमच्या ओळखीचे पार्ल्याचे श्री. साळवी जे 'मफतलाल' मध्ये नोकरी करीत होते. ते हातात श्रीरामाची फ्रेम केलेली तसबीर, असोला नारळ वगैरे घेऊन घरात प्रवेश करते झाले. त्यादिवशी रविवार असल्याने मुले बाहेर खेळत होती त्यामुळे दार उघडेच होते. कोण आले म्हणून मी मान वर करून समोर बघते तर श्रीरामप्रभूच प्रत्यक्ष समोर! 'भए प्रकट कृपाला' म्हणताच खरेच प्रकटले होते!

हे कसे घडले बरे! मी कुठेतरी एक कॅलेंडर पाहिले होते. त्यावर श्रीराम, सीता, हनुमान आणि एक छोटी मूर्ती होती. मला ते खूप आवडले होते. ते मफतलाल कंपनीचे होते व त्यांचे चित्रकूटला मंदिर आहे. तेथल्या त्या मूर्ती होत्या पार्ल्याचे श्री. साळवी यांची काही निमित्ताने ओळख झाली होती. त्यांना मी कार्ड लिहिले की तुमच्या कंपनीचे असे कॅलेंडर निघाले आहे ते मला फार आवडले आहे. तरी कृपया पोस्टाने ते मला धाडून द्यावे. रामभैय्यांनी त्यांना काय प्रेरणा दिली ते राभैय्याच जाणोत! त्यांनी चक्क

फोटोफ्रेममध्ये बसवून व बरोबर असोला नारळ घेऊन पार्ल्याहून ते फोटोफ्रेम घेऊन श्रीरामनवमीला श्रीरामजन्माच्या वेळेला बरोबर त्यांनी आमच्या घरांत प्रवेश केला आणि त्या दिवशीपासून 'श्रीरामचरितमानसप्रेमी' मंडळाच्या कामाला इतकी गती मिळाली आहे ती अद्यापपर्यंत टिकून आहे. रामभैय्या पाठीराखा असल्याचा अनुभव इतकी वर्षे घेत आहे. असो.

त्या रात्री 'महालक्ष्मी' ने निघून आम्ही सांगलीला पोहोचलो. दुपारी श्री.आदिनाथही येऊन पोहोचले. मंगला तिच्या मुलीकडे होतीच दुपारी ४ ते ७ कथेची वेळ होती. सांगलीतील आमराई शेजारील मोकळ्या शेतजमीनीतच मोठा मांडव घातलेला होता. कमानी उभारलेल्या होत्या. बाहेर निरनिराळे स्टॉल लावलेले होते. आम्ही जेवून विश्रांती घेऊन ३॥ लाच बाहेर पडलो आणि गप्पा मारत चालत मांडवापर्यंत पोहोचलो. मंगला ओक तेथे आली होती. तिने आमची आणि संचालकांची ओळख करून दिली आणि आम्ही सर्व का आलो आहोत ते ही सांगितले. तेव्हा ते म्हणाले, 'पाहू या कसे काय जमते!' सातपर्यंत कथा असते. ती संपल्यावर महाराजांचे रोज काही अनुष्ठान वगैरे असते. तेव्हा त्यानंतर भेट घडविता आली तर पाहू! आम्ही एवढे बोलत होतो तोपर्यंत अचानक विजा चमकू लागल्या, गडगडाट होऊ लागला आणि वळीवाचा मुसळधार पाऊस कोसळू लागला. लोकांनी बैठकीवर बसून बत्तीस अक्षरी मंत्रास व भजनास सुरूवात केली होती. ४ वाजण्यास ५/७ मिनिटेच कमी होती तोवर इतका पाऊस कोसळला की लोक बसलेले उठून पळून कडेला जाऊन उभे राहिले. बैठका भिजून चिंब झाल्या. जेथे बैठक नव्हती तेथे काळी माती भिजून चिखल होऊ लागला. पावसाचे थांबण्याचे चिन्ह दिसेना. फक्त पू. डोंगरे महाराज आलेले नव्हते. नाईलाजाने संचालकांनी त्या दिवशीची कथा स्थगित केल्याचे व दुसऱ्या दिवशी सकाळी ९ वाजता कथा होईल असे जाहीर केले. पू. महाराज तर आलेच नव्हते. ती घोषणा ऐकून लोकही आपापल्या घरी जाऊ लागले. तेवढ्यात संचालक आमच्याजवळ येऊन म्हणाले, 'आपली गाडी बाहेर उभी आहे आणि कथा स्थगित झाल्याने पू. महाराजांनाही वेळ आहे तेव्हा तुम्ही सर्व लगेच जाऊन दर्शन घेऊ शकता!' आम्हाला काय वाटले ते सांगणे कठीण आहे. आम्ही लगेच बाहेर जीप

उभी होती. तिच्यात जाऊन बसलो आणि थोड्याच वेळात पू. महाराजांच्या निवासस्थानी पोहोचलो!

पू. डोंगरे महाराज मोठ्या हॉलमध्ये त्यांच्या आसनावर बसलेले होते. तेथे भारतीय बैठक होती. आम्ही तेथे गेलो तेव्हा आमच्याशिवाय तेथे कोणीच नव्हते. त्यामुळे आम्हांला निवांत बोलता आले. आम्ही त्यांना 'संतकृपा' तर्फे प्रकाशित झालेले श्रीं चे चरित्र, 'मानस गूढार्थ चंद्रिका–प्रस्तावना खंड' 'अभिनव रामायण' वगैरे जे प्रकाशित वाङ्मय होते ते भेट म्हणून दिले व प. पू. स्वामींच्या बद्दलही माहिती सांगितली. पू. स्वामींनी प्रायोपवेशन करून देह ठेवला हे कळल्यावर ते म्हणाले, 'तुम्ही सर्व भाग्यवान म्हणून तुम्हाला असे सद्‌गुरू लाभले. त्यांच्या चरणरजाचीही सर आम्हांला येणार नाही.' नंतर आम्हां सर्वांना खूप नामस्मरण करा असेही सांगितले. मी त्यांचे हिंदी व मराठी 'भागवत–रहस्य' वाचले होते. म्हणून मी त्यांना म्हटले, 'मला त्याचा मराठी अनुवाद करण्यास अनुज्ञा द्यावी.' तेव्हा ते म्हणाले, 'जरूर मराठी अनुवाद कर. पण त्यातही काही संक्षेप करता आला तर पहा. कारण हल्ली मोठमोठी पुस्तके वाचण्यास कुणाला वेळ नसतो आणि दुसरे असे की तू अनुवाद केलास तर आमच्या तर्फे प्रकाशित केला जाईल असे नाही. तेव्हा तसे काही मनात ठेवू नको.' मी म्हटले, 'ठीक आहे. मी तसे काही मनांत धरणार नाही.' मनांत म्हटले की, आपण अनुज्ञा दिली यातच सर्व काही आले. अशाप्रकारे जवळजवळ तासभर आम्ही तेथे होतो व परत नमस्कार करून तेथून घरी गेलो.

रात्री आमची चर्चा होऊन असे ठरले की, पू. डोंगरे महाराजांचे दर्शन घेऊन जे सांगावयाचे ते ही सांगून झाले आहे तर आता दुसऱ्या दिवशी सर्वांना इचलकरंजीस जावे व तेथे मंगलाताई ओकच्या ओळखीमुळे 'मानस गूढार्थ चंद्रिके' च्या छपाईसाठी आजीव सदस्य मिळाले तर पाहावे. त्यावेळी फक्त एक हजार रूपये आजीव सदस्य वर्गणी ठरली होती व असे २५/३० सदस्य मिळाले तर श्री. ना. वि. काकतकर 'मानस गूढार्थ चंद्रिके' चे खंड क्रमशः छापून देण्यास तयार झाले होते. मंगलाताई ओकचा जावई श्री. अविनाश रानडे याने त्याची गाडी देऊ केली होती. तेव्हा सकाळी लवकर इचलकरंजीस जावून दुपारी ३ ला त्याला गाडी हवी होती तेव्हा

दोनपर्यंत तेथून निघून यावे असे ठरले होते.

त्याप्रमाणे आम्ही दुसऱ्या दिवशी सर्व इचलकरंजीस गेलो. दुपारी १२ पर्यंत ठिकठिकाणी हिंडले! तेथे श्रीराम गिल्डांचे एक मारवाडी स्नेही भेटले. त्यांच्याकडे त्यांनी आग्रहाने जेवायला थांबवून घेतले. नंतरही काही ठिकाणी जावयाचे होते. पण चि. अविनाशला गाडी हवी होती. म्हणून श्री. आदिनाथ आणि मी गाडीतून परत सांगलीस आलो. श्री. श्रीरामजी व मंगलाताई इचलकरंजीस आणखी काही लोकांना भेटून परत येणार असे ठरले होते. श्री. आदिनाथ व मी सांगलीस आलोच होतो तेव्हा आम्ही विचार केला की, आता काल कथा ऐकता आली नाही तर आज तरी ऐकावी म्हणून आम्ही चार वाजता मंडपाकडे गेलो. कथा नुकतीच सुरू झाली होती. ते पुरूषांमध्ये व मी स्त्रियांमध्ये जाऊन बसले. कथा ऐकताना वेळ कसा गेला हे कळलेच नाही. ७ वाजायला आले म्हणून आता कथा संपेल व गर्दीमुळे एकमेकांची गाठ पडणे मुश्किल होईल म्हणून आम्ही एकमेकांस खूण करून मंडपाबाहेर पडलो. मग श्री. आदिनाथ म्हणाले की, आपण पू. डोंगरे महाराज ज्या द्वारांतून बाहेर पडतात तेथे जाऊन उभे राहू या आणि ते तेथे येऊन गाडीकडे जाऊ लागले की त्यांना प्रणाम करून निरोप घेऊ या म्हणून आम्ही मांडवाच्या मागे जाऊन ज्या रेडकार्पेटवरून ते येणार होते त्याच्या टोकाशी दरवाजाजवळ जाऊन उभे राहिलो. तेवढ्यात कुणी तरी येऊन श्री. आदिनाथच्या शर्टाची कॉलर पकडली. आम्हाला वाटले आम्ही तेथे मध्ये घुसलो म्हणून आता काही ऐकावे लागणार की काय? पण तेवढ्यात ते गृहस्थ म्हणाले, 'अहो! तुम्हा होतात तरी कुठे? आम्ही सकाळपासून तुमचा शोध घेत आहोत. तुम्ही कुठे उतरला आहांत? तुमची नांवे काय? काहीच आम्हांला माहित नव्हते. पू. महाराजांनी तुमच्यासाठी वेळ दिला आहे. आता कथा संपल्याबरोबर त्यांनी मुद्दाम भेटायला बोलावले आहे. परंड्याच्या मंडळींना बोलावून घ्या असे सांगितले आहे. तेव्हा आम्हांला इतका आनंद झाला की ते सांगता येत नाही! मग आम्ही स्वागत कमानीकडे निघालो आणि आत्ता मंगला आणि श्री. श्रीरामजी केव्हा येतात कुणास ठाऊक आणि त्यांना आपल्याला पू. महाराजांनी बोलावले आहे हे कसे कळणार असे म्हणत

आहोत तोपर्यंत ती दोघे समोरून आली. लगेच आम्ही त्यांना पू. महाराजांनी आपल्यासाठी मुद्दाम वेळ दिल्याचे सांगितले. तेव्हा त्यांनाही आनंद झाला. मग त्यांच्याकडून कळले की ती दोघे ज्या व्यापाऱ्यास भेटावयास गेली होती तेथेचे माझे जावई श्री. श्रीकृष्ण अभ्यंकर कामासाठी आले होते. त्यामुळे त्यांना येताना त्यांची गाडी मिळाली होती आणि त्यांना चि. भय्या साहेबांनी मांडवाशीच सोडले होते. असो. आम्ही रिक्षा करून पू. डोंगरे महाराजांच्या निवास स्थानी पोहोचलो.

पू. डोंगरे महाराज नुकतेच येऊन आसनस्थ झाले होते. आमच्यासाठीच वेळ दिला होता. त्यामुळे इतर कोणी विशेष तेथे नव्हते. आम्ही नमस्कार करून समोर बसलो. श्री महाराज फार प्रसन्न होते. त्यांनी विचारले 'पू. स्वामींचे चरित्र कोणी लिहिले आहे?' इतरांनी माझेकडे निर्देश केला तेव्हा मी परत एकदा प्रणाम केला. ते म्हणाले, 'छान लिहिले आहेस! मला एकच विचारायचे आहे की, तू श्रीरामाशी भावाचे नाते कसे काय जोडलेस?' मी म्हटले की, 'माझ्या सद्‌गुरूंनी सांगितले म्हणून आणि शिवाय आपण त्यांना दीनबंधुही म्हणतोच. शिवाय द्रौपदीनेही त्यांना बंधु मानले होतेच ना!' एवढे बोलत असतानाही माझे अंत:करण भरून येऊन डोळ्यांतून अश्रु वाहू लागले. इतक्यात पू. महाराज म्हणाले, 'ठीक आहे! मला काही जास्त कळते असे नाही. परंतु मला असे वाटते की, 'द्रौपदीची गोष्ट वेगळी आहे. ती याज्ञसेनी (यज्ञातून प्रकट झालेली) होती, अयोनिजा होती, दिव्य होती! तिची बरोबरी कशी करता येईल. सामान्यजनांना दास्यभावच बरा. ह्या सख्य भावात भगवंताशी अधिक सलगी होते असे मला आपले वाटते!' एवढे बोलून ते गप्प बसले पण सर्व ऐकता ऐकता मला मात्र रडू आवरेना!

थोड्यावेळाने त्यांनी विचारले की, 'परंड्याला पू. स्वामींना रोज अन्नाचा नेवैद्य होतो कां?' आम्ही सांगितले की, 'रोज अन्नाचा नेवैद्य होत नाही. उत्सव असेल तेव्हा होतो. रोज दूध, साखर, फळे असाच नेवैद्य असतो.' ते म्हणाले, 'श्री ठाकुरजींची आज्ञा झाली आहे की, रोज तेथे अन्नाचा नेवैद्य, थोडेफार अन्नदान व्हावे. जर तुम्हाला असे केले की वर्षातून एक-दोनदाच जेवायला द्यायचे तर चालेल का?' मग ते म्हणाले, 'तुमच्या संस्थेला दरमहा ६०० रूपये धाडण्यांत येतील.' त्या दिवशी एकादशी

होती. 'येत्या हनुमान जयंतीपासून अन्नाच्या नेवैद्याची व्यवस्था व्हायला हवी, होईल ना? या महिन्याचे पैसे आत्ता घेऊन जा.' यावर श्री. आदिनाथ हात जोडून म्हणाले की, 'हो, हनुमानजयंतीपासून व्यवस्था होईल.' कारण ते बार्शीला जाणार होते. पण श्री. श्रीरामजींचे व माझे त्याच रात्रीचे 'सह्याद्री' चे तिकीट होते. त्यामुळे आम्हाला त्याच रात्री तेथून निघावयास हवे होते. आम्ही म्हटले, 'श्री. आदिनाथराव उद्या येऊन भेटतील.' श्री. महाराजांना लगेच दोघा तिघा व्यापाऱ्यांची नांवे घेऊन आमच्या समोरच त्यांना वर बोलावून घेतले आणि म्हणाले, 'अरे ठाकुरजींची आज्ञा झाली आहे तेव्हा ह्यांच्या मंदिरासाठी दरमहा ६०० रूपये धाडण्याची व्यवस्था करा आणि ह्या महिन्याचे पैसे लगेच उद्या यांना द्या. तुम्हाला काही कमी पडणार नाही.' त्यांनी लगेच प्रणाम करून 'होय महाराज!' म्हटले. एवढे झाल्यावर पू. महाराजांची आज्ञा घेऊन आम्ही तेथून निघालो. मी म्हटले मनांत, की आम्ही कशी कां होईना जी सेवा केली आहे ती रामभैय्यांनी मान्य केली असणार आणि म्हणूनच श्री. ठाकुरजींनी आज्ञा केली असणार! या विचाराने त्या रात्री प्रवासंतही माझे अंत:करण सारखे भरून येत होते आणि डोळ्यातून अश्रु झरत होते. नंतर श्री. आदिनाथ यांच्याजवळ पैसे देण्यात आले आणि लगेच हनुमान जयंतीपासून अन्नाचा नेवैद्य होईल अशी सोय करण्यात आली. जेव्हा मिरजेला गोरे मंगल कार्यालयात शिबीर झाले होते तेव्हा मठात खोल्या बांधल्या जाव्यात म्हणून निधी करावयाचे ठरले होते. त्याचप्रमाणे पैसे जमून त्यावेळी फक्त १५ हजार रूपयांत तीन खोल्या बांधण्यात आल्या होत्या. आता नेवैद्याची व्यवस्था झाली व पुढे आणखी बोअरवेल, पाण्याचा हौद, विजेचा पंप, मागे मोठे स्वयंपाक घर व २ संडास, २ मोऱ्या व नंतर मागील बाजूस आणखी दोन खोल्या, ध्यान मंदिर, बाथरूम वगैरे बरेच काम श्रीसद्गुरू कृपेने घडले. श्री. अन्नछत्रे यांच्या औदार्याने सर्वत्र फरशी झाली. त्यामुळे सर्व उत्सव मठातच होऊ लागले. मग मठात लग्नकार्ये होवू लागली. एखादे बिऱ्हाड ठेवले गेले तर भाडेही मिळू लागले. आता तर गांवातील लोकांनी लक्ष घालून तिन्ही समाधी मंदिरांचेही जीर्णोद्धार झाले आहेत. पू. डोंगरे महाराज यांनी केलेल्या व्यवस्थेप्रमाणे 'हंस मंडळा' कडे अनेक वर्षे मानधन येत आहे.

पुढे बार्शी, पुणे येथे पू. डोंगरे महाराज यांच्या कथा झाल्या तेव्हा त्यांनी मानधन वाढवून दिले होते. पुणे येथे आमच्या गुरू बंधुभगिनी दर्शनास गेल्यावर त्यांनी श्री. श्रीरामजींची व माझी आठवण काढून चौकशी केली होती. म्हणून आम्हाला फोन आल्यावरून आम्ही दोघे मुंबईहून मुद्दाम पुणे येथे गेलो होतो. तेव्हा ते श्री. धूत यांच्याकडे उतरले होते. आम्ही सर्व मंडळी दर्शनास गेल्यावर इतर कुणास सोडू नये असे त्यांनी सांगितले आणि 'हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे, हरे राम हरे राम राम राम हरे हरे' या बत्तीस अक्षरी मंत्राचा रोज सर्वांनी जप करावा व तसा प्रचारही करावा असे सांगितले होते. म्हणून मंडळाने तशी पत्रिकेही छापून वाटली होती. त्यांनी पू.स्वामींच्या 'मानस गूढार्थ चंद्रिके' मधील 'नामवंदना' स्वतंत्र पुस्तकरूपाने छापावयास सांगितली होती. म्हणून त्याची छपाई ताबडतोब करून औरंगाबाद येथे पू.डोंगरे महाराजांची कथा असताना तेथेच त्या ग्रंथाचे प्रकाशनही पू. डोंगरे महाराजांच्या हस्ते करण्यात आले. श्री. आदिनाथ व श्री. श्रीरामजी त्यावेळी उपस्थित होते. यानंतर पू. डोंगरे महाराज समाधीस्थ झाल्याने परत दर्शनाचा योग येऊ शकला नाही.

***

## पूज्य मुरारीबापू

पूज्य मुरारीबापूंची श्री रामकथा कल्याणला होती. म्हणून प्रिय भाऊंनी मला मुद्दाम त्यांच्या घरी राहण्यास बोलावून घेतले होते. तसेच लातूरहून त्यांची मोठी बहीण व धाकटा भाऊ ही त्यांच्याकडे या कथेसाठी आलेली होती. आम्ही सकाळी लवकर आवरून जेवणाचे डबे घेऊन ठाकुरली स्टेशनला जाऊन तेथून लोकलने कल्याणला जात असू. सकाळी ९ ला कथा सुरू होत असे ती बारापर्यंत चाले व दुपारी ३ ला सुरू होई ती संध्याकाळी ६ पर्यंत चाले. आम्ही घरून निघताना नाश्ता करून येत असू. दुपारी तेथे मंडपातच डब्यातून आणलेले जेवण करून तेथे मांडवातच विश्रांती घ्यायचो व परत दुपारी २।२। ला उठून बाहेर स्टॉलवर चहा, सरबत वगैरे हवे ते घेऊन परत श्रवणास बसायचे व एकदम संध्याकाळी कथा संपल्यावर लोकलने घरी यावयाचे. यातच एक दिवस मुद्दाम आम्ही



सर्व पू. मुरारीबापू जेथे राहात होते तेथे त्यांच्या दर्शनास गेलो. ते रोज संध्याकाळी कुठेही असले तरी हवन करीत असत. तसेच आम्ही असेही ऐकले की, ते गंगाजलाशिवाय कुठलेही पाणी पित नाहीत आणि जेथे ते भिक्षेला जातात तेथेही त्यांचे अन्न सर्व गंगाजलात शिजविलेले असते. असो.

ते आमच्याशी खूप मोकळेपणाने बोलले. विशेषत: श्री. श्रीरामजींनी त्यांना प.पू.स्वामींच्याबद्दल सर्व माहिती सांगितली. त्यांनी श्रीरामचरित-मानसालाच आपले जीवन कसे वाहून घेतले होते, मराठी अनुवाद समवृत्त-समच्छंद केला असून, मराठी व हिंदीत भाष्य लिहून मुद्रणप्रतही करून ठेवली आहे वगैरे ऐकून ते खूप प्रभावित झाले कारण त्यांनीही त्यांचे जीवन 'श्रीरामचरितमानसा' सच वाहून घेतलेले आहे. त्यांनी या टीकेच्या प्रकाशनार्थ आपली कथाही देऊ केली होती. पण त्यांची कथा आयोजित करणे आमच्या आवाक्याबाहेरचेच होते. पण या निमित्ताने त्यांच्याशी उत्तम परिचय झाला आणि परिणामी त्यांची रामकथा मुंबईत कुठे असली की आम्ही दर्शनास जाताच ते संचालकांना आमच्यासाठी ताबडतोब पास देण्यासाठी आठवणीने सांगत. पू. मुरारीबापूंच्या अंतरंग भक्तात लातूरचे

बरेच भक्त होते व श्री. श्रीरामजी गिल्डाही लातूरचे होते. त्या सर्वांनाही पू. मुरारीबापूंची आणि भाऊंची जवळीक पाहून आश्चर्य आणि आनंद वाटत असे.

मुंबईत पू. बापूंची कथा वर्षातून एक-दोनदा तरी होई. तेव्हा त्यांच्या कथेच्या श्रवणाचा लाभ होत असे. शिवाय त्यांच्या निवासस्थानी जाऊनही आम्ही त्यांचे दर्शन घेत असू. अशाप्रकारे आमच्यात प्रेमामुळे विशेषत: 'मानसा' वरील प्रेमामुळे जवळीक निर्माण झाली. प्रिय भाऊ, सौ. भाभी यांच्याबरोबर मी श्री गुरूपौर्णिमेसाठी महुआ येथेही गेले होते. अगदी पहिल्याने गेलो होतो तेव्हा नविन ओळख असल्याने आम्ही शाळेच्या इमारतीत उतरलो होतो. सर्व कार्यक्रमात भाग घेतला होता व दुसऱ्या दिवशी चित्रकूट धाममध्ये जाऊन दर्शन घेतले तेव्हा जरा कमी गर्दी असल्याने जरा जास्त जवळून दर्शन, आशीर्वाद वगैरे होऊ शकले. नंतर एकदा परत मुंबईला कथा होती. तेव्हा दर्शनास गेलो असता मी त्यांना राखी दिली. त्यावेळपासून दरवर्षी मी त्यांना राखीपौर्णिमेस राखी धाडत असते. कमीत कमी २० वर्षे झाली आहेत. या भावा-बहिणीच्या नात्याचा पू. मुरारीबापूंनीही स्वीकार केला आहे. ही भाग्याची गोष्ट आहे.

आम्ही दोघे (ति. भाऊ व मी) परत एकदाही महुआला गेलो होतो त्यावेळी 'गुरूकुल' मध्ये उतरलो होतो. त्यावेळी श्री. शाम बियाणी, लातूर यांच्या कुटुंबातील स्त्रियाही होत्या. त्यांच्या खोलीत मी राहिले होते. ति. भाऊ तर दोनदा महुआला साधनेसाठी जाऊन राहिले होते. त्यामुळे ते पू. मुरारीबापूंच्या फार जवळ पोहोचले होते. त्यांच्यामुळेच पू. मुरारीबापूंकडून परंडा येथील राममंदिरातील श्रीराम, सीता, लक्ष्मण आणि हनुमान यांच्या मूर्तींसाठी देणगी मिळाली आणि त्या विग्रहांची प्राण प्रतिष्ठाही पू. मुरारीबापूंच्या हस्ते होऊ शकली. श्री विग्रह तर जयपूरहून २००२ सालीच तयार होऊन आले होते. पण श्रीरामादिंची प्राणप्रतिष्ठा मात्र प. पू. बापूंच्या शुभहस्ते २८ मार्च २००३ शुक्रवार फाल्गुन वद्य एकादशीस सकाळी १० वाजून ४४ मिनिटांनी श्रीरामविश्रामधाममध्ये झाली. त्यावेळी प्रतिष्ठापना झाल्यावर प. पू. मुरारीबापूंनी माझ्याकडून राखी बांधून घेतली. औक्षण करून घेतले, खडीसाखर मी दिलेली खाल्ली, एवढेच नव्हे तर दृष्टही काढून घेतली ही रामभैय्याचीच कृपा होय! त्या मंदिरात 'श्रीरामचरितमानसा' तील

मंगलाचरणाचे व उपसंहाराचे श्लोक व काही चौपाया दोहे हिंदीमध्ये कोरलेल्या फरशा बसविलेल्या आहेत. म्हणून ते एकप्रकारे 'मानसमंदिर' ही झाले आहे. प. पू. मुरारीबापू म्हणतात की, 'पू. स्वामीजी समाधिस्थसे भी मानसस्थ ही है!फ

पू. मुरारीबापूंना अद्यापही राखी व त्याबरोबर पत्रही जाते. एकदा मी त्यांना जनाबाईंच्या अभंगातील नामदेवांबद्दल आणि त्यांच्या स्वत:बद्दलचा मजकूर पत्रात लिहिला होता की कृतयुगात जे प्रल्हाद होते तेच त्रेतामध्ये अंगद झाले, तेच द्वापारात उद्धव होते. तेच आता नामदेव झाले आहेत आणि मी कृतयुगांत प्रल्हादांची दासी पद्मिनी होते, त्रेतामध्ये मंथरा आणि द्वापारांत कुब्जा होते, तीच आता नामदेवांची दासी जनी म्हणून आले आहे. श्रीरामचरितमानसात अंगदांनी इच्छा व्यक्त केली होती की, प्रभूनी त्याला सदैव आपल्याजवळ ठेवून घ्यावे पण त्यावेळी त्याला किष्किंधेचा युवराज केला होता म्हणून समजूत घालून त्याच्या मनाविरूद्ध परत किष्किंधेला धाडले होते. पण त्याची जी इच्छा होती की भगवंताचे सानिध्य नित्य लाभावे ती द्वापारयुगात त्याला उद्धव करून पूर्ण केली. पू. मुरारीबापूंनी नाशिकच्या कथेत म्हटले की, 'आजही बहेनजीका पत्र आया है और उसमें..... ऐसा ऐसा लिखा है की, जो प्रल्हाद, अंगद, उद्धव हुए थे वे ही कलियुगमें नामदेव बनकर आये थे ।' त्यांनी हे कथेत सांगितल्यावर मला नाशिकहून फोन आला होता एका गुरूभगिनीचा की, पू. बापूंनी आज कथेत असे सांगितले. ते ऐकून मला खरेच खूप आनंद झाला होता.

***

## प.पूज्य श्री. किशोरजी व्यास उर्फपू. स्वामी गोविंददेवजी गिरी

मला वाटते १९९० च्या चातुर्मासांतील गोष्ट असावी. श्री. श्रीरामजी व सौ. भाभी गिल्डा चातुर्मासात साधना करण्यासाठी आळंदी येथील माहेश्वरी धर्मशाळेत जाऊन राहिली होती. तेथे त्यावेळी नदीपलिकडे चैतन्याश्रम येथे राहात असणाऱ्या प.पू. श्री. किशोरजी व्यास यांच्याशी परिचय झाला. श्री. किशोरजी व्यास त्यावेळी पू. डोंगरे महाराजांच्या प्रमाणे भागवत कथाकार म्हणून प्रसिद्ध पावले होते. त्यांना जेव्हा कळले की श्री. भाऊ

(गिल्डा) व सौ. भाभी ही ब्रह्मलीन प.पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती यांची अनुग्रहीत आहेत तेव्हा त्यांना फार आनंद झाला व त्यांच्या विषयी आत्मीयताही वाटली. कारण ते पूर्वीच प.पू. प्रज्ञानानंद सरस्वती स्वामींचा 'संध्योपासना' हा ग्रंथ वाचून प्रभावित झाले होते व परंडा येथे जाऊन त्यांचे दर्शन घ्यावे असेही त्यांना वाटले होते. म्हणून त्यांनी श्री. आदिनाथ यादव यांना पत्रही लिहिले होते. तेव्हा त्यांना कळले होते की एक महिन्यापूर्वीच प्रायोपवेशन करून पू. स्वामी समाधिस्थ झाले होते.

नंतर श्री. श्रीरामजींच्या कडून त्यांना पू. स्वामींच्याबद्दल इतर सर्व माहिती ही कळली व कदाचित त्यांनी संतकृपेतर्फे प्रकाशित झालेले श्रींचे चरित्रही वाचले असावे. आम्ही पू.स्वामींची बृहत् मानस टीका छापली जावी यासाठी प्रयत्नशील आहोत हे कळल्यावर त्यांनी त्यांची एक श्रीमत् भागवत कथा यासाठी देण्याची इच्छा व्यक्त केली. श्री. श्रीरामजींना आनंद झाला. त्यांनी श्री. आदिनाथ यांना, मला व इतर पुण्यातील सौ. कावेरीताई अन्नछत्रे, श्री. अन्नछत्रे, डॉ. कल्याण काळे वगैरेंना ही गोष्ट कळवली. पुण्यातील मंडळी पू. किशोरजी व्यासना जाऊनही भेटली. विशेष म्हणजे त्याच वर्षी नोव्हेंबर मध्ये बार्शी येथे त्यांची श्रीभागवत कथा होती. त्यावेळी मी श्रीरामचरित मानस प्रेमी मंडळाची अध्यक्ष होते व श्री. आदिनाथ चिटणीस होते. म्हणून त्यांच्या कथेचे आयोजन करण्यापूर्वी आम्ही त्यांची कथा ऐकावी अशी इच्छा त्यांनी व्यक्त केली.

त्या वर्षी आषाढात जुलैमध्ये माझ्या धाकट्या जावयांना देवाज्ञा झाली होती आणि ऑक्टोबर मध्ये मंगलाताई ओकने आणि मी दक्षिणभारताच्या यात्रेवर जावयाचे ठरविले होते. आम्ही यात्रेवरून परत येतांना योगायोगाने दिनांक २ नोव्हेंबरला आमची परतीची गाडी सोलापूर, कुर्डुवाडी वरून मुंबईकडे जाणार होती. म्हणून आम्ही सोलापूर किंवा कुर्डुवाडीला उतरून बार्शीला कथाश्रवणासाठी तेथे राहावयाचे व परांड्यास श्रीसद्गुरुंच्या दर्शनाने यात्रेची सांगता करायची असे ठरविले. श्री. आदिनाथ आम्हाला उतरवून घेण्यासाठी सोलापूरला आले होते. पण यात्रा कपंनीतर्फे आम्ही गेलो होतो व सर्वांचे एकच तिकीट असते व सोलापूरला गाडी ज्या प्लॅटफॉर्मला लागली होती तेथून बाहेर पडायच्या गेटपर्यंत येवून आम्हांला

टी.सी. ला सांगून बाहेर जाऊ देऊन परत गाडी गाठणे यात्रेच्या मॅनेजरना अशक्य होते म्हणून कुर्डुवाडीला एकच प्लॅटफॉर्म असल्याने हे सहज जमणे शक्य होते म्हणून आम्ही कुर्डुवाडीला उतरलो व मग श्री. आदिनाथ बरोबर बार्शीला गेलो. दुसऱ्या दिवशी दुपारी



कथेला आरंभ होणार होता. म्हणून आम्ही सकाळी परंड्यास श्रींच्या समाधीच्या दर्शनासाठी गेलो होतो. तेव्हा कळले की परंड्यात श्रींचे सान्निध्यात राहाणारे आमचे गुरुबंधु श्री. वासुनाना आरे यांना आदले दिवशी अचानक तब्बेत बिघडल्याने बार्शीला डॉ. नेने यांच्या हॉस्पिटलमध्ये ॲडमिट केले होते. आम्ही दर्शन घेऊन लगेच बार्शीला परतल्यावर डॉ. नेने यांच्या हॉस्पिटलमध्ये चौकशी केल्यावर कळले की त्यांना देवाज्ञा झाल्याने परंड्याच्या लोकांनी त्यांना नरसिंगपूरला (जि. सांगली) नेले होते त्यांच्या घरी! ऐकून वाईट वाटले पण काही इलाज नव्हता. आम्ही श्री. आदिनाथच्या घरीच उतरलो होतो. तेथे जेवण करून विश्रांती घेऊन दुपारी ४.०० च्या सुमारास कथेच्या स्थानी गेलो.

४.०० वाजतां श्री. पू. किशोरजी व्यास आले आणि कथेला आरंभ झाला. मला वाटते बार्शीजवळील कासारवाडी येथील वेदमूर्ती श्री. काळे उद्‌घाटनास आले होते. त्यांच्यावर वै. पू. डोंगरेमहाराजांची कृपा झालेली होती व त्यांनी वेदपाठशाळाही काढली होती. असो. चि. रमेश, बेळगांव येथे मेडिकल कॉलेजमध्ये शिकत असताना आम्ही काळी आमराई या भागांत राहात होतो. तेथे जवळच श्री. घाणेकर राहात होते. त्यांच्या

घराण्यावर गोंदवल्याच्या श्री ब्रह्मचैतन्य महाराजांची कृपा होती. त्यांनी स्वत: दिलेल्या पादुका त्यांच्या घरी होत्या. त्या चांदीने मढवलेल्या होत्या व देवघरातच छोटा कळस असलेले मंदिरच बनवले होते व त्यात त्या पादुका विराजमान केल्या होत्या व त्यांची निष्ठेने आणि प्रेमाने उपासना केली जाई. चि. रमेश व मी बेळगावला राहायला गेल्यावर तो कॉलेजात जाई आणि मी घरातली कर्तव्ये करून पी.डी. चा अभ्यास करीत असे. पण रोज दुपारी ३.० ते ५.०० आम्ही ७–८ बायका श्री. घाणेकरांकडे जमून रामायण पारायण, पू. गोंदवलेकरांच्या चरित्राची पारायणे, नाम सप्ताह वगैरे उत्साहाने करीत असू. जेव्हा प.पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती होते व मी त्यांना मी भागवत वाचू शकते कां असे विचारले होते व त्यांनी अनुमतीहि दिली होती. ह्यांच्या आत्याबाईंचे यजमान श्री. पटवर्धन हे धार्मिक वृत्तीचे होते व मामलेदारही होते. ते व ह्यांच्या आत्याबाईही लवकर देवाघरी गेली होती. त्यांच्या मुलाचे म्हणजे शांताराम बापूंचे पालनपोषण त्यांच्या दोन मावशांनी, मामांनी (म्हणजे माझे सासरे) यांनी केले होते. त्यांची धार्मिक पुस्तके श्री. शांतारामबापूंनी मला दिली होती. त्यांत वाल्मिकी रामायणाच्या मराठी भाषांतराचे दोन खंड व एक संपूर्ण भागवताचे मराठी भाषांतर हा ग्रंथ होता. मी बेळगावला काळ्या आमराईत राहात असतांना रोज दुपारी ३.०० ते ५०० ते भागवत भाषांतर वाचत असे. असे संपूर्ण वाचन होण्यास जवळजवळ दीड वर्ष लागले. पण प.पू. किशोरजी व्यास किंवा प.पू. स्वामी तेजोमयानंदजी यांच्या मुखातून भागवत ऐकतांना जो रसास्वाद, जो परमानंद मिळाला तो अवर्णनीय होता. त्यावेळी जो भाव निर्माण होई त्यामुळे देहाचा विसरच पडत असे. केवळ आनंद, आनंद आणि आनंदच!

त्यामुळे बार्शीला त्या भागवत सप्ताहात जो आनंद मिळाला तो कसा वर्णन करणार? 'सत्संगति दुर्लभ संसारा ' हेच खरे! ग्रंथातील शब्द वाचून होणारा परिणाम आणि तेच संतमुखाने ऐकल्यावर होणारा परिणाम यात जमीन अस्मानाचे अंतर असते!! भजन, नामसंकीर्तन सुरू झाले म्हणजे तर शरीरातील कण आणि कण नाचू लागतो, शरीरावर ताबाच राहात नाही. मन इतके तल्लीन होते की आपण कोण आहोत, कुठे आहोत, लोक काय म्हणतील वगैरे काही भानच राहात नाही आणि रासपंचाध्यायी ऐकतांना

तर काय अवस्था होत असे ते एक रामभैय्याच जाणोत! पू. किशोरजी व्यासांचा भागवत सप्ताह आम्हाला खूप आवडला. परमानंद देऊन गेला! त्यांना काय वाटले ते तेच जाणोत! त्यांच्या सप्ताहांतच एक दिवस त्यांना घेऊन रात्री आम्ही परंड्यासही जाऊन श्रींचे दर्शन घेऊन आलो. त्यांची कित्येक वर्षांची इच्छा पूर्ण झाली होती. त्यांना खूप आनंद झाला.

कथा घ्यायची हे तर ठरले. नंतर निधी गोळा करण्यासाठी आणि जागा ठरविण्यासाठी प्रिय भाऊ (गिल्डा) आणि मी खूप हिंडलो. निरनिराळ्या लोकांना, संस्थांना भेटलो. मुख्य म्हणजे श्री. नारायणदासजी मानुधना जे त्यावेळी मुंबई माहेश्वरी समाजाचे अध्यक्ष होते त्यांची फार मोलाची मदत झाली. मालाडला आदर्श दुग्धालय लेनच्या जवळ मोठे मैदान होते. तेथे कथा करावयाचे ठरले. मालाडच्या माहेश्वरी समाजातील अनेक सदस्यांची गांठभेट धेऊन त्यांचे सहकार्य मिळावे म्हणून प्रयत्न केले. ते सगळे व्यापारी सकाळी दुकानात गेले की एकदम रात्री येत. त्यामुळे रात्री ९.०० नंतर सभा भरून विचारविनिमय होई. त्यामुळे रात्री मालाडला मुक्काम करावा लागे. मिटींग बहुतेक श्री. गणेशलालजी भराडियांच्या घरी होई. तेथेच रात्रीचे जेवण असे. मिटींग झाल्यावर मला



मालाडमध्ये आमची गुरुभगिनी सौ. शीला मोने कडे सोडून श्री. भाऊ यांच्या ओळखीच्या मारवाडी बंधुकडे झोपायला जात. तेथून ते पहांटे उठून डोंबिवलीस जात व मी पहांटे चहा घेऊन सौ. कुसुमकडून निघून चालत मालाड स्टेशनवर जाई आणि बहुतेक वेळी बोरीवली येथे जाणाऱ्या लोकलने बोरीवलीस जाऊन तीच लोकल परत जाई म्हणून तिच्यात बसून राहून ती परत भायखळा स्टेशनवर आली की उतरून टॅक्सीने घरी जे.जे. च्या क्वार्टर्समध्ये जाई. असे किती हेलपाटे आम्ही घातले हे आता आठवत नाही. त्या निमित्ताने श्री. गणेशजी भराडिया व सौ. राजकमल भाभींशी जो स्नेहसंबंध जुळून आला आहे तो रामभैय्याच्या कृपेने अजून टिकून आहे. त्यांच्या घरी माझी माहेरवाशिणीसारखी प्रेमाने बडदास्त राखली जाई. खरोखर रामभैय्याच्या कृपेने ज्यांच्याशी आयुष्यात संबंध आला, त्यांनी इतके अपार प्रेम माझ्यावर केले आहे की काय सांगावे? एकनाथी भागवताच्या अभ्यासाने मनांत हे पूर्ण ठसले होते व आहे की ध्यानाभ्यासाने अगदी निर्विकल्प समाधिपर्यंत प्रगती झाली तरी जोपर्यंत सर्वांभूती भगवद्भाव दृढ होत नाही तोपर्यंत सर्व व्यर्थ होय! म्हणून तसा तो सदैव टिकून राहावा अशी श्रीरामभैय्याच्या आणि श्रीसद्गुरूंच्या चरणी सतत प्रार्थना असते. रामभैय्या शिवाय दुसरी वस्तूच अस्तित्वात नाही, 'मी म्हणून कुणी नाहीच असा अनुभवही श्रीसद्गुरूकृपेने आला होता.' त्यामुळे सर्वांच्या माध्यमांतून रामभैय्याच माझी काळजी घेत असतात अशी माझी दृढ निष्ठा आहे.

असो. मालाडची ब्राह्मणसभा आहे तेथे आमची सर्वांची उतरण्याची, राहाण्याची व्यवस्था केली होती. श्री. भराडिया राहात होते त्याच बिल्डींगमधील पहिल्या मजल्यावरील एक ब्लॉक रिकामा होता. तेथे प.पू. आचार्य किशोरजी व्यास यांच्या राहाण्याची व्यवस्था केली गेली. आमच्या जवळ 'श्रीरामचरितामनस प्रेमी मंडळा' तर्फे सदस्यांकडून गोळा करण्यात आलेले सदस्य मूल्य म्हणून जमा झालेले फक्त ३०/३५ हजार रूपये हाताशी होते आणि ७ दिवस मांडव घालण्यासाठीच ते सर्व खर्च होणार होते. पैसा उभा करण्यासाठी स्मरणिका काढावयाचे ठरले. त्यास जाहिराती मिळाव्या म्हणून भाऊ व मी कुठे कुठे हिंडलो! दोन तीन वेळां स्टॉक

एक्चेंजमध्येही मी गेले होते त्यांच्या बरोबर. याशिवाय रामभैय्याच्या कृपेने जे परिभ्रमण झाले ते सुफळ संपन्न झाले हे तर खरेंच! याशिवाय सर्व गुरूभगिनींना विनंती करण्यात आली की, श्रीमद् भागवत कथेच्या संहिताचे पारायणासाठी ब्राह्मण बसविण्यात येतील त्यासाठी अडीच हजार रूपये भरून प्रत्येकाने यजमानपद स्वीकारावे, म्हणजे निधी गोळा होईल. त्याप्रमाणे २०/२५ गुरूभगिनींनी निधी जमवला व इतरही अनेकांनी साहाय्य केले. परम पूज्य स्वामी तेजोमयानंदजींनी २/३ यजमान मिळवून दिले व श्रीमत् भागवत कथा नक्की यशस्वी होईल असा आशीर्वादही दिला होता.

तारखा ठरल्या, स्थळही ठरले आणि श्री. श्रीरामजी गिल्डा, श्री. आदिनाथ यादव आणि मी असे आम्हा सर्वांना वाटले की परत एकदा पू. किशोरजी व्यास यांच्याशी काही गोष्टी स्पष्ट बोलाव्या म्हणून आम्ही आळंदीला गेलो तर ते त्यावेळी पुण्यास त्यांच्या मोठया बंधुंच्या घरी आहेत असे कळले. स्टेशनजवळच ते राहात होते तेथे आम्ही गेलो. त्यांना वंदन करून बसलो आणि मग त्यांना सांगितले की, आमच्या मंडळाची स्थिती अशी आहे की आमच्याकडे जो निधी आहे त्यांतून खर्च भागणे शक्य नाही. आम्ही खूप प्रयत्न करीत आहो. पण आपल्या कथेमुळे जो निधी जमेल त्यांतून सर्व खर्च भागून किती शिल्लक उरेल हे सांगता येत नाही. समजा जास्त रक्कम जरी शिल्लक राहिली नाही तरी आम्हांला काही वाटणार नाही. पण आपण इतके परिश्रम करून जर जास्त रक्कम उरली नाही तर आपणास काय वाटेल? असा प्रश्न आम्हांला पडला आहे. आमचे बोलणे ऐकून ते दोन मिनीटे स्तब्ध राहिले आणि मग म्हणाले की, 'ठीक आहे, भगवंताच्या इच्छेने जे होईल ते होईल! आम्ही इतकेच सांगतो की आमच्या येण्याजाण्याचा, राहण्याचा वा इतर आमच्या बरोबर जे काही भजनात साथ करणारे आमचे लोक असतील त्यांचाही खर्च तुमच्यावर पडणार नाही. त्यांनाही तुम्ही काही देऊं नये, एवढेच आम्ही सांगतो.' अर्थात् हे ऐकून त्यांच्याबद्दलचा प्रेमादर आणखीनच वाढला. असो.

श्रीमत् भागवत सप्ताह सुरू करण्यापूर्वी मालाडमधून शोभायात्रा काढण्यात आली होती. बँड वगैरे लावला होता. माहेश्वरी समाजांतील स्त्रिया-पुरूष बहुसंख्येने संमीलित झाले होते. शिवाय गांवोगांवहून आमच्या

२५/३० गुरू बंधु भगिनी सप्ताह श्रवणासाठी व स्वयंसेवक म्हणून काम करण्यासाठी आलेली होती. ३०/३२ लोक (ब्राह्मण पुरोहित) संहिता वाचनास बसले होते. इतक्या थाटांत सर्व काही चालले होते की किती वर्णन करणार? अनंत कोटी ब्रह्मांडनायक अनंत हस्ताने देऊ लागले की घेणारांचीच दमछाक होते नाही कां? दोन दिवसांनी मला आणि श्रीरामजींना पू. किशोरजी व्यास यांनी बाजूला बोलावून घेतले आणि विचारले की, 'आर्थिक स्वास्थ्य कसे काय आहे?' आम्ही म्हटले, 'फारच उत्तम! अपेक्षेपेक्षा प्रचंड प्रतिसाद आहे.' त्यांना आनंद झाला. मला वाटते मुंबईतील त्यांची ती पहिलीच कथा होती. कथेला इतका रंग चढत असे! रामभैय्याच्या कृपेने व्हिडिओ शूटिंगचीही व्यवस्था झाली. प्रत्येक उत्सव इतक्या थाटांत संपन्न झाला की कल्पनाही करतां येणार नाही. रात्री कथा संपल्यावर जमलेल्या रकमेची मोजदाद करतांना दमछाक होत असे. कृष्ण जन्म, कृष्ण-रूक्मिणी विवाह, सुदामा पूजन वगैरे प्रसंगी इतक्या थाटांत उत्सव संपन्न झाले की काय सांगावे? कृष्णजन्माच्या वेळी कुणीतरी रुपया रूपयाच्या नोटा उधळल्या, कुणी खेळण्याच्या व्यापाऱ्यांनी खेळणी वाटली. रूक्मिणीला १२/१३ साड्या, सर्व प्रसाधन साहित्य, रूखवतावर पोतभर भांडी, अगदी नवीन चपलाच्या जोडापर्यंत सर्व आले होते. आम्ही गुरूबंधुभगिनींनी या वस्तू प्रसाद म्हणून त्यांची अंदाजे किंमत मंडळाच्या निधीत जमा केली होती. नंतर सप्ताह संपल्यावर हिशोब केल्यावर लाखो रूपये खर्च जाऊनही साडेचार लाख निधी मंडळाकडे गोळा झाला. पू. श्री. किशोरजी व्यास ह्यांनी स्वतःही काही घेतले नाही आणि त्यांच्या बरोबरच्या मंडळीनाही काही घेऊ दिले नाही. आम्हांलाच संकोच वाटल्याने श्री. नारायणदासजी मानुधनांच्या सल्ल्याने आम्ही पू. किशोरजी व्यास यांच्या संस्थेस अकरा हजार रूपये सदस्य मूल्य देऊन आमच्या मंडळास त्यांच्या मंडळाच्या सभेत प्रतिनिधीत्व प्राप्त करून घेतले. एक दोनदां मी व अनेकदां श्री. श्रीरामजी यांच्या मंडळाच्या विश्वस्तांच्या सभेस मंडळातर्फे हजरही राहिलो होतो.

हा सप्ताह इतका यशस्वी झाला की त्याच्या पुढील वर्षी मालाडच्या माहेश्वरी समाजाने त्यांच्या वतीने त्याच स्थळी परत पू. किशोरजी व्यास

यांचा श्रीमत् भागवत सप्ताह ठरवला आणि आमच्या मंडळाच्या सदस्यांना अत्यंत प्रेमाने आणि आदराने स्वयंसेवक म्हणून काम करण्यास आमंत्रित केले. त्यावेळी पू. किशोरजी व्यास श्री. गणेशजी भराडियांच्या घरीच उतरले होते आणि त्याच इमारतीमध्ये जे.जे. मधील आमच्या घरोब्याच्या डॉ. घोरपडे सौ. कांचनमाला हिच्या सौ. आईवडिलांचा ब्लॉक मोकळा होता तो त्यांच्या सौ. आई, डॉ. सौ. कोलते माझी मैत्रीण होत्या म्हणून आम्हा गुरुबंधुभगिनींना राहण्यास मिळाला होता. तोही सप्ताह थाटांत संपन्न झाला. या दोन्ही सप्ताहांत दरवेळी सात आठ दिवस कथेचा परमानंद तर मिळालाच शिवाय पू. किशोरजी व्यासांच्या सत्संगाचा लाभ होऊन जवळीक निर्माण झाली. ती अद्याप टिकून आहे.

नंतर संगमनेर येथे 'महर्षि वेद व्यास प्रतिष्ठान' या संस्थेच्या कार्यालयाचे उद्घाटन होते म्हणून श्री. भाऊ गिल्डा व मी संगमनेरला गेलो होतो. तेथे श्री. ओंकारनाथ मालपाणी यांच्या घरांतच तळमजल्यावर कार्यालय निघणार होते. त्या कार्यक्रमासाठी येणाऱ्या परगांवच्या मंडळीसाठी कार्यालय घेतले होते. पण मला पू. किशोरजी व्यास यांनी त्यांच्या कार्यालयाच्या मागील बाजूस ओसरी होती तेथे उतरवून घेतले होते व मी माडीवर स्नान वगैरे करण्यास सौ. जिजींच्याकडे जाण्याची व्यवस्था केली होती. श्री. श्रीरामजी कार्यालयात उतरले होते. हा उद्घाटन समारंभ हरिद्वार येथील भारतमाता मंदिरचे संस्थापक प.पू. सत्यमित्रानंदजी गिरी यांच्या हस्ते होणार होता. ते श्री. ओंकारनाथ मालपाणी यांच्या घरी अगदी वरच्या मजल्यावर उतरलेले होते. मी उतरले होते त्याच ओसरीवर दुसऱ्या दिवशीं पू. किशोरजी व्यासांचे बंधू श्री. रमाकांतजी व्यास येऊन उतरले. त्यामुळे त्यांचाही त्यावेळी चांगला परिचय झाला.

दुसरे दिवशी सकाळी ८.०० च्या सुमारास आम्ही कांही मंडळी जास्त करून श्री. मालपाणींच्या घरांतील व आणखी थोडी मंडळी अशी बाहेरच्या खोलीत बसलो होतो एका मोठ्या सतरंजीवर. तेवढ्यांत माडीवरून पू. सत्यमित्रानंदजी स्वामी खाली आले आणि तेथे त्यांच्यासाठी तयार केलेल्या आसनावर बसले आणि त्यांनी आणि काही मंडळीनी भगवंताची भजने व स्तोत्रे म्हणायला सुरूवात केली आणि काय झाले ते माझे मलाही कित्येक

वेळा कळतच नाही. माझी मलाही कल्पनाच नसते की काय आपल्या कानावर पडणार आहे आणि त्यांतील कोठले शब्द आपल्या हृदयास जाऊन भिडतील आणि आपली काय अवस्था होईल याचा अंदाजच बांधता येत नाही. तसेच त्यावेळी माझे झाले आणि एकदम इतके अंत:करण प्रेमाने भरून आले की, एकदम रडूच कोसळले. तेवढ्यात भजन थांबले आणि एकेक जण जाऊन पू. स्वामी सत्यमित्रानंदजी यांच्या जवळ जाऊन पाया पडू लागले. सगळ्यात शेवटी मी नमस्कार करण्यास गेले आणि परत एकदम मला रडू कोसळले. तेव्हा ते म्हणाले, 'अध जल गगरि छलकत जाय!' मला त्याचा अर्थ कळत होता. पण ते असे म्हणाले तरी मला जराही वाईट वाटले नाही! कारण जे असे काही होते ते माझ्या इच्छेने घडतच नाही! मी म्हणजे कळसूत्री बाहुली आहे, सूत्रधार तर रामभैय्याच आहेत याची पक्की खात्री आहे. ते नाचवतील तसेच नाचावे लागते! तेथे लोक काय म्हणतील याचा काही संबंधच नसतो, तसा विचारही मनांत कधी येत नाही! लोक तर नांवे ठेवणारच ना? पण खरे काय ते रामभैय्याच जाणतात! असो. प्रथम मुलाखतीत हा सर्व प्रकार घडला. पण पुढे जसजसा त्यांचा अधिक परिचय झाला तशी तशी अधिकाधिक कृपा लाभली. 'रामनाम प्रेमरसमें डुबी रहो' या सारखे आशीर्वादही त्यांनी दिले. त्यांचे व्यक्तिमत्त्वही असे होते की त्यांच्याकडे पाहिल्यावर विवेकानंदांचेच दर्शन घडत आहे असे वाटावे.

नंतर उज्जैनी येथे सिंहस्थामध्ये प.पू. स्वामी सत्यमित्रानंदजी गिरी यांच्या तर्फे प.पू. किशोरजी व्यास यांची श्रीमद् भागवत कथा होती. त्याला त्या दोघांच्याही तर्फे आम्हांला आमंत्रण होते आणि त्यावेळी 'मानस गूढार्थ चंद्रिके' च्या किष्किंधाकाण्डावरील हिंदी टीकेचे प्रकाशन, प.पू. स्वामी सत्यमित्रानंदजी यांच्या हस्ते होणार होते. म्हणून मुंबईहून सौ. भाभी, श्री. भाऊ (गिल्डा) व मी अशी मुंबईहून प्रथम रात्रीच्या बसने निघून इंदौर येथे गेलो. तेथे माझी भाची सौ. प्रेमा गोखले (डॉ. रमेश गोखले जावई) यांच्याकडे उतरलो. इंदौर येथे प.पू. तेजोमयानंदजी यांचे दोन्ही बंधु, त्यांचे कुटुंबीय व मुख्य म्हणजे पू. स्वामीजींच्या पूज्य मातोश्री राहात होत्या. त्या यापूर्वी मुंबईला आमच्या घरी प.पू. स्वामीजींच्या बरोबर भिक्षेसाठी

आल्या होत्या. त्यामुळे त्यांची चांगलीच ओळख झाली होती. म्हणून त्यांना फोन करून आम्ही त्यांच्या घरी त्यांच्या दर्शनास गेलो होतो. आम्ही येणार कळलपासून त्या आमची अत्यंत आतुरतेने वाट पहात होत्या. जरा रिक्षाचा आवाज आला की सूनेला म्हणत, 'बघ बरं आले कां?' त्यांनी माझ्यावर खूप प्रेम केले. माझा प्रबंध प्रकाशित होणार आहे असे त्यांना कळविल्यावर त्यांना फार आनंद झाला होता. पण तो प्रकाशित होण्यापूर्वीच त्यांना देवाज्ञा झाली.

आम्ही इंदौरला गेलो तेव्हा त्या श्री. ग.स. काईतवाडे (सर्वांत मोठे बंधु) यांच्याकडे राहात होत्या. तेथे सौ. आशा वहिनींची ओळख झाली. त्या व त्यांचे पती पुढे मिरजला आमच्या घरीही येऊन गेले. त्यांच्या घरून आम्ही नंतर त्यांचे धाकटे बंधु अनंत काईतवाडे यांच्याकडे गेलो. तेथे सौ. रजनी वहिनींची ओळख झाली. त्याही आमच्याबरोबर उज्जैनीला येणार होत्या. आम्ही सर्व दुसऱ्या दिवशी बरोबरच आगगाडीने इंदौरहून उज्जैनीला गेलो. प्रथम सौ. रजनीवहिनींनी तेथे चिन्मय मिशनचाही कॅम्प होतो तेथे आम्हांला नेले. त्यावेळी खूप रात्र झाली होती म्हणून आम्ही रात्री तेथेच राहिलो व दुसरे दिवशी सौ. रजनीवहिनींनी गाडीची व्यवस्था करून सकाळी अगदी लवकर आम्हांला प.पू. स्वामी सत्यमित्रानंदजी यांच्या छावणीवर पोहोचविले. त्या चिन्मय मिशनच्या कॅम्पमध्ये थांबल्या. या निमित्ताने त्यांची खूप ओळख झाली. त्यानंतर त्यांची ३/४ वेळा प्रत्यक्ष गांठही पडली. त्या पतीपत्नीशी फोनवर बोलणेही होते. आमच्या गुरूभगिनी इंदौरमध्यें रामचरितमानस मराठीच्या सामुदायिक पारायणासाठी गेल्या होत्या तेव्हा त्यांनी त्यांच्या घरी त्यांना बोलावून खूप आदरातिथ्य केले. आमचा स्नेह अद्याप टिकून आहे. त्यांची संगति म्हणजेही सत्संगच आहे.

***

## प.पू. नानामहाराज तराणेकर

इंदौरला गेलोच होतो म्हणून तेथून उज्जैनीला जाण्यापूर्वी सौ. भाभी, श्री. भाऊ व मी मुद्दाम प.पू. नाना महाराज तराणेकर यांच्या दर्शनासाठी त्यांच्या निवासस्थानी गेलो होतो. तेव्हा कळले की, ते खूप आजारी असून

कोमांत होते. घरांत त्यांच्या वहिनी होत्या. त्यांना आम्ही मुंबईहून आलो असून मुद्दाम दर्शनासाठी आलो आहोत असे सांगितल्यावर आश्चर्य म्हणजे त्यांनी आम्हांला त्यांचे दर्शन घेण्यास परवानगी दिली. त्या म्हणाल्या, 'ते बोलू शकणार नाहीत. पण तुम्ही त्यांचे दर्शन घेऊ शकतां!' ते साक्षात्कारी संत आणि दत्तभक्त म्हणून प्रसिद्ध होते. आम्ही ते झोपलेले होते त्या खोलीत जाऊन तेथे भिंतीजवळ सतरंजी अंथरलेली होती त्यावर जाऊन बसलो. पू. महाराज कोमांत होते व त्यांना सलाईनही लावलेले होते. आम्ही बसल्याठिकाणीच त्यांना मस्तक नमवून प्रणाम केला आणि पाच दहा मिनिटे डोळे मिटून तेथे ध्यानस्थ बसलो आणि मनोमनी त्यांच्याशी संवाद साधण्याचा प्रयत्न केला एवढेच! पाच दहा मिनिटांनी बाहेर येऊन त्यांच्या श्री दत्तमूर्तीचे दर्शन घेऊन आम्ही बाहेर पडलो. रामभैय्याची कृपा म्हणून त्या वहिनीनी आम्हांला दर्शन घेण्याची परवानगी दिली! नंतर ते समाधिस्थ झाल्याचे कळले!

उज्जैनीला आम्ही प.पू. किशोरजी व्यास यांचे पाहुणे होतो म्हणून आम्हाला अधिक सुविधा प्राप्त झाल्या होत्या. त्यांच्या बरोबरच्या मंडळींसाठी खास वेगळा तंबु होता. त्यावेळी तेथे प्रचंड उन्हाळा होता. ९.०० ते १२.०० पर्यंत कथा झाली की मध्ये भोजन झाल्यावर मांडवातच विश्रांती घ्यावी लागे. १२.०० ते ३.०० पर्यंत मांडवातील पंखे बंद असत.तेव्हा पंख्याने किंवा वर्तमानपत्राने वारा घ्यावा लागे. पाण्याचे मोठमोठे रांजण भरलेले असत. कितीही पाणी प्यायले तर पुरेसे वाटत नसे. थोड्यावेळाने परत तहान लागे आणि बाथरूमला तर जावेच लागत नसे. जेवणास रोज नवीन मिष्टान्न, नवीन दात्याच्या वतीने वाढले जाई. तेथे कपबशा नव्हत्या. स्टेनलेस स्टीलच्या ग्लासमधूनच चहा घ्यायचा आणि वाटीत ओतून थोडा-थोडा प्यायचा. श्री. भाऊ व सौ. भाभी रोज नदीवर (क्षिप्रा) स्नानास जात. मी एक दोन दिवस गेले होते. कारण विशिष्ट अंतरापर्यंतच रिक्षा व वाहन नेतां येई. नंतर पायी जावे लागे. एकदा तर भाभी व मी दमलो तेव्हा आम्हाला एका मोकळ्या हातगाडीवर बसवून भाऊ चालत आले. या मुक्कामांत प्रज्ञाभारती श्री. वर्णेकर यांचा उत्तम परिचय झाला. त्यांच्याशी माझा पत्रव्यवहारही होता. त्यांनी भेट दिलेली 'संघगीता' (संस्कृत)

मजजवळ अद्याप आहे. त्यांनी संस्कृतमध्ये मला वाटते शिवाजी महाराजांवर महाकाव्यही लिहिले होते. ते ही खरे तर एक महान् सत्पुरूषच होते!

१९९४ फेब्रुवारी मध्ये त्यांची सांगलीत भेट पू. दासराम महाराजांच्या घरी झाली होती. उज्जैनच्या मुक्कामात प.पू. सत्यमित्रानंदजींचा चांगला परिचय झाला. ते आस्थेने आमची चौकशी करीत. नंतर काही वर्षे त्यांच्याकडून दिपावली ग्रीटींग कार्डही येत असे. तसेच पत्र गेले तर त्वरित कृपापत्र येई. छान आशीर्वाद देत. एकदां इचलकरंजीस त्यांची कथा होती. त्यावेळी चि. डॉ. रमेश मला दर्शनासाठी घेऊन गेला होता. ते जेथे उतरले होते तेथे आम्ही दर्शनास गेलो होतो. आम्ही दोघे व पू. स्वामीजी एवढेच होते. आश्चर्य म्हणजे त्यांना पाहून चि. रमेशच्या ठिकाणी अष्टसात्त्विक भाव जागे झाले आणि अश्रू वाहू लागले. पू. स्वामीजींनी विचारले, 'क्यों क्या हुआ? आपको क्या दुख है?' तेव्हा तो म्हणाला, 'दुख नहीं है, आपको देखते ही --- ' यापुढे तो बोलूच शकला नाही. 'अच्छा, अच्छा! ठीक है!' पू. स्वामीजी म्हणाले आणि नंतर माझ्या पत्रात ते आठवणीने डॉ. रमेशला आशीर्वाद कळवित. त्यांची कृपापत्रे मजजवळ आहेत. पण प्रत्यक्ष दर्शन गेल्या १०/११ वर्षात घडलेले नाही! प.पू. किशोरजी व्यास हे शृंगेरीच्या शंकराचार्यांचे अनुग्रहीत आहेत. पण त्यांना संन्यासदीक्षा प.पू. स्वामी सत्यमित्रानंदजी गिरी यांच्याकडून मिळाली आहे व तेव्हापासून प.पू. आचार्य किशोरजी व्यास अर्थात् प.पू. स्वामी गोविंददेवजी गिरी सतत या श्रीसद्गुरूंच्या सेवेत रत असतात.

पू. किशोरजी व्यास यांचाही परिचय होऊन 'महर्षि वेद व्यास प्रतिष्ठान' तर्फे स्मरणिका काढायची ठरली होती. तिचे काम बेळगांव येथील श्री. सुधीर जोगळेकर, जे 'मानसगूढार्थ चंद्रिका' च्या छपाईचे काम करीत होते त्यांना द्यावयाचे ठरले आणि त्या 'वेदामृत' या स्मरणिकेच्या संपादक मंडळावर श्री. श्रीरामजी गिल्डांना व डॉ. श्री. कमल वैद्य यांना घेण्यात आले होते. ते काम चालू असतांना १९९२ मध्ये बाबरी मशिदीच्या प्रकरणावरून बऱ्याच ठिकाणी विशेषत: मुंबईत जे.जे. हॉस्पिटलच्या आसपास खूप दंगे होऊन जवळजवळ महिनाभर कर्फ्यू लागू झालेली होती. काम विशिष्ट कालमर्यादेत पूर्ण करावयाचे होते. त्यांत श्री. श्रीराम गिल्डा यांची

तब्बेत बरी नव्हती; त्यामुळे ते प्रवास करू शकत नव्हते. तेव्हां पहाटे कर्फ्यू उठली असता मी सँडहर्स्ट रोड स्टेशन वरून बोरीबंदरवर जाऊन डेक्कन एक्सप्रेसने पुण्यात पू. किशोरजींची कथा होती म्हणून पुण्यास गेले व सरळ कथेच्या ठिकाणीच गेले. तेथे श्री. अविनाश मोरे स्टॉलवर होते. त्यांच्याजवळ सामान ठेवून आत कथेच्या मंडपात जाऊन बसले. थोड्या वेळाने कथा संपली तेव्हा 'मी कुठे उतरले' म्हणून पू. आचार्यांनी चौकशी केली. तेव्हा मी स्टेशनवरून थेट मंडपातच आल्याचे सांगितले तेव्हा त्यांनी ते उतरले होते तेथे श्री. सारडा यांच्याच घरी मला नेले. मी एक दिवस राहून कामासंबंधी बोलून तिसऱ्या दिवशी पुण्याहून निघाले व वाटेत कल्याणला उतरून ठाकूर्ली येथे श्री. श्रीरामजींच्याकडे जाऊन त्यांना भेटून तब्बेतीसंबंधी चौकशी करून व स्मरणिकेच्या कामाविषयी चर्चा करून मग मी सँड्हर्स्ट रोड स्टेशनवर उतरून घरी गेले. यानंतरही याच कामासाठी श्री. सुधीर जोगळेकर मुंबईस आला व तो व मी मुंबईहून एस.टी. ने संगमनेरला पू. आचार्य किशोरजींना भेटण्यासाठी गेलो. त्यादिवशी होळी पौर्णिमा होती. आम्ही श्री. मालपाणी यांच्या घरी तळमजल्यावर 'महर्षि वेदव्यास प्रतिष्ठान' चे कार्यालय होते तेथे सामान ठेवून प.पू. आचार्य किशोरजी व्यास यांची बहीण संगमनेरला राहात होती तिथे रात्री पू. आचार्य किशोरजी जेवायला गेले होते व आम्हाला तिकडेच बोलावले होते म्हणून तिकडेच जेवावयास गेलो. त्यावेळी पायीच त्यांच्या सौ. बहिणीकडे गेलो. वाटेत चौकात होळ्या पेटलेल्या होत्या. जेवून आम्ही सर्व एकदमच परत आलो. तेव्हा मागील ओसरीवर सुधीर झोपला. पू. आचार्य कार्यालयात झोपले आणि त्यास लागूनच पार्टीशन घालून एक लहान खोली काढलेली होती, जेथे पू. किशोरजींचे देव ठेवलेले होते व त्याच्यासमोर एक गादी घातलेली होती तेथे मला झोपायला पू. किशोरजींनी सांगितले . या घटनेने माझे अंतःकरण अजूनही भरून येत आहे. ती रात्र मी विसरू शकत नाही.

दुसरे दिवशी सकाळी श्री ओंकारनाथजी, पू. किशोरजी व्यास, सुधीर व मी कामासंबंधी सर्व बोललो. मग जेवण झाल्याबरोबर पू. किशोरजी व्यास गावाला जाणारच होते. त्यांनी त्यांच्या बरोबर त्यांच्याच गाडीतून आम्हाला पुण्याच्या एस्.टी. स्टँडवर जेथून एशियाड सुटतात तेथे सोडले.

ते स्वत: पुढे ड्रायव्हरजवळ बसले होते. आम्ही उतरल्याबरोबर तेही गाडीतून उतरले. आम्ही दोघांनी त्यांच्या चरणास स्पर्श करून नमस्कार केला आणि मला मुंबईच्या एशियाडमध्ये बसवून सुधीर बेळगांवकडे गेला.

नाशिकला सिंहस्थ असतांना पू. किशोरजी व्यास यांची श्रीरामकथा नाशिकलाच रामघाटाजवळच एका कार्यालयात होती. त्यांची जेथे जेथे कथा होत असे तेथे तेथे न चुकता आम्हांला आमंत्रण येत असे. नाशिकला मला वाटते श्रावण महिन्यांत कथा होती व माझी भाची सौ. अनिता मोडक नाशिकलाच होती. म्हणून मी नाशिकला जायचे ठरविले व त्याप्रमाणे कथेच्या आदल्या दिवशी सौ. अनिताकडे जाऊन उतरले. तिलाही फार आनंद झाला. त्याच्या आधीच्या वर्षी तिच्या सौ. आईला (सौ. सुधाला) देवाज्ञा झाली होती. त्यामुळे माहेरचे कुणी आले विशेषत: आत्या आली म्हणून तिला खूप आनंद झाला.

सकाळी ९.०० वाजतां कथेला आरंभ होण्यापूर्वीच मी कार्यालयांत जेथे कथा होती तेथे गेले. तेथेच बाजूला दोन खोल्या होत्या तेथे पू. आचार्यांची उतरण्याची सोय केलेली होती. मला पाहून प.पू. किशोरजींना खूप आनंद झाला. मी कुठे उतरले आहे वगैरे चौकशी त्यांनी केली आणि म्हणाले, 'तुम्ही तुमच्या भाचीला कळवून टाका की तुम्ही येथेच माझ्याबरोबर जेवणार आहात आणि संध्याकाळी ६.४५ ला कथा संपल्यावरच एकदम घरी याल.' म्हणून मी सौ. अनिताला तसे कळवून टाकले.

मग मी ५/७ दिवस तेथे होते. पू. किशोरजींच्यासाठी स्वतंत्र सोवळ्याने स्वयंपाक होत असे.तेथे त्यांच्याबरोबर माझेही पान वाढले जाई. त्यावेळी तरी इतर तेथे आणखी कोणी नसे. दुपारी मी तेथील इमारतीत विश्रांती घेऊन चहा घेऊन परत कथा श्रवणास बसत असे. त्या मुक्कामांतच राखी पौर्णिमा आली होती. पू. किशोरजी पण इतके प्रेम करीत की काय सांगावे? म्हणून मी राखी पौर्णिमेस रामभैय्यांच्या नाशिकमध्ये रामघाटावर सिंहस्थामध्ये गोदावरीचे स्नान करून पूज्य श्री. किशोरजी व्यास यांची अनुमति घेऊन त्यांना रामभैय्यास्वरूप समजून राखी बांधली. श्रीसद्गुरूकृपेने त्या नात्याचा निर्वाह अद्याप होत आहे. मी एखादी विनंती केली आणि ती त्यांनी अमान्य केली असे कधीही घडलेले नाही. यापेक्षां आणखी काय हवे?

अशीच एकदा पू. किशोरजींची कथा आळंदीला होती आणि हेच 'वेदामृत' चे काम चालू होते म्हणून मी मुंबईहून पुण्याला गेले माझ्या नातीकडे. तेथून आळंदीला जायचे होते. घरी सर्वांना काळजी पडली होती की मी एकटी पुण्याहून आळंदीला कशी जाणार? पण श्री. बाबूराव पारखी, उद्योगपती व श्री. जोगळेकर (सौ. रेवतीचे वडील) यांचे मित्र श्री. देव दोघांनी आपापल्या गाड्या काढल्या माझ्याबरोबर आळंदीला येण्यासाठी आणि मलाच कळेना की कुणाच्या गाडीतून जावे! आळंदीला गेल्यावर तेथे श्री ज्ञानेश्वर माऊलींचे दर्शन घेऊन आणि जेथे पू. किशोरजींच्या वतीने 'श्रीरामचरितमानस (हिंदी)' चे सामुदायिक नवाह पारायण चालू होते, ते थोडे ऐकून, पू. किशोरजींचे दर्शन घेऊन प्रसाद घेऊन ती मंडळी परत गेली. मी आळंदीत माहेश्वरी समाजाची धर्मशाळा आहे तेथे राहाण्यास गेले. पू. किशोरजी व्यासांच्या बरोबरची मंडळी तेथेच राहिली होती. त्यावेळी तेथे पू. प्रज्ञाचक्षु मुकुंद महाराज जाटदेवळेकरही आलेले होते. रोज त्यांची प्रवचने होत. त्यांचा व्यासंग आणि पारमार्थिक अधिकार पाहून कुणीही आश्चर्यचकित होत असे. त्यांचा आवाजही खणखणीत असूनही त्यात एक प्रकारचा गोडवा होता. शिवाय ते हार्मोनियमही सुंदर वाजवत. पू. आचार्य जेव्हा धर्मशाळेतून कार्यक्रमाच्या जागी जात तेव्हा ते स्वत: ड्रायव्हर शेजारी बसत व गाडीत मागे पू. मुकुंदमहाराज व मी यांना बसवून बरोबर नेत असत. त्यामुळे पू. मुकुंदमहाराजांशी माझा चांगला परिचय झाला. ते हरिपाठ म्हणत तो ऐकला तर माझे मन इतके अंतर्मुख होऊन जाई! पू. आचार्यांना हे कळले तेव्हा ते गंमतीने पू. काकांना म्हणाले, 'कमाताईंना तुम्ही असे तुमच्याकडे ओढलेत तर काम तसेच राहिलं बरं का!' असो.

आणखी एकदा पुण्याहून श्री. श्रीरामजी, श्री. आदिनाथ, श्री. अशोक कामत मी अशी आळंदीला गेलो होतो. मला वाटते सौ. कावेरीताई अन्नछत्रे वगैरेही होती. तेथे 'मानसगूढार्थ चंद्रिके' च्या एका खंडाचे प्रकाशन पू. किशोरजींच्या उपस्थितीत मला वाटते पू. भालचंद्र शास्त्री (त्र्यंबकेश्वर) यांच्या हस्ते झाले होते. तेथे गाभाऱ्यात बायकांना प्रवचन, कीर्तनास मला वाटते परवानगी नसल्याने आणि मी त्यात असल्याने आम्हाला गाभाऱ्याच्या बाहेर सभागृहात कार्यक्रम करावा लागला, असे

अंधुकसे आठवते.

एकदा जयसिंगपूर येथे पू. आचार्य किशोरजी व्यास यांची कथा होती. त्यासाठी श्री. श्रीरामजीही मिरजेला आमच्याकडे येऊन राहिले होते. जेवणाची व्यवस्था जयसिंगपूरलाच असे. तेव्हा सहज बोलतांना मी पू. आचार्यांना डॉ. ग.वा. तगारे यांच्याबद्दल बोलले. डॉ. ग. वा. तगारे हे प्रकांड पंडित होते. त्यांनी स्वत:हून माझी ओळख करून घेतली होती. त्यांनी अनेक संस्कृत धार्मिक ग्रंथांची इंग्रजी भाषांतरे केली होती व ती दिल्ली येथील 'बनारसीलाल' प्रकाशनतर्फे प्रकशित झाली होती. त्यांत संपूर्ण श्रीमद् भागवताच्या भाषांतराचे ५ खंडही होते. मी असे सांगितल्यावर पू. किशोरजींना खूप आनंद झाला. कारण त्यांनी श्रीमद् भागवतरावरील खंड वाचले होते. म्हणून ते म्हणाले की, 'त्यांचा मला सत्कार करायचा आहे. तुम्ही येथून आपली गाडी घेऊन जा आणि त्यांना येथे घेऊन या. दुपारच्या कथेत त्यांचा सत्कार करू या.' त्यांच्या आदेशाप्रमाणे आम्ही (मी व भाऊ) डॉ. तगारे यांना फोनवरून आधी कल्पना देऊन पू. आचार्यांची गाडी घेऊन डॉ. ग. वा. तगारे त्यावेळी गव्हर्मेंट कॉलनीत त्यांच्या मुलाकडे राहात होते तेथे त्यांना आणण्यास गेलो व त्यांना धेऊन जयसिंगपूरला कथेच्या जागी पोहोचलो. कथेच्या सुरूवातीची वेळ झालीच होती. आमच्यासाठी व्यासपीठापासून जवळच व्यासपीठाच्या उजव्या बाजूस खुर्च्या ठेवलेल्या होत्या. पहिली स्तोत्रे वगैरे म्हणून झाल्यावर पू. आचार्यांनी डॉ. ग. वा. तगारे यांचा परिचय करून देण्यास मला सांगितले. त्याप्रमाणे मी स्टेजवर जाऊन त्यांचा थोडक्यात परिचय करून दिला व पू. आचार्यांनी त्यांना शाल, श्रीफळ व पाकीट देऊन त्यांचा सत्कार केला. नंतर डॉ. तगारे व मी तेथून उतरून आमच्यासाठी ठेवलेल्या खुर्च्यांवर जाऊन बसलो. थोड्याच वेळात भजनास सुरूवात झाली आणि एका मागोमाग ती इतकी रंगत गेली की काय सांगावे? अशी सामुहिक भजने जेव्हा कानावर पडतात तेव्हा कितीही प्रयत्न केला तरी शरीराच्या कणाकणांतून इतक्या वेगाने भजन होऊन मन तल्लीन होऊन जाते ; की मी खुर्चीवरून एकदम खालीच पडले! स्त्री स्वयंसेविकांची धावपळ उडाली! तेवढ्यांत भजन थांबले आणि मला उठवून पाणी पाजण्यांत आले. नंतर मला इतके

लाजल्यासारखे झाले की सांगता येत नाही! डॉ. तगारेही सर्व प्रकार पाहून गोंधळून गेले होते. ते पुढे मला म्हणत की की माझा पण अनेक संतांशी परिचय होत असतो . पण तो तेवढ्या प्रसंगापुरताच असतो. तुमच्यासारखी जवळीक उत्पन्न होत नाही. यावर मी काय बोलणार? पण ते स्वत:ही माझ्यावर पित्याप्रमाणे प्रेम करीत असत. मी त्यांना भेटण्यास त्यांच्या मुलीकडे सौ. आशाताईंच्याकडे गेले की त्यांना इतका आनंद होई! आणि मी निघाले की मी नको म्हटले तरी ते मला रिक्षा स्टँडपर्यंत पोहोचविण्यास येत. आमची ओळख झाल्यानंतर त्यांची जी जी पुस्तके प्रकाशित झाली त्याची प्रत ते मला भेट देत. माझ्या विनंतीवरून त्यांनी प.पू. स्वामी प्रज्ञानानंदांचे संक्षिप्त चरित्र इंग्लिशमध्ये लिहून दिले जे आमच्या मंडळाने प्रकाशित केले. ते माझ्यापेक्षां वयाने बरेच मोठे होते तरी ९० व्या वर्षीही, मला जिना चढता उतरता येत नसे, तर तेच आमचे जिने चढून येऊन मला भेटत. ते पण उत्तम साधक होते व मला वाटते त्यांनी ब्रह्मलीन पू. हणमंतराय कोटणीसांचा अनुग्रह घेतलेला होता. त्यांच्या हस्ते जयसिंगपूरच्या हायस्कूलमध्ये काही प्रतिष्ठितांचा सत्कार झाला होता. तेव्हा त्यांच्या बरोबर श्री. नारायणदासजी मानुधना यांच्या आग्रहावरून मलाही जावे लागले. नंतर ते कोल्हापूरला त्यांच्या नेत्रतज्ञ नातवाकडे राहू लागल्यामुळे व माझ्याही परस्वाधीनतेमुळे त्यांची गांठ पडली नाही व मग त्यांना देवाज्ञाच झाली. माझ्यावर वडिलांप्रमाणे प्रेम करणाऱ्या व्यक्तींमध्ये ते एक प्रमुख होते. असो. विषयाच्या ओघात डॉ. तगाऱ्यांच्या आठवणी येऊन गेल्या. त्यांनी माझा प्रबंध प्रकाशित झाला तेव्हा छानसा अभिप्रायही दिला होता.

आता परत पू. किशोरजी व्यास यांच्या आठवणींकडे वळू या. माझी इच्छा होती की श्रीराम विश्रामधाममध्ये सिंहासनाधिष्ठित श्रीरामांची परिवारासह स्थापना व्हावी. सर्वत्र रामभैय्यांनी उभेच कां राहावे? निदान रामविश्रामधाम मध्ये त्यांनी आरामांत सिंहासनावर विराजमान व्हावे. ती इच्छा रामभैय्यांनी पूर्ण केली होती. तसेच भरत, शत्रुघ्नही बरोबर असावे अशीही इच्छा होती. पू. मुरारीबापूंच्या हस्ते श्रीराम, सीता, लक्ष्मण व हनुमान यांची प्राणप्रतिष्ठा झाली होती. त्यानंतर श्री. नारायणदासजी मानुधना हे मंदिरात दर्शनास गेले असतां तेथील श्रीविग्रह, मानसांतील कोरलेल्या

चौपाया व एकूणच सर्व मंदिर पाहून ते प्रसन्न झाले व त्यांनीही काही देणगी देण्याची इच्छा व्यक्त केली. म्हणून त्यांना मी भरत, लक्ष्मण, यांच्या मूर्ती द्याव्यात अशी विनंती केली. श्रीगणेशाच्या मूर्तीची प्राणप्रतिष्ठा पूर्वीच झालेली होती व शिवलिंगही नंदीसह परंड्यास आलेले होते. माखनचोर बाळकृष्णही उपस्थित झालेले हाते. श्री. नारायणदासजींनी भरत, शत्रुघ्न यांच्या मूर्ती दिल्यावर मी प.पू. किशोरजी व्यास यांना विनंती केली की, त्यांच्या हस्ते या सर्व मूर्तींची प्राणप्रतिष्ठा व्हावी अशी आम्हां सर्वांची इच्छा आहे. तेव्हा तात्काळ त्यांनी संमती दिली व त्यांच्या पूर्वी ठरलेल्या कार्यक्रमांतून सवड काढून ते परंड्यास आले व नंदीसह शिवलिंग, माखनचोर बाळकृष्ण व भरत, शत्रुघ्न यांच्या विग्रहांची प्राणप्रतिष्ठा दिनांक २६/८/२००४ रोजी त्यांच्या शुभहस्ते झाली. तसेच 'श्रीरामचरित मानस गूढार्थ चंद्रिका मराठीच्या उत्तरकाण्ड खण्ड २ रा' या शेवटच्या खंडाचे प्रकाशनही त्यांच्या हस्ते झाले. त्यामुळे पायापासून कळसापर्यंतचे काम त्यांच्या व इतर संतांच्या कृपाशीर्वादाने पूर्ण झाल्याचे समाधान त्यांना आणि आम्हां सर्वांनाही झाले. त्यावेळी केलेल्या भाषणांत 'शेगांव, शिर्डी आदि ठिकाणाप्रमाणे हेही स्थान प्रसिद्ध होऊन आणखी पन्नास वर्षांनी तेथे दर्शनासाठी भाविकांच्या रांगा लागतील असे दृश्य आपणांस दिसत आहे' असे उद्गार त्यांनी काढले. सत्पुरूषांचा शब्द भगवान कधी खाली पडून देत नाहीत. त्यामुळे ही भविष्यवाणी खरी ठरेल असा आमचा दृढ विश्वास आहे. यावेळी त्यांनी जी देणगी दिली त्यांतूनच माखनचोर बाळकृष्ण तेथे उपस्थित झाले होते असे आम्हांला वाटले. नंतर पू. आचार्यांनी मला त्यांच्या योगवासिष्ठा वरील प्रवचनांचे पुस्तक भेट दिले. दरवेळी भेट झाली की काही ना कांही भेट ते देतातच.

नंतर पू. किशोरजी व्यास यांनी प.पू. सत्यमित्रानंदजी गिरी यांच्याकडून संन्यास दीक्षा ग्रहण केली. त्यावेळी संन्यास ग्रहणापूर्वी सर्वांना त्यांनी त्यांच्या हातून कळत नकळत कुणाचे अंत:करण दुखविले गेले असेल तर क्षमायाचना करणारी पत्रे धाडली होती. तेव्हा मलाही असे पत्र आले होते. मुंबईला दोन भागवत सप्ताह झाल्यावरच्या काळात ते पुण्याहून रेल्वेने बेळगांव किंवा बंगलोरकडे निघाले होते. तेव्हा त्यांनी मला मिरजेच्या

स्टेशनवर चहा घेऊन बोलावले होते. त्यावेळी पुण्याहून आलेली गाडी मिरजेला बदलावी लागे. तेव्हा चि. रमेश व मी चहा घेऊन मिरज स्टेशनवर गेलो होतो आणि तेथे ते एका मोठ्या पेटाऱ्यावर बसून ते चहा प्यायले होते. तसेच एकदां पुण्याहून बेळगावंकडे मोटारीने (खाजगी) जातांना त्यांना माझ्याकडे यावयाचे हाते. पण मला त्याची कांहीच कल्पना नव्हती. त्यामुळे त्यांनी मिरज मेडिकल कॉलेजच्या ऐवजी मिरज मिशन हॉस्पिटलच्या कर्मचारी निवासात आमचा शोध घेण्याचा प्रयत्न केला. तेथे शोध न लागल्याने ते तसेच पुढे निघून गेले. नंतर त्यांनी दुसऱ्या कुणाजवळ तरी माझ्यासाठी प्रसाद व एक ग्रंथ भेट दिला होता. ती व्यक्ती आमचा शोध घेऊन आमच्या घरी येऊन त्यांनी आम्हांला त्या वस्तू व प्रसाद दिला. त्यावेळी मला खूप हळहळ वाटली होती.

नंतर परत ते जयसिंगपूरला आले असतां आमच्याकडे येणार म्हणून निरोप आला. तेव्हा सकाळी ९/१० वाजल्यापासून मी त्यांच्या वाटेकडे डोळे लावून बसले होते. पण परत फोन आला की ते नृसिंहवाडीला गेले असून संध्याकाळी येतील. असे करतां करतां रात्री ९.०० च्या सुमारास ते आमच्या घरी आले. त्यावेळी वाटले की आपल्याला एक दिवस वाट पाहावयास लागली तर आपण इतके व्याकुळ झालो. मग शबरीने रामप्रभुंची वर्षानुवर्षे कशी काय वाट पाहिली असेल? तरी पण त्यांचे पाय आपल्या घरास लागावे ही अनेक वर्षांची इच्छा पूर्ण झाली. त्यामुळे खूप आनंद झाला.

यानंतर ते संन्यास घेतल्यानंतर इचलकरंजी येथे प्रवचनांसाठी आले होते. ते त्यांच्याकडून कळल्यामुळे चि. रमेश बरोबर मी तेथे त्यांच्या दर्शनास गेले. ते जेथे उतरले होते तेथेच आम्ही गेलो. आम्ही शाल, श्रीफळ व हापूस आंबे नेले होते. प्रवचन झाल्यावर ते मुक्कामी आल्यावर त्यांचे दर्शन झाले. चि. रमेशने त्यांना तिलक लावून हार घातला. शाल, श्रीफळ, आंबे देऊन नमस्कार केला. त्यांना काय वाटले कुणास ठाऊक. त्यांनी उभे राहून तो हार लांबूनच माझ्या गळ्यात टाकला. मला कल्पनाच नव्हती म्हणून मी चकीत झाले. नंतर पू. गुलाबराव महाराज यांचा गौरव ग्रंथ व आणखी एक ग्रंथ मला भेट म्हणून दिले व आम्ही निघालो तेव्हा आम्हांला निरोप देण्यास दारापर्यंत आले.

नंतर गीताप्रेस गोरखपुर यांच्या सूचनेवरून मी 'दासबोध' ग्रंथाचे गद्य रूपांतर करीत असतां त्यांनी मला सांगितले की, कुणा प्रसिद्ध व्यक्तीची प्रस्तावना मिळाली तर बरे होईल! म्हणून मी पू. स्वामीजींना (गोविंददेवजी गिरि) यांना फोन करून विनंती की, ते प्रस्तावना देतील असे मी गीताप्रेसकडे कळवू कां? तेव्हा त्यांनी आनंदाने अनुमति दिली. ग्रंथ तयार होवून D.T.P. ची Zerox प्रत त्यांच्याकडे 'धर्मश्री' वर अवलोकनार्थ धाडण्यात आली. तेव्हा ते कॅनडाच्या दौऱ्यावर जाणार होते. पण त्यांनी ती पाहून टोरँटो येथून सुंदर सविस्तर प्रस्तावना लिहून धाडली. मला फोनवर विचारल्यावर मी म्हटले की, 'स्वामीजी! प्रस्तावना इतकी सुंदर झाली आहे की छोटी स्वतंत्र पुस्तिकाच होईल!' आणि खरोखरच ती प्रस्तावना त्यांनी छोट्या पुस्तिकेच्या रूपात प्रकाशित केली.

नंतर ब्रह्मलीन श्रीसद्गुरू प्रज्ञानानंद सरस्वती स्वामी महाराज यांचे चरित्र काव्यबद्ध करून त्यांच्याकडे अभिप्रायार्थ धाडले गेले. तेव्हाही ते हरिद्वार हृषीकेशकडे जावयास निघाले होते. तरी तेथून प्रस्तावना लिहून त्यांनी ती लगेच माझ्याकडे धाडली. खरे तर ह्या सर्व सत्पुरूषांना स्वत:साठीही वेळ नसतो. पण त्यांच्या कनवाळू स्वभावामुळे आणि मजवरील प्रेमामुळे ते त्यांतही सवड काढून माझे विनंतीस मान देतात व सुंदर अभिप्रायही देतात! ही रामभैय्यांची कृपाच होय. अजूनही दर राखी पौर्णिमेस ते जेथे कुठे असतील तेथे माझी राखी त्यांच्यापर्यंत पोहोचते. मूर्तीच्या प्राणप्रतिष्ठेच्या वेळी ते परंडा येथे आले होते. तेव्हा श्रीराम प्रभूंच्या गाभाऱ्यांतही त्यांनी माझ्याकडून राखी बांधून घेतली व दृष्टही काढून घेतली! त्यांच्या चरणी वारंवार विनम्र अभिवादन !

***

## परमपूज्य श्री. रमाकांतजी व्यास

प.पू. किशोरजी व्यास यांचे हे बंधू आहेत. त्यांच्या दोघांच्या आईवडिलांकडून त्यांना श्रीमद् भागवताचे बाळकडू मिळाले आहे. श्री. रमाकांतजींची माझी ओळख झाली तेव्हां ते वकील आहेत एवढेच मला कळले होते. पण तेही पू. आचार्य किशोरजींच्या प्रमाणे श्रीभागवत सप्ताह

करतात असे पुढे कळले. 'वेदामृत' ह्या स्मरणिकेच्या निमित्त्याने श्री. सुधीर जोगळेकर बरोबर मी संगमनेरला गेले होते व दुसऱ्या दिवशी पू. किशोरजी व्यासांच्या बरोबर त्यांच्या गाडीतून प्रवास करतांना माझ्या मनांत आले की, पू. रमाकांतजी व्यास हेही भागवतकथा करतात तर आपण त्यांच कथा घेतली तर आणखी निधी गोळा होईल. त्यावेळी गीताप्रेस द्वारा छपाईची व्यवस्था झालेली नव्हती. तेवढ्यात चि. रमेशची बदली मुंबईहून मिरजेस झाली आणि आम्ही मिरजेत राहावयास गेलो. शिवाय सांगली-मिरज पेक्षा कोल्हापूर शहर मोठे आहे म्हणून असे मनांत आले की कोल्हापूर येथे कथा करावी. मी गाडीतच पू. किशोरजींना ही कल्पना बोलून दाखविली. तेव्हा ते म्हणाले, 'तुम्ही त्यांना विचारा. कांहीच हरकत नाही! ' मग आम्ही श्री. रमाकांतजी व्यास यांच्याशी संपर्क साधला. तेव्हा तेही म्हणाले की, 'कथा ठरवण्यापूर्वी तुम्ही समक्ष माझी कथा ऐकावी अशी माझी इच्छा आहे. सेलूला माझी कथा आहे तेथे तुम्ही या'. श्री. श्रीरामजी गिल्डा यांचे व्याही सौ. रेखाचे वडील सेलूला राहात होते. म्हणून मी व भाऊ सेलू येथे गेलो व सौ. रेखाच्या माहेरी उतरलो. दुसरे दिवशी पू. रमाकांतजी व्यास यांची कथा दिवसभर ऐकली. ते अगदी पू. किशोरजी व्यासांप्रमाणेच कथा सांगतात. नंतर दुसरे दिवशी मी परत निघाले. श्री. भाऊ तेथे राहाणार होते. सौ. रेखाच्या माहेरी माझे खूप आदरातिथ्य झाले. तिची सौ. आई मुद्दाम रात्री माझ्याजवळ झोपली होती. दुसऱ्या दिवशी तिचा भाऊ मला एस्. टी. स्टँडवर गाडीत बसवून देण्यास आला आणि मी बार्शीला जाणार होते तर त्याने माझे तिकीटही काढले. मी नको म्हटले पण तो ऐकेना. ती एस्.टी. माजलगांवरून बार्शीकडे जाणार होती. माजलगांव एस्.टी. स्टँडवर श्री. संतोष दंडवते आला होता. तो टेलिफोन एक्सचेंजमध्ये नोकरी करीत होता. त्याने मला तेथे आग्रहाने उतरवून घेतले. मी म्हटले, 'अरे! माझे बार्शीचे तिकीट काढलेले आहे. तरी ऐकेचना! माझे सामान घेऊन खाली उतरला. शेवटी त्याच्याबरोबर त्याच्या घरी जावे लागले. त्याच्या घरी जेवण केल्यावर दुपारी तो परत माझ्याबरोबर एस्. टी. स्टँडवर आला आणि मी नको नको म्हणत असता त्याने माझे बार्शीचे तिकीट काढून देऊन मला गाडीत बसवून दिले.

बार्शीला रात्री श्री. आदिनाथकडे राहून मी दुसरे दिवशी मिरजेस गेले.'

कोल्हापूर येथे 'गीतामंदिर' मध्ये श्री भागवत सप्ताह करण्याचे ठरले. त्या निमित्ताने श्रीरामजींचे आणि माझे कोल्हापूरला हेलपाटे झाले. फेब्रुवारी १९९४ मध्ये मला हृदयविकाराचा जरा त्रास झाला. दीड महिना विश्रांती घ्यावी लागली. त्यावेळी माझ्या मनांत आले की, केवळ कृतज्ञता म्हणून आपण हनुमान चालिसाच्या १०८ पाठाचे हवन करावे. फेब्रुवारी मध्ये मी आजारी पडले तेव्हापासून डॉ. सौ.सुरेखा रजेवरच होती. ती रजा संपून मे महिन्याची सुट्टीही संपली की तिला मुंबईला जाऊन कामावर हजर व्हावयाचे होते. कारण चि. रमेशची जरी जानेवारी १९९२ ला बदली झाली होती तरी तिची बदली झाली नव्हती. जून १९९३ पासून चि. आरती व चि. सचिनला मिरजेच्या शाळेत ॲडमिशन घेतली होती व चि. रमेश, मुले व मी मिरजेस राहात होतो. सौ. सुरेखा अधूनमधून येई व दिवाळीच्या सुट्टीत आम्हीच सर्व मुंबईला गेलो होतो. मी हवनाला प्रारंभ केला. रोज २१ पाठाचे हवन करत होते असे तीन दिवस केले व मग सौ. सुरेखा म्हणाली की, मी मुंबईला गेल्यावर तुम्हांला घरातील सर्व करून पाठ व हवन करावयास फार कष्ट होतील तर मी उद्या जाणार तर आज आपण सर्व पाचजण मिळून राहिलेले पाठ म्हणून हवन करू या. म्हणजे तुम्हाला त्रास होणार नाही. त्याप्रमाणे आम्ही सर्वांनी मिळून पाठ करून अनुष्ठान पूर्ण केले आणि आश्चर्य असे झाले की त्या 'कारण रहित दयाल' रामभैय्याच्या कृपेनें मुंबईहून रमेशचा मित्र डॉ. कापसे यांचा फोन आला की, सौ. सुरेखा मॅडमच्या मिरजेच्या बदलीची ऑर्डर निघाली आहे. ऐकून आम्हांला आनंद झाला व मग विचार असा ठरला की, चि. डॉ. रमेशनेंही रजा घेऊन तिच्याबरोबर मुंबईस जावे व एकदोन दिवसांत तेथील सर्व कामे उरकून सामान घेऊन दोघांनी मिरजेस यावे असा बेत ठरला व त्याप्रमाणे सौ. सुरेखा व चि. रमेश मुंबईस जाण्याच्या तयारीस लागली.

त्याच दिवशी दुपारी बेळगांवहून श्री. सुधीर जोगळेकर यांचा फोन आला की, तो ज्या प्रेसमध्ये काम करत होता त्या इम्प्रेशन्स या बेळगांवच्या संस्थेने माझा 'एकनाथी भागवता' वरील प्रबंध प्रकाशित करण्याचा निर्णय घेतला आहे. तरी तो धाडून द्यावा. प्रथम फेब्रुवारी १९९४ मध्ये माझी ५

प्रवचने बेळगांव येथील श्रीगुरूदेव रानडे मंदिरात 'एकनाथी भागवता' वरच ठरली होती व ती प्रवचने झाल्यावर ती संस्थाच माझा प्रबंधही छापणार होती. पण त्याचवेळी मला हृदयविकाराचा त्रास झाल्याने अचानक तो कार्यक्रम त्यांना रद्द करावा लागला. कारण मी बेळगांवला जाऊच शकले नाही. त्यामुळे प्रबंध छपाईही रद्द झाली. हे सर्व होण्याआधी मी ४/६ महिने परिश्रम घेऊन ७५० पृष्ठांच्या प्रबंधाचा संक्षेप करून २५०/३०० पृष्ठांची आवृत्ती तयार केलेली होती. ती आता 'इम्प्रेशन्स' कडे धाडून द्यावयाची होती. अनुष्ठान तर केवळ कृतज्ञता म्हणून केले होते. पण सौ. सुरेखाची मिरजेस बदली व प्रबंधाच्या छपाईची व्यवस्था या गोष्टी रामभैय्या आणि हनुमंताच्या कृपेने अचानक घडून आल्या होत्या. त्यानंतर तिसरी लाभदायक गोष्ट म्हणजे अचानक घरी झालेले संतांचे आगमन ही होय.

सौ. सुरेखा व चि. रमेश आदल्या दिवशी रात्री 'महालक्ष्मी ' ने मुंबईला गेली होती. चि. आरती व चि. सचिन यांची शाळा सकाळची होती. ती दोघे १२.३० ते १.०० पर्यंत घरी आली की आम्ही जेवत असूं. त्याप्रमाणे जेवणे होऊन नंतर विश्रांती घेऊन ३.००-३.३० ला मी चहा केला आणि आम्ही टेबलाशी चहा पित बसलो होतो. एवढ्यात दारावरील घंटा (बेल) वाजली म्हणून आरतीने जाऊन दार उघडले आणि मी 'कोण आहे गं आरती?' असे विचारते तोवर एकदम प.पू. रमाकांतजी व्यासच माझ्या शेजारी येऊन उभे राहिले. मला एकदम काय करावे हेच सुचेना! मी एकदम उभी राहिले. तेव्हा माझे हात धरून ते म्हणाले, 'ताई! कशी आहे तुमची तब्बेत?' मी म्हटले, 'आता ठीक आहे' असे म्हणून त्यांना घेऊन बाहेर हॉलमध्ये आले आणि तेथील खुर्चीवर त्यांना बसवले. त्यांच्याबरोबर आणखी दोन व्यक्ती होत्या. त्यांनाही दिवाणावर बसावयास सांगितले. मी म्हटले, 'एकदम कसे काय येणे झाले? ' ते म्हणाले, 'कोल्हापूरला आलोच होतो, तेथे कळले तुम्हांला बरे नव्हते, म्हणून म्हटले परत घरी जातांना वाटेत तुम्हांला भेटून जावे!' ऐकून मला आनंद झाला. पण दारांत औक्षण वगैरे काहीच करता आले नाही. असो.

मग सौ. सुरेखाने घरांत आमच्यासाठी बेसनाचे लाडू करून ठेवले होते. ते सर्वांना दिले व पू. रमाकांतजीना त्यांनी सांगितल्यावरून दूध व

इतरांना चहा वगैरे दिला. त्यावेळी घरांत एक लोकरीची सुंदर शाल आणलेलीच होती ती चि. सचिनच्या हस्ते कुंकू लावून पू. रमाकांतजीना दिली, श्रीफळही दिले. अर्धा पाऊण तास त्यांच्या सत्संगाचा लाभ झाला व ती सर्व मंडळी निघून गेली. पण मला झालेला आनंद अवर्णनीय होता. 'कारण रहित दयाल' रामभैय्याची योजना काय असते हे आपल्याला कळतच नाही. ती शाल चुकून आणली गेली पण ती अशा रीतीने उपयोगी ठरली. पू. रमाकांतजीचा ठरलेला श्रीमत् भागवत सप्ताह आयतेवेळी काही कारणाने रद्द झाला. पण पू. किशारजींच्या प्रमाणेच गेली २० वर्षे मी त्यांनाही राखी धाडते. त्यांनीही प.पू. कांचीच्या शंकराचार्यांकडून अनुग्रह घेतलेला आहे. त्यांचाही 'भारतीय संस्कृत सेवा प्रतिष्ठान' हा ट्रस्ट आहे व सर्वत्र श्रीमद् भागवत कथा चालू असतात.

***

## प.पू. क्षीरसागर महाराज (अहमदनगर)

अहमदनगर येथे श्री. हेर्लेकरशास्त्री यांचा श्रीमद् भागवत सप्ताह झाला. तेव्हा आम्ही गुरुबंधुभगिनी सौ. स्नेहलताच्या घरीच राहिलो होतो. सप्ताह संपल्यावर तिने टाटा सुमोची व्यवस्था करून आम्हांला आजुबाजुच्या संतमहात्म्यांचे व तीर्थक्षेत्रांचे दर्शन होईल अशी व्यवस्था केली होती. तेव्हा प्रथम आम्ही प.पू. क्षीरसागर महाराजांच्या दर्शनासाठी गेलो होतो. माझी आतेबहीण मंदा उर्फ सुधा मोडक हिचे यजमान होते श्री. सुरेश मोडक. ते आता नाहीत. पण ते असतांनाही त्यांच्या घरांतील जवळजवळ सर्वांनी पू. क्षीरसागर महाराजांचा अनुग्रह घेतलेला होता व मंदाला त्यांच्या कृपेने स्फूर्ति होऊन तिच्याकडून काव्यही झालेले होते. पू. क्षीरसागर महाराज मला वाटते नेहमी सोवळ्यात असत. पण ते संन्यासी नव्हते. आम्ही दर्शनास गेलो तेव्हा तेथे मोठी वेदपाठशाला होती व लहान दत्तमंदिर होते. त्याच्या शेजारच्या खोलीत श्री. महाराज बसलेले होते. ते निळ्या रंगाचे सोवळे नेसलेले होते. त्यांना लांबूनच नमस्कार करावा लागे. त्यांनी आमची चौकशी केली. हात उंच करून आशीर्वादही दिला. मला श्री. मोडक कुटुंबियांशी माझे असलेले नाते सांगावे असे वाटले. म्हणून मी थोडी पुढे

गेले. तेव्हा मला वाटते की त्यांना मी जवळ येऊन दर्शन घेण्याचा प्रयत्न करीत आहे की काय असे वाटले असावे. म्हणून ते एकदम 'थांबा! थांबा!' म्हणाले. म्हणतांच मी तेथेच थांबले आणि तेथूनच मंदा माझी आतेबहीण असल्याचे सांगितले. पण त्यांनाही काम होते व आम्हांलाही बऱ्याच ठिकाणी जावयाचे हाते. त्यामुळे जास्त संभाषण होऊ शकले नाही व आम्ही पांच मिनिटाने तेथून बाहेर पडलो.

आता तेथे नवीन मोठे दत्तमंदिर व इतरही बरेच काम झाले आहे. 'श्रीगुरूसेवा ' त्रैमासिक तेथून निघते. त्यांत गेले २/३ वर्षे माझे लेख येत आहेत. श्रीमहाराज दत्तभक्त होते व हे (डॉ. बा. श्री. वैद्य) ही दत्त भक्त होते. त्यामुळेही असेल कदाचित पण मला ते स्थान खूप आवडले हे मात्र खरे! शरीराची साथ नसल्याने परत तेथे जाणे जमले नाही. पण श्रीमहाराज समाधिस्थ झालेले असून तेथील कार्याची कल्पनातीत प्रगति झाली आहे. श्रीगुरूसेवामधील छायाचित्रावरून त्याची कल्पना येते. शिवाय गांवोगांवी श्रीमहाराजांचे शिष्य आहेत. ते सर्वही सामुदायिक उपासना करून एकमेकांच्या संपर्कात असतात आणि गुरूसेवेत रत असतात हे विशेष होय. यावरून श्री महाराजांचा अधिकार व भक्त वात्सल्याची कल्पना येते.

***

## प.पू. करवीर पीठाचे शंकराचार्य स्वामी विद्याशंकर भारती

हे पूर्वाश्रमी उत्तम कीर्तनकार होते व कराडकर बुवा म्हणून प्रसिद्ध होते. त्यावेळी त्यांनी प. पू. प्रज्ञानानंद सरस्वती स्वामींनाही पाहिले होते व त्यांना त्यांच्याविषयी प्रेमादरही होते. माझी गुरूभगिनी मंगलाताई ओक ही सुद्धा उत्तम कीर्तनकार असल्याने तिची व प. पू. शंकराचार्यांची ओळख होती. तसेच आमचे गुरुबंधु श्री. वासुनाना आरे यांचीही पू. शंकराचार्यांशी चांगली ओळख होती. पू. शंकराचार्य शास्त्रीय संगीताचे जाणकार होते व आवाजही मधुर होता त्यामुळे प. पू. शंकराचार्य झाल्यावर प्रवचने करतानाही ते एरवी भजन गाऊन दाखवीत असत. एका वर्षी ब्रह्मलीन प. पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती यांच्या पुण्यतिथी उत्सवात ते उपस्थित होते. तेव्हा त्यांची आम्ही सर्व गुरूबंधु भगिनींनी पाद्य पूजा केली होती व रात्री त्यांनी

सुंदर प्रवचन केले होते तेव्हाही त्यांच्या मधुर पदांचा रसास्वाद आम्हांला मिळाला होता.

कोल्हापूरला श्री महालक्ष्मी मंदिराच्या आवारात जानेवारी १ पासून जून अखेरपर्यंत नित्य कोणाची ना कोणाची प्रवचने, कीर्तने होतात असे आम्ही ऐकले होते. पण त्यासाठी आधी देवस्थानाशी संपर्क साधून तारखा ठरविणे आवश्यक असते. याबाबत करवीरपीठाच्या पू. शंकराचार्यांना विनंती केली तर तारखा मिळू शकतील असे आम्हाला कळले होते. १९९० पासून श्री. नागेश गोविंद हेर्लेकर शास्त्री, बेळगांव यांचा उत्तम परिचय झाला होता. ते कीर्तन व प्रवचने उत्तम करीत व श्रीमत् भागवत सप्ताहही करीत असत. तसेच कै. श्री. ना. भा. जोशी यांच्यामुळे त्यांना 'श्रीरामचरितमानसा' ची ही गोडी लागलेली होती. शिवाय शास्त्रोक्त संगीताची चांगली जाण होती. म्हणून त्यांची प्रवचने महालक्ष्मी मंदिराच्या आवारात ठरली तर 'मानस' मराठीचा प्रचार होईल म्हणून त्यास घेऊन मी शुक्रवार पेठेतील शंकराचार्य मठात प.पू.विद्याशंकर भारती स्वामींना भेटावयास गेले. त्यांनी खूप प्रेमाने आमचे म्हणणे ऐकून घेतले आणि मला वाटते 'महालक्ष्मी देवस्थान' च्या विश्वस्तांपैकी श्री. धर्माधिकारी यांना बोलावून घेतले व चर्चा होऊन आम्हाला जानेवारी १९९८ मधील १ ते १० जानेवारी या तारखा मिळाल्या. विशेष म्हणजे सकाळी करवीरपीठाच्या शुक्रवार पेठेतील पू. शंकराचार्य यांच्या मठामध्ये मराठी श्रीरामचरित मानसाचे नवाह पारायण करावे व रात्री महालक्ष्मी मंदिराच्या आवारात रात्री ९ ते १० श्री. हेर्लेकर शास्त्रींनी 'मानसावर' प्रवचने करावीत असे ठरले. त्यावेळी तेथे मंडळाची पुस्तकेही विक्रीस ठेवावयाची असे ठरले. आमची सर्वांची राहण्याची सोय पू. शंकराचार्यांच्या मठांतच पू. स्वामी विद्याशंकर भारती यांच्या अनुज्ञेवरून करण्यात आली. फक्त आम्ही एक आचारी मात्र ठरविला होता. याप्रमाणे सर्व काही ठरले आणि डिसेंबर ३१ ला आम्ही मुक्कामास प. पू. शंकराचार्यांच्या वास्तूत उपस्थित झालो. श्री. हेर्लेकर शास्त्रीही आले. मला आता आठवत नाही पण प्रथम तरी काही दिवस मंगलाताई ओक होती व पू. पूरमवार गुरूजी, सौ. शांता वहिनी व त्यांची भाची मला वाटते अरुणा नावाची, सौ. रेखा पटवर्धन व मी अशी मठातच राहात होतो. मंगलाताई

होती त्यामुळे ९ ला मानसाच्या पारायणाला सुरूवात करण्यापूर्वी आम्ही प. पू. विद्याशंकर भारती स्वामींच्या सत्संगाचा लाभ घेत असू. आम्ही तळमजल्यावर राहात होतो व ते पहिल्या मजल्यावर असत. मंगलाताई त्यांना 'बुद्धित आत्म्याचे प्रतिबिंब पडते म्हणजे काय होते?' अशा सारखे प्रश्न विचारीत असे आणि ते आनंदाने समजावून देत. तेथे रोज शारदांबेचे दर्शन घडत असे व संध्याकाळी रोज महालक्ष्मी मंदिरात जगदंबेचे दर्शनही घडे. शिवाय पारायण प्रवचने असा सर्व वेळ अगदी आनंदात जाई.

आम्ही तेथे असताना श्री. अशोक कुलकर्णी जे 'आनन्दमयी माँ' चे अनुग्रहीत होते ते प. पू. शंकराचार्यांच्या दर्शनास आले होते. तेव्हा त्यांचाही परिचय झाला. त्यावेळी कोल्हापूरातच खाजगी एका ठिकाणी त्यांचा श्रीमत् भागवत सप्ताह सुरू होता. तेव्हा दुपारी ३ ते ६ या वेळात आम्ही एक दिवस येऊन त्यांचे प्रवचन ऐकावे अशी त्यांनी विनंती केल्यावरून आम्ही श्रवणास गेलो होतो. ते सुंदर भागवत सांगतात. नंतर ते मिरजेला माझ्या घरीही आले होते व आमच्या श्रीरामचरितमानस प्रेमी मंडळाचे आजीव सदस्य झाले. त्यांची मेहुणीही त्यांच्याप्रमाणे भागवत् प्रेमी असून प. पू. ब्रह्मचैतन्य महाराज (गोंदिवलेकर) यांची भक्त असून सांगलीत त्यांच्या घरी पू. गोंदिवलेकरांचे उत्सवही होतात. परंडा येथेही एका वर्षी श्री. अशोक कुलकर्णी यांचा श्रीमद् भागवत सप्ताह झाला होता व त्यांच्या मेहुणीचे कीर्तनही झाले होते. त्यानंतर एक दोनदा फोनवर श्री. अशोक कुलकर्णी यांच्याशी बोलणे झाले. प्रत्यक्ष गाठभेट झाली नाही.

पू. स्वामी विद्याशंकर भारती एकावर्षी परंडा येथे श्रींच्या पुण्यतिथी उत्सवास आले होते. तेव्हा त्यांची पाद्य पूजा आम्ही केली होती व त्यांनी प्रवचनही केले होते. दोन वर्षापूर्वी ते समाधिस्थ झाले आहेत.

एकदा ते मिरजेस सौ. रेखा पटवर्धनकडे आले होते. त्यावेळी माझी तब्येत ठीक नव्हती म्हणून मी येऊ शकत नाही असे मी फोनवर बोलले तेव्हा ते म्हणाले, 'तुम्ही येऊ शकत नाही तर मीच तुमचेकडे येतो' आणि ते खरोखर आमच्या घरी आले. या प्रेमाला काय म्हणावे बरे? श्रीराम भैय्याचीच ही कृपा, हो ना?

याशिवाय कोल्हापूर येथील सुप्रसिद्ध श्री. तोडकर महाराज यांनी एक

दिवस दुपारी त्यांची गाडी धाडून श्री. हेर्लेकर शास्त्री यांना मुद्दाम त्यांच्या निवासस्थानी आमंत्रित केले होते. ते हनुमान भक्त होते व त्यांचे वीर मारूतीचे मंदिर होते. तेथे 'भीमरूपी महारूद्रा' या समर्थकृत स्तोत्राबरोबरच गोस्वामी तुलसीदासांच्या 'हनुमान चालिसा' व 'संकटमोचन हनुमान' स्तोत्रांचेही पाठ होत असत आणि त्यांनी तेथे द्रोणागिरी वगैरे हनुमान चरित्रांतील काही देखावेही प्रदक्षिणेच्या वाटेवर कायम दर्शनासाठी तयार केलेले होते. श्री. हेर्लेकर शास्त्रींसाठी गाडी आल्यावर ते आम्हांला आग्रहाने त्यांच्याबरोबर पू. श्री. तोडकर महाराजांच्या निवासस्थानी घेऊन गेले.

तेथे गेल्यावर आम्हांला नेऊन, भोवतालचे आवार, प्रदक्षिणेची वाट सर्व दाखविण्यात आले व सरबत, दूध देऊन आदरातिथ्य करण्यात आले. त्यावेळी पू.तोडकर महाराजांना काय वाटले कोणास ठाऊक ते श्री. हेर्लेकर शास्त्रींना म्हणाले, 'उद्या दुपारी तुम्ही येथे वीर मारूती समोर कीर्तन करा व त्यावेळी या ताईंना अवश्य बरोबर घेऊन या!' असे माझ्याकडे निर्देश करून म्हणाले. त्याप्रमाणे दुसऱ्या दिवशी त्यांनी परत गाडी धाडून आम्हांला बोलावून घेतले. श्री. हेर्लेकर शास्त्री कीर्तनास उभे राहिले. मी मुद्दाम गोंधळ नको म्हणून लांब कट्ट्यावर अरूणासह श्रवणास बसले होते. कीर्तनास पंचपदीने सुरूवात झाली. श्री. तोडकर महाराज अगदी पुढेच जमिनीवर (म्हणजे अर्थात् खाली सतरंजीवर) बसलेले होते. त्यांचा मला निरोप आला की तुम्हाला बोलावले आहे. म्हणून मी उठून त्यांच्या जवळ गेले. तर त्यांनी तेथे आपल्या शेजारीच मला बसवून घेतले. मला धड काही बोलता येईना. झाले एवढेच की कीर्तनात वीररसाचाच अधिक भाग असल्याने कशी तरी वेळ निभावून गेली. खरे तर कीर्तन खूपच रंगले होते.

कीर्तन संपल्यावर वीर मारूतीची आरती झाली आणि श्री. तोडकर महाराजांनी मला वीर मारूतीच्या पुढे बोलावून घेतले. त्यांना माझी काहीच माहिती नव्हती. म्हणून त्यांनी सौ. रेखा पटवर्धनला माझा परिचय करून देण्यास सांगितला व माझा सत्कार केला. नंतर त्यांच्या आवारांतच एक सिंहासन सदृश खुर्ची होती. त्यावर श्री. हेर्लेकर शास्त्रींना बसविण्यात आले आणि दोन्ही बाजूला भालदार चोपदार त्यांच्या विशिष्ट गणवेशात उभे

करण्यात आणि तुतारी वाजविण्यात आली आणि हार वगैरे घालून त्यांचा सत्कार करण्यात आला. छायाचित्रही काढण्यात आले. त्यांनी तेथे कीर्तन सेवा केली होती म्हणून त्यांचा सत्कार झाला हे ठीकच आहे. पण नंतर मला आग्रहपूर्वक त्या खुर्चीवर बसविण्यात आले आणि तसेच भालदार चोपदारांना उभे करून हार घालून तुतारी वाजवून माझाही सत्कार करण्यात आला.

त्यावेळी सौ. अरुणा व सौ. रेखा दोघी दोन बाजूस माझ्या पायापाशी बसल्या होत्या. आमचेही छायाचित्र काढण्यात आले. नंतर आम्ही त्यांच्या गाडीतून परत जाण्यास निघालो तेव्हा पू. तोडकर महाराज स्वत: आम्हाला निरोप देण्यास गाडीपाशी आले होते.

***

## पू. श्री. वामनराव पै

आम्ही जे. जे. हॉस्पिटलच्या कर्मचारी निवासात राहात होतो. तेव्हा मी पू. श्री. वामनराव पै यांचे नाव ऐकले. ते दादरला राहात होते. पण मुंबईला बऱ्याच उपनगरांतून त्यांची व्याख्याने होत असत आणि तृतीय, चतुर्थ वर्गातील कर्मचारी व गिरणी कामगार वगैरे लोकांवर त्यांचा खूपच प्रभाव पडलेला होता. कित्येक लोक व्यसनमुक्त होऊन त्यांचे जीवन, राहाणीमान वगैरे सुधारले होते. मीही त्यांची एक दोन व्याख्याने ऐकली होती व 'नामाचा नंदादीप' वगैरे ग्रंथही वाचलेले होते. माझी थोडीफार ओळखही झाली होती.

प.पू. आचार्य किशोरजी व्यास यांचा श्रीमत् भागवत सपताह, मालाड येथे ठरला होता. तो मुंबईतील त्यांचा पहिला सप्ताह होता. अद्याप मुंबईत त्यांचे नांव फारसे झाले नव्हते. तेव्हा त्यांच्या श्रीमत् भागवत सप्ताहाच्या सुरूवातीस कुणातरी प्रसिद्ध व्यक्तीला दीप प्रज्वलन करून उद्घाटनाला बोलवावे असा विचार सुरू होता. म्हणून मला वाटते पू. वामनराव पै यांना बोलवावे. म्हणून त्यांना भेटून विनंती करण्यात आली व त्यांनी अनुमतीही दिली. ते दादरला राहात होते आणि श्रीभागवत सप्ताह मालाडला होता. रामभैय्याच्या कृपेने चि. डॉ. रमेशने ही जबाबदारी स्वीकारली. कारण श्री.

श्रीरामजी गिल्डा, मी वगैरे आधीच दोन दिवस व्यवस्था बघण्यासाठी मालाडला जाऊन राहिलो होतो. ठरल्याप्रमाणे ते चि. रमेश बरोबर वेळेवर कथा मंडपात आले व त्यांच्या हस्ते दीप प्रज्वलन व उद्घाटन झाले. कथा समाप्त झाल्यावर पू. किशोरजी व्यास उतरले होते तेथेही ते आले होते. तेथे थोडावेळ सत्संग संभाषण झाल्यावर चि. रमेशबरोबर ते परत आपल्या घरी गेले. त्यांचे एक पत्र माझ्याजवळ आहे. नंतर मुंबई सुटल्यावर त्यांच्या दर्शनाचा योग आला नाही.

***

## प. पू. नाना गद्रे

माझा भाऊ चि. सुरेश यांच्यामुळे श्री. विश्वनाथ यशवंत गद्रे उर्फ ती. नाना गद्रे यांची ओळख झाली. मी लिहिलेले ब्रह्मलीन श्रीसद्‌गुरु प्रज्ञानानंद सरस्वती स्वामी महाराजांचे चरित्र चि. सुरेशने ती.नानांना दिले. ते वाचून त्यांनी त्यांचे सद्‌गुरु प. पू. श्री नामदेव महाराजांचे 'चरित्र सुगंध' हे चरित्र मला भेट म्हणून धाडले. ते वाचून ती. नानांबद्दल व प. पू. नामदेव महाराज तसेच प. पू. कुंभार गल्ली, कोल्हापूर येथील प. पू. अक्कलकोटच्या स्वामी समर्थांचे शिष्य प. पू. कृष्णानंद सरस्वती यांच्याबद्दलही प्रेमादर उत्पन्न झाला. केवळ श्री सद्‌गुरूंच्या सांगण्यावरून सर्वांचा त्याग करून त्यावर



तुलसीपत्र ठेवणाऱ्या श्री. नामदेव महाराजांबद्दल तर फारच आदर उत्पन्न झाला म्हणून एकदा तरी ती. नानांना भेटावे अशी इच्छा उत्पन्न झाली. म्हणून मी एकदा पुण्याला गेले होते तेव्हा सौ. पुष्पाजवळ सहज बोलले तेव्हा ती तत्परतेने मला त्यांच्या घरी घेऊन गेली.

मला वाटते की गोष्ट १९९३ मधील असावी. आम्ही सकाळी ९।।/१० च्या सुमारास प्रभात रोड, गल्ली दुसरी मधील त्यांच्या घरी गेलो. तेव्हा कळले की त्यांचे हार्नियाचे ऑपरेशन नुकतेच झाले होते आणि ते आदले दिवशीच घरी आलेले होते. सौ. पुष्पाने आमची ओळख करून दिली व मग त्यांना व त्यांच्या सौ. पत्नीला नमस्कार करून मी त्यांच्याशी बोलू लागले. मी त्यांना म्हटले की, 'आपल्या श्री सद्गुरूंचा फोटो कुठे आहे? आपण रोज उपासनेला कोठे बसतां?' तेव्हा ते म्हणाले की माडीवर त्यांचे छायाचित्र असून ते रोज तेथेच साधना करतात. पण त्यांचे ऑपरेशन झाले असल्याने ते आत्ता आमच्याबरोबर माडीवर येऊ शकत नाहीत. मग त्यांनी सौ. पुष्पास म्हटले की, तू माडीवर ताईला घेऊन जा आणि महाराजांचे दर्शन घडव. हे ऐकून आम्ही दोघी उठून माडीवर गेलो. तेथे मी पाहिले तर श्री नामदेव महाराजांचे मोठे छायाचित्र दिसले, जणू काही ते प्रत्यक्ष तिथे बसले होते.

मी सौ. पुष्पाला म्हटले 'आपण येथे थोडावेळ बसू या' आणि आम्ही त्यांना नमस्कार करून तेथे सतरंजीवर बसलो. मी श्री महाराजांची मनातल्या मनात प्रार्थना केली की 'महाराज! मी आपल्याबद्दल इतके वाचले आहे तर जरा मलाही आपल्या सामर्थ्याची जरा चुणूक दाखवा ना!' आणि मी डोळे मिटले मात्र की वृत्ती इतकी अंतर्मुख झाली की काय सांगावे? सौ. पुष्पा तेथून उठून केव्हा खाली निघून गेली हे मला कळलेच नाही. नंतर कितीवेळ गेला कुणास ठाऊक पण एकदम अंतरात जाणीव झाली की आता उठले पाहिजे पण वृत्ती बाहेर येण्यास तयार नव्हती. शेवटी मनांत महाराजांची प्रार्थना केली की 'महाराज! आतां मला जाऊं दे' अशी प्रार्थना केल्यावर वृत्ती हळूहळू बहिर्मुख होऊ लागली व मग मला उठता आले.

मी जिन्यावरून उतरून येऊन खाली हॉलमध्ये सौ. पुष्पाजवळ बसले. तेव्हा ती. नानांनी विचारले, 'काय म्हणाले आमचे महाराज!' मी म्हटले, 'तुमच्या महाराजांनी तर सर्व दारेच बंद करून टाकली. वृत्ती

बाहेरच येईना तर उठणार कसे?' यावर नाना फार प्रसन्न झाले. यानंतर आमच्यांत आत्मीयता निर्माण झाली. १९९४ फेब्रुवारीमध्ये मला हृदयविकाराचा थोडासा त्रास झाला होता. हे कळल्यामुळे त्यावर्षी कोल्हापूरला प. पू. नामदेव महाराजांच्या उत्सवाला जाता जाता पूज्य नाना मुद्दाम आमच्या घरी भेटण्यासाठी आले. येण्यापूर्वी त्यांनी सौ. कमल थत्तेकडून मला मुद्दाम निरोप धाडला होता. त्यांच्याबरोबर श्री. श्रीराम उर्फ भाऊ कुलकर्णी, श्री. दुर्वे वगैरे मंडळीही होती. आमच्याकडे थोडा फराळ करून सरबत वगैरे घेऊन ते निघाले. पण जाण्यापूर्वी ती. नानांनी मला एक शाल दिली म्हणजे चक्क पांघरली. मी म्हटले, 'नाना! हे काय?' तेव्हा म्हणाले, 'काही नाही! ही तू पांघर म्हणजे तुला काहीही होणार नाही!' आता यावर काय बोलणार?

यानंतर २/३ वर्षे ओळीने ते कोल्हापूरला जाताना माझ्याकडे येत होते. नंतर मिरजेतच त्यांची गुरूभगिनी ती. सुभद्रा आजी यांच्याकडे ते थांबत व मला तेथेच बोलावून घेत. माझ्याबरोबर बहुतेक सौ. रेखा पटवर्धन असे. तिला ते माझी 'सावली' म्हणत. एकावर्षी ते सौ. कमल थत्तेच्या घरी थांबले होते. तेथेच सौ. रेखा व मी ही गेलो होतो. तेथे श्री. गोखले (लालाजी) यांचा परिचय झाला. ती. नानांबरोबर एकदा सौ. रेखा व मी म्हैसाळला पू. मालती बाळ यांच्याकडेही गेलो होतो. तसेच आणखी एकदा एका दत्त देवस्थानांत गेलो होतो. त्यांच्या संपर्कात आले की स्वप्नात देवदर्शने घडत एवढे मात्र खरे.

बेळगांव येथील वाङ्‌मयचर्चा मंडळ तर्फे मी Ph.D. साठी लिहिलेल्या 'एकनाथी भागवता' वरील प्रबंधानिमित्त मला पारितोषिक जाहीर झाले होते. आम्ही बेळगांवला १९६६ ते १९७३ होतो. तेथील बऱ्याच मंडळीशी घरोबा होता. शिवाय माझा भाचा डॉ.श्रीकांत व सून डॉ. सौ. नलिनी यांचीही भेट होईल. म्हणून चि. डॉ. रमेश व मी बेळगांवला गेलो. तेथे श्री. कुलकर्णी यांनाही श्रीगुरुचरित्रावरील ग्रंथासाठी पारितोषिक जाहीर झाले होते. ते घ्यावयास त्यांच्या तर्फे त्यांची पत्नी आली होती. समारंभाच्या अध्यक्ष स्थानी सांगलीच्या डॉ. तारा भवाळकर होत्या. त्यांचे भाषणही झाले. विशेष म्हणजे त्यांच्या बरोबर आलेल्या व्यक्तींनी आमचे फोटो

काढले होते आणि आम्ही मिरजेला गेल्यावर ४/६ दिवसांनी डॉ. तारा भवाळकर यांनी आम्ही न मागताही फोटोच्या प्रती आमच्याकडे धाडून दिल्या हे विशेष होय! ही रामभैय्याचीच कृपा नाही कां? पूज्य नानांना मला पारितोषिक मिळाल्याचे कसे कळले कुणास ठाऊक! पण त्यानंतर परत जेव्हा त्यांची गाठ पडली तेव्हा त्यांनी परत मला एक शाल दिली! मी परत विचारले की, 'हे काय नाना?' तेव्हा ते म्हणाले, 'अगं लोक तुझे इतके कौतुक करतात, तर मला नको कां करायला?' असे पित्याच्या वत्सलतेला शोभणारे उत्तर त्यांनी दिल्यावर मला गप्पच बसावे लागले. पण त्यांचे प्रेम, वात्सल्य पाहून अंत:करण भरून आले एवढे मात्र खरे!

नंतर पूज्य नानांना कळले की मी ब्रह्मलीन श्री सद्गुरू प्रज्ञानानंद सरस्वती स्वामी महाराजांच्या 'मानस गूढार्थ चंद्रिका - प्रस्तावना खंड' या मराठी ग्रंथाचे हिंदीमध्ये भाषांतर केले आहे. तेव्हा त्यांनी डॉ. हणमंते (यु.एस.ए.) यांनी इंग्रजीत लिहिलेले पूज्य श्री स्वामी समर्थ (अक्कलकोट) यांचे चरित्र माझ्याकडे धाडून मला आदेश दिला की त्याचे हिंदीमध्ये भाषांतर करावे. त्यांचा आदेश मानून मी इंग्रजी-हिंदी शब्दकोशाच्या मदतीने त्या ग्रंथाचा हिंदी अनुवाद केला व पू. नानांच्या स्वाधीन केला. पण तो अद्याप अप्रकाशित आहे. त्याचे मराठी भाषांतर पू. नानांच्या आज्ञेवरून श्री. श्रीराम उर्फ भाऊ कुलकर्णी यांनी केलेले प्रकाशित झाले आहे. हे लेखन मी केल्यावर परत पू. नानांनी माझा सत्कार केला! त्यांना माझ्याबद्दल खूप कौतुक होते, वात्सल्य होते आणि अपार कृपाही त्यांनी मजवर केली.

एकेवर्षी मला वाटते सन २००१ मध्ये असेल ते कोल्हापूरहून मिरजेला आले होते तेव्हा मी मथुरा आजींकडे जाऊ शकले नाही. तेव्हा तेच मला भेटण्यासाठी आमच्या घरी आले. पण तेव्हा त्यांची तब्येत ठीक नव्हती म्हणून ते गाडीतच बसून राहिले होते. मी खाली जिना उतरून येऊन ते बसले होते त्या गाडीच्या दाराजवळ खुर्चीवर बसले व त्यांना प्रणाम करून त्यांचे आशीर्वाद घेतले. ती आमची शेवटी भेट ठरली. नंतर २३ डिसेंबर २००१ या दिवशी त्यांनी पार्थिव देहाचा त्याग केला व ते ब्रह्मलीन झाले.

***

## चि. सौ. पद्मावन्स उर्फ उमाताई गोडबोले

मीराताईमुळे सहज यांची आठवण झाली आणि त्यांनी स्वत:च सांगितलेला त्यांच्या आयुष्यातील एक अनुभव येथे सांगावासा वाटतो आहे. त्यांनी सांगितलेली घटना केव्हा घडली हे सांगता येत नाही. पण साधारण १९७५-७६ मधील असावी. सौ. पद्मावन्सना टाटा कॅन्सर हॉस्पिटलमध्ये ऑपरेशनसाठी प्रविष्ट व्हावे लागले होते. कसला आजार होता मला माहीत नाही. पण ऑपरेशनची सर्व तयारी करण्यात आली होती आणि ऑपरेशनवेळी घालण्यात येतात ती वस्त्रे घालून त्यांना ऑपरेशन टेबलवरही झोपविण्यात आले होते. त्या रोज 'गजानन विजय' वाचत असत म्हणून भगवत् स्मरण करीत पडून राहिल्या होत्या. एवढ्यांत त्यांच्या उजव्या बाजूस कोणी तरी उभे आहे असे त्यांना जाणवले. म्हणून पडल्या पडल्याच त्यांनी मान वळवून पाहिले तर शेजारी कुणी उंच सुदृढ गोरापान नग्न पुरूष उभा आहे असे दिसले. तेव्हा त्या इतक्या घाबरल्या की आपल्या अंगावर धड व्यवस्थित कपडेही नाहीत आणि ही कोण व्यक्ती अशा प्रकारे येथे ऑपरेशन - थिएटरमध्ये उपस्थित झाली आहे. त्यांना त्या व्यक्तीचा चेहरा पाहिलाच नव्हता आणि घाबरून डोळे घट्ट मिटून घेतले. थोड्या वेळाने धीर करून डोळे उघडून पाहिले तर तेथे कोणीच नव्हते.

थोडा वेळ मध्ये गेला आणि काय झाले कुणास ठाऊक डॉ. देसाई आंत आले आणि त्यांनी ऑपरेशनची आवश्यकता नाही असे जाहीर केले आणि थोड्याच वेळात त्यांना ऑपरेशन थिएटरमधून बाहेर आणण्यात आले आणि यथासमय त्या घरी येऊन पोहोचल्या. यावेळी त्यांना जावणले की, श्री गजानन महाराजांनीच हा चमत्कार घडवून आणला असावा. या घटनेचा त्यांच्या जीवनावर असा परिणाम झाला की त्यांना वाटले की, श्रीगजानन महाराजांच्या कृपेने आपल्याला हे बोनस आयुष्य लाभले आहे. आत्तापर्यंत आपण बारीक सारीक गोष्टीवरून लोकांशी अबोला धरत राहिलो, नीट वागलो नाही. आमचेच बरोबर असे धरून चालत होतो, लोकांना दोषी समजत होतो यामुळे आयुष्यातील आनंद हरवून बसलो हे किती चुकीचे आहे. आता भगवत् कृपेने बोनस आयुष्य लाभले आहे तर

त्याचा सदुपयोग केला पाहिजे असा निश्चय त्यांनी केला आणि त्याप्रमाणे सर्वांशी प्रेमाने आणि आदराने वागण्यास सुरूवात केली आणि त्यामुळे त्यांना अत्यंत समाधान लाभले. त्यांच्याचकडून हे सर्व ऐकून माझे अंत:करण खरोखर भरून आले. निर्दोष व्यक्ती कुणीही नसते. प्रत्येकाच्या ठिकाणी गुण व दोष दोन्ही असतात. आपण आपल्यांतील दोष जाणून ते दूर करण्याचा कसोशीने प्रयत्न केला पाहिजे. लोकांचे मूल्यमापन करण्याचा अधिकार आपल्याला नसतो. संत नेहमी गुणग्राही असतात. आपणही तसेच बनण्याचा प्रयत्न करायला हवा नाही कां? पुढे त्यांना अकस्मात देवाज्ञा झाली. पण त्यांनी माझ्याजवळ मन मोकळे करून हा जो अनुभव सांगितला तो मी विसरू शकत नाही.

***

**प.पू. बाबामहाराज सातारकर**

सन १९६६ नोव्हेंबर पासून आम्ही बेळगांवात होतो. प्रथम आम्ही आमराई भागांत राहात होतो. तेव्हा त्याच भागांत राहणाऱ्या श्री. इंदिराबाईघाणेकर (वहिनी) यांच्याकडे मी रोज दुपारी ३.०० ते ५.०० सत्संगासाठी जात असे. श्री. घाणेकर कुटुंब प.पू. गोंदवलेकर महाराजांच्या द्वारा अनुग्रहित होते. प्रत्यक्ष श्री महारांजांनी श्री. वहिनींच्या सासऱ्यांना खडावा दिल्या होत्या. त्या चांदीने मढवून त्यांच्या देव्हाऱ्यात ठेवलेल्या होत्या व देवघरात कळसासह त्यांनी छोटे मंदिरच बनवले होते. त्यांच्या घरी श्री ब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराजांची पुण्यतिथि व श्रीगुरूपौर्णिमा वगैरे उत्सव साजरे होत. आठ दहा जणी जमून दर एकादशीला संपूर्ण गीतेचा पाठ करीत. श्रीसद्गुरू कृपेनेच मला त्यांची सत्संगति लाभली होती. त्यांच्या उत्सवांत मी सहभागी होत असे. श्री. घाणेकर यांच्याकडे श्रीमत् भागवताचा संपूर्ण मराठी अनुवाद मी क्रमश: वाचला. त्यास दीड वर्ष लागले. त्या सर्व भगिनी उत्तम साधक होत्या व माझ्यावर अतिशय प्रेम करीत असत. श्री. घाणेकर वहिनींशी तर परत आम्ही मुंबईला जे.जे. हॉस्पिटलच्या कर्मचारी निवासात राहात असतांनाही त्यांचा मोठा मुलगा श्री. अनंतराव भायखळ्यातच राहात असल्याने संबंध आला. प.पू. स्वामी

तेजोमयानंदजी व त्यांच्या पूज्य मातोश्री आमच्या घरी दुपारी भिक्षेसाठी आली होती. तेव्हा मी मुद्दाम श्री. घाणेकर वहिनींनाही बोलावले होते. त्यांनी मला गोंदिवले येथील उपासनेची कॅसेट भेट दिली होती.

आम्ही १९६८ मध्ये काळ्या आमराईतून मारुती गल्ली बेळगांव येथे राहावयास आलो. तेव्हां मारूती गल्लीतच राहणाऱ्या चि. विजया धोपेश्वरकरची ओळख झाली. ती मराठी एम्.ए. असून लिंगराज कॉलेजमध्ये मराठीची प्राध्यापिका होती. तिच्या ओळखीमुळे मला प्रा. कृ. ब. निकुंब यांची मराठी साहित्यावरील व्याख्याने ऐकावयास मिळाली व पुढे मराठी Ph. D. साठी त्यांचे मार्गदर्शनही मिळाले. त्यावेळी जो घरोबा निर्माण झाला होता तो टिकून होता. पण १९८२ पासून १९९३ पर्यंत आम्ही बारा वर्षे मुंबईला होतो तेव्हा गांठभेट झाली नाही. नंतर १९९३ मध्ये आम्ही मिरजेस आल्यावर परत गांठीभेटी होऊ लागल्या. ती कॉलेजातून निवृत्त झाल्यावर तिने पू. बाबामहाराज सातारकर यांचा अनुग्रह घेतला होता व तिची ठिकठिकाणी प्रवचने व कीर्तनेही होऊ लागली होती. तिचा आवाज मधुर होता, संगीताची जाण होती आणि संतसाहित्याचा प्रदीर्घ व्यासंग आणि पाठांतरही उत्तम होते. त्यामुळे तिची लोकप्रियता वाढत होती. शिवाय मुख्य म्हणजे तिला गुरूकृपा लाभली होती!

पू. बाबा महाराजांचा निकटचा सहवास तिला लाभला होता व 'ऐश्वर्य ज्ञानेश्वरी' च्या प्रकाशनांत तिचा मोलाचा सहभाग त्यांच्या कृपेने तिला लाभला होता. ती चिन्मय मिशनच्या टोप-संभापूर येथील एक महिन्याच्या दीर्घकालीन शिबिरातही सहभागी होत असे. शिवाय 'वेलियाड' वगैरे ठिकाणच्या ज्ञानयज्ञातही तिने श्रवणाचा लाभ घेतला होता. मिरजेला वेण्णास्वामींच्या मठातही तिला २/४ वेळा कीर्तनासाठी आमंत्रित करण्यात आले होते. त्यामुळे आम्ही दोघी परत एकमेकीच्या सहवासात आलो. त्यामुळे मी तिला माझ्याबरोबर परंडा येथे येण्याचा आग्रह केला आणि तिनेही मान्य केले.

त्यावेळी पू. बाबा महाराज सातारकर यांच्या कुटुंबियांसह त्यांच्या पंढरपूर येथील वाड्यात मुक्कामास होते. आम्ही मिरजेहून टाटा सुमोने परंड्यास जाण्यास निघालो त्यावेळी श्री. श्रीरामजी गिल्डाही परंड्यास

येण्यासाठी मिरजेस आले होते. आम्ही सर्व अगदी लवकर मिरजेतून निघालो आणि ९.०० ते ९.३० च्या सुमारास (सकाळी) पंढरपुरात पोहोचलो. प्रिय विजयाताई बरोबरच होती. पू. बाबा महाराजांचा वाडा नदीकाठी अगदी आमच्या वाटेवरच होता. तेथे गाडी थांबवून आम्ही माडीवर गेलो. तेथे पू. बाबामहाराज, त्यांच्या सौ. पत्नी व त्यांची बहीण आदि सर्वांची भेट झाली. त्यांनी प्रेमाने आमचे स्वागत केले. विजयाताईने ओळख करून दिली. तेव्हा मी त्यांना सांगितले की, माझ्या वन्स श्री. कमलाबाई जोग ह्या गिरगांव येथे राहात होत्या व त्या कांदेवाडीत नित्य त्यांच्या मठांत प्रवचनास, कीर्तनास येत असत. तेव्हा त्यांना फार आनंद झाला व ते म्हणाले की, अगदी बरोबर, त्यांची चांगलीच ओळख होती. त्या प्रवचन लक्षपूर्वक ऐकत आणि त्यांतील आशयाशी समानार्थक श्रीरामचरितमानसांतील चौपाया दोहे दुसऱ्या दिवशी म्हणून दाखवित असत. त्यांच्या पत्नीनाही वाटले की मी जणु जुन्या ओळखीचीच निघाले. नंतर मला कळले की, त्यांचे बाय-पास (ह्रदयविकाराचे) ऑपरेशन झाले आहे. मी सहज त्यांना विचारले, 'आपले वय काय?' ते म्हणाले, 'बहात्तर पूर्णफ मी म्हटले, 'म्हणजे आपण माझ्यापेक्षां लहान आहात वयाने!' त्यावर ते म्हणाले, 'मी सर्वांच्याच पेक्षा लहान आहे.' मी म्हटले, 'बरोबर आहे' म्हणूनच तुकाराम महाराज म्हणातात की, 'लहानपण देगा देवा!' नंतर चहापाणी झाले. पू. बाबामहाराजांनी 'रामकृष्ण हरी' या त्यांच्या भजनाची कॅसेट मला भेट दिली व बनगरवाडी येथील त्यांच्या नवीन मंदिराच्या प्राणप्रतिष्ठा समारंभास आम्ही सर्वांनी यावे म्हणून प्रेमाने सर्वांना स्वहस्ते आमंत्रणपत्रिकाही दिल्या. नंतर आम्ही सर्व दाराशी आलो आणि मी खुर्चीवर बसून पायांत सँडल्स घालायला लागले, तेवढ्यांत विजयाताई माझ्याजवळ येऊन म्हणाली की, तुम्ही विठ्ठलाची सोन्याची मूर्ती पाहिलीत की नाही? मी म्हटले, 'नाही! कुठे आहे मूर्ती? पायात सँडल्स घालायच्या आधी तरी सांगायचे?' पूज्य बाबामहाराज दारापर्यंत पोहोचवायला आलेलेच होते. त्यांनी हे सर्व ऐकून ते म्हणाले, 'असूं दे' मग त्यांनी चिमटीत स्वतःच्या हाताची त्वचा धरली आणि म्हणाले, 'हे काय आहे? चामडेच तर आहे ना? चला दर्शन घ्यायला!' आणि ते मला त्यांच्या देवापुढे घेऊन गेले आणि मी त्यांच्या

त्या सोन्याच्या सुंदर विठ्ठल मूर्तीचे दर्शन घेतले, नमस्कार केला आणि आम्ही सर्व परत फिरलो. त्यानंतर फक्त एकदा फोनवर त्यांच्याशी बोलणे झाले तेवढेच! पण संतांचे सहज बोलणे हा हितोपदेश कसा असतो याचा अनुभव आला आणि खूप आनंद झाला. त्यांचे ते एकच वाक्य त्यांची थोरवी सांगून गेले हे मात्र खरे!

***

## श्री.अण्णाबुवा कालगांवकर

सातारला समर्थ सदनमध्ये मंगलाताई ओक हिची कीर्तने चालू होती तेव्हा तिचा मुक्काम तेथेच असताना एक दिवस मुद्दाम मी मिरजेहून सवड काढून सातारला समर्थ सदनमध्येच मुक्कामास गेले होते. तेव्हा पूज्य अण्णाबुवा कालगांवकर यांचाही मुक्काम तेथेच होता. तेव्हा आम्ही गुरुभगिनींनी विनंती केली म्हणून ते रोज सकाळी ९ll/१० वाजता श्रीरामगीतेवर आमच्यासाठी प्रवचने करीत. मंगलाताईचा कार्यक्रम संध्याकाळी असे. मी गेले त्यादिवशी मला तिचा कार्यक्रम ऐकता पाहता आला. रात्री तेथेच मुक्काम केला व दुसरे दिवशी पूज्य अण्णाबुवांचे फक्त एक प्रवचन ऐकून मी सातारहून निघाले. ते मधूनच म्हणायचे 'लक्षांत घ्या, रामप्रभु लक्ष्मणास हा उपदेश देत आहेत' यावरून वक्ता व श्रोता दोन्ही किती अधिकारी होते याकडे ते लक्ष वेधून घेत होते हे मला जाणवत होते. त्यांचा पारमार्थिक अधिकार फार थोर होता हे त्यांच्या चरित्रावरून कळून येते. त्यानंतर आम्ही १९८६-८७ मध्ये डॉ.माधव गोगटेबरोबर सज्जनगड दर्शनास गेलो होतो तेव्हा परत त्यांचे दर्शन झाले. पण आम्ही गड चढून गेलो होतो आणि ते गड उतरून जाण्याच्या तयारीत होते. त्यामुळे अगदीच औपचारिक 'राम राम' म्हणून प्रणाम करण्याव्यतिरिक्त जास्त काही लाभ घेता आला नाही. पण संत दर्शनाने पापनाश जरूर होतो यावर माझी दृढ श्रद्धा असल्याने त्या ओझरत्या दर्शनानेही आनंद झाला.

***

## डॉ. श्रीखंडे

प. पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती हे इस्लामपूर येथे आमच्या घरी वास्तव्यास असताना १९५३ नंतर केव्हातरी डॉ. श्रीखंडे हे कोल्हापूरहून त्यांच्या दर्शनासाठी आले होते. त्यांचे श्रीरामचरितमानसावर प्रेम असल्याने ते आले तेव्हा 'मानसा' वरील चर्चा खूप रंगली होती एवढे चांगले आठवते. त्यांचे 'सुश्लोक मानस' हे पुस्तक त्यापूर्वीच प्रसिद्ध झालेले होते. मी घरीच असे त्यामुळे पू. स्वामींच्याकडे कुणी आले तरी त्यांच्याशी जे संभाषण होई त्याच्या श्रवणाचा लाभ मला घेता येत असे.

***

## डॉ. कृ. पा. कुलकर्णी

हे पण एकदा मुद्दाम श्रीं चे दर्शनास आले होते. त्यांच्या वागण्यावरूनच त्यांचा पू. स्वामींच्या विषयीचा आदर व्यक्त होत होता. या लोकांची परत कधी गांठभेट झाली नाही. पण एकाच भेटीत त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची छाप दुसऱ्यावर पडेल अशी विद्वत्ता आणि सौहार्द्र त्यांच्या ठिकाणी होते!

***

## डॉ. रा. चिं. ढेरे

श्री. आदिनाथ यादव ह्यांच्यामुळे डॉ. रा. चिं. ढेरे यांचा परिचय झाला व त्यांनी 'श्री प्रज्ञानानंद सरस्वती' हा ग्रंथ 'संतकृपा' तर्फे 'संतचरित्रमात्रेतील पहिले पुष्प' म्हणून प्रकाशित झाला तेव्हा त्यास छानशी प्रस्तावनाही लिहून दिली होती. अगदी पहिल्याने मी त्यांच्या घरी गेले तेव्हा ते जुन्या वाड्यात राहात होते. नंतर दोनदा गेले तेव्हा ते तुळशीबागवाले कॉलनीतील 'विदिशा' या त्यांच्या प्रशस्त बंगल्यात राहात होते. ते संत साहित्याचे गाढे अभ्यासक आहेत व माझ्या श्री सद्गुरूंच्याविषयी त्यांना अत्यंत आदरही आहे. त्यामुळे त्यांच्याविषयी मला खूप प्रेमादर वाटतो. त्यांच्या बंगल्यातील पहिल्या मजल्यावर त्यांचे ग्रंथालय आहे. मी त्यांच्या घरी गेले असतां वर त्यांच्या ग्रंथालयात गेले असता त्यात इतकी हरवून गेले की तेथून निघताना माझी पर्स तिथेच विसरले. नंतर रिक्षातून मुक्कामाच्या ठिकाणी गेल्यावर लक्षांत आल्यावर मी त्यांना फोन केला. तेव्हा मला कळले की त्यांना ती

पर्स दिसल्यावर ती घेऊन ते लगेच माझे गुरूबंधु व गुरूभगिनी श्री व सौ. अन्नछत्रे यांचे घर त्यांच्या घराजवळच असल्याने त्यांच्याकडे गेले व माझी पर्स देऊन आले. आता अलिकडे १/२ वेळा त्यांच्याशी फक्त फोनवर बोलणे झाले पण प्रत्यक्ष भेटीचा योग आला नाही.

***

## परम श्रद्धेय स्वामी रामसुखदासजी महाराज

मुंबईत स्वामी रामसुखदासजी महाराजांची प्रवचने चालू होती. ते काळबादेवी येथे राठी भवन येथे उतरलेले होते. श्री. श्रीरामजी गिल्डा त्यांच्या प्रवचनास जात असत. त्यांचा फोन आला की पूज्य रामसुखदासजी महाराज राठी भवन काळबादेवी येथे उतरले आहेत. मी डोंबिवलीहून परस्पर तेथे येतो. तुम्ही दुपारी ३।/३।। पर्यंत तेथे यावे. त्याप्रमाणे मी माझी मैत्रिण श्री. सुमति पाध्ये ह्यांना घेऊन बेस्टच्या बसने (जे. जे. हॉस्पिटलमधून निघून) काळबादेवी येथे राठी भवनशी जाऊन पोहोचले तेवढ्यात श्री. भाऊही तेथे येऊन पोहाचले. आम्ही सर्व पहिल्या मजल्यावर गेलो व तेथे आम्ही पूज्य रामसुखदासजी यांच्या दर्शनासाठी आलो आहोत असे सांगितले. आम्ही प. पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती यांनी लिहिलेल्या 'मानस गूढार्थ चंद्रिका' या हिंदी भाष्य ग्रंथाच्या काही भागाची झेरॉक्स कॉपी नेली होती व ती पू. महाराजांना दाखवावी अशी आमची इच्छा होती. तेथे आम्हांला रस्त्याकडील बाजूस असलेल्या एका खोलीत बसण्यास सांगण्यात आले आणि 'श्री महाराज आत्ता थोड्या वेळात येतील. पण त्यांचे प्रवचन पाचला सुरू होते. पण वाहतुकीच्या समस्येमुळे चार वाजताच घरातून निघावे लागते. तरी आम्ही त्यांचा जास्त वेळ घेऊ नये' असे सुचविण्यात आले.

पाच-सात मिनिटातच पू. महाराज त्या खोलीत आले. आम्ही सर्व उठून उभे राहिलो. ते त्यांच्यासाठी अंथरलेल्या आसनावर जाऊन बसले व आम्हांला बसण्यास खुणेने सुचवले. त्याप्रमाणे नमस्कार करून आम्हीही सतरंजीवर बसलो. त्यांनी आम्ही कुठून आलो, आमची नांवे काय याची चौकशी केली. तेव्हा श्री. भाऊंनी त्यांचे नांव सांगून ते डोंबिवलीहून

आल्याचे सांगितले आणि आम्ही दोघींनी आमची नांवे सांगून आम्ही जे. जे. हॉस्पिटलमधून आल्याचे सांगितले. नंतर मी विचार केला की संतांच्या दर्शनास गेले की आपण काही प्रश्न विचारून त्यांना बोलते केले नाही तर ते स्वत:हून काहीच उपदेश करणार नाहीत. म्हणून आपणच प्रश्न विचारावा. पूर्वी पू. डोंगरे महाराजांच्या दर्शनास गेलो होतो. तेव्हा त्यांना प. पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती यांचे चरित्र भेट दिले होते ते वाचून व त्यातील मजकूर वाचून त्यांनी मी श्रीरामप्रभूंशी भावाचे नाते कसे काय जोडले, या नात्याने भगवंतांशी अधिक सलगी होते म्हणून हे योग्य नाही असे म्हटले होते. तेव्हा मी म्हटले होते की ते तर दीनबंधु आहेत. शिवाय द्रौपदीनेही त्यांना बंधु मानले होते! यावर पू. डोंगरे महाराज म्हणाले होते, 'द्रौपदीची गोष्टच वेगळी आहे. ती अयोनिजा होती, याज्ञसेनी होती. तिची बरोबरी कशी करता येईल?' ही घटना घडल्यानंतर माझा श्रीसद्गुरूंच्यावर पूर्ण विश्वास असल्याने मी भावाचेच नाते मनांत दृढ धरून उपासना करीत होते. पण त्यावेळी मला वाटले की पू. रामसुखदासजी महाराजांना हा प्रश्न विचारावा तर त्यांच्या तोंडून आपोआपच काही अमृतवचने ऐकावयास मिळतील! म्हणून मी साहस-धाडस करून त्यांना विचारले की, 'मैं रामप्रभू को भाई मान सकती हूँ क्या?' आणि काय सांगू? पूज्य महाराज इतके प्रसन्न झाले की काय सांगावे? ते म्हणाले, 'अवश्य मान सकती हो! क्यों नहीं? आणि त्यांनी हिंदीतूनच बंधु म्हणून भाई म्हणून रामाला कसे आळवावे' हे सांगायला सुरूवात केली! आणि माझे अंत:करण प्रेमाने आणि आनंदाने इतके भरून आले की डोळ्यातून अश्रु वाहू लागले व इतके रडू कोसळले की हुंदके आवरेनात! आता त्या गोष्टीला इतकी वर्षे उलटून गेली आहेत तरी हे सर्व लिहिताना पुन: प्रत्ययाचा आनंद होऊन तशीच अवस्था होत आहे!

पू. महाराज प्रसन्न आहेत हे बघून आम्ही त्यांना 'मानस गूढार्थ चंद्रिके' च्या एका हिंदी भागाची झेरॉक्स प्रतही दाखवली. त्यांनी हातात घेऊन ती वही चाळून पाहिली व व परत आमच्याकडे दिली. एवढे होईपर्यंत चार वाजायला आले होते. त्यांनाही निघायला हवे होते म्हणून आम्ही नमस्कार करून जाण्यासाठी निघालो तेव्हा त्यांनी आम्हांला थांबण्यास सांगितले आणि स्वत: आतील खोलीत जाऊन 'साधक संजीवनी'

हा त्यांचा प्रकाशित झालेला गीतेवरील बृहत् ग्रंथ घेऊन आले आणि प्रसाद म्हणून तो आम्हांला दिला. तो ग्रंथ आजही मजजवळ आहे. त्याच्यावर हा ११/१०/१९८५ दिनांक घातलेला आहे.

यानंतर परत पूज्य रामसुखदासजी यांचे दर्शन माधवनगर येथील श्रीराधाकृष्ण गीता मंदिरच्या प्राणप्रतिष्ठापना उत्सवात दुसऱ्या किंवा तिसऱ्या दिवशी घडले! पण प्रणाम करून प्रवचन ऐकण्यावरच समाधान मानावे लागले. त्यानंतर त्यांच्या कृपेने गीताप्रेस गोरखपुरने प. पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती यांनी लिहिलेली 'मानस गूढार्थ चंद्रिका' ही श्रीरामचरितमानसावरील बृहत्-हिंदी टीका प्रकाशित करण्याचे मान्य केल्यावर पूज्य श्री. डुंगरदासजी महाराज यांच्या आग्रहाच्या आमंत्रणावरून श्री. ग. स. नाईक व मी नोखामंडी (राजस्थान) येथे मुद्दाम पूज्य श्रद्धेय स्वामी रामसुखदासजी यांच्या दर्शनासाठी गेलो तेव्हा तिसऱ्यांदा त्यांचे दर्शन घडले.

श्री. ग. स. नाईक आणि मी दुपारी २।।/२।।। च्या सुमारास नोखामंडी स्टेशनवर पोहोचलो व रिक्षा करून पूज्य श्रद्धेय रामसुखदासजी महाराजांचे जेथे वास्तव्य होते तेथे पोहोचलो. आम्ही येणार हे माहित असल्याने पू. डुंगरदासजी महाराज लगेच रिक्षापाशी आले आणि आमचे सामान घेऊन आम्हांला इमारतीत घेऊन गेले. आम्ही आदल्या दिवशी दुपारी मुंबईहून निघालो होतो. त्यामुळे आमचे स्नानही झालेले नव्हते. पण आम्ही आता गेलो न गेलो तोच पूज्य स्वामी रामसुखदासजी महाराज त्या खोलीतील त्यांच्या आसनावर येऊन बसले. पू. डुंगरदासजींनी आमचा परिचय करून दिला. आम्ही लांबूनच खाली गुडघ्यावर बसून डोके जमिनीस टेकून प्रणाम केला. त्यांनी हात वर उचलून आशीर्वाद दिला. पू.महाराज कुणाला स्पर्श करीत नसत किंवा समोर काही वस्तु ठेवलेलीही त्यांना आवडत नसे. पैसे तर राहोच पण फळे, फुले वा इतर वस्तु ठेवण्यासही कोणी धजावत नसे. असो.

पू. स्वामी महाराजांचे दर्शन झाल्यावर पू. डुंगरजी महाराजांनी खासगी गाडीची व्यवस्था करून आम्हांला भक्तनिवासाच्या व्यवस्थापकास पत्र देऊन तिकडे धाडले. तेथे गेल्यावर चहा वगैरे घेऊन आम्ही स्नान केले व रात्री ७ वाजता जेवणाची कुपने घेऊन तेथील भोजनगृहात जाऊन जेवण केले आणि आम्हांला मिळालेल्या खोलीत जाऊन अंथरूणे पसरली

तोच दारावर कुणीतरी टक्टक् करीत आहे असे कळले. म्हणून श्री. नाईक यांनी जाऊन दार उघडले. पाहतात तो पू. डुंगरदासजी महाराज दारात उभे होते. ते आत आले आणि आम्हांला आमचे सामान आवरा म्हणाले आणि त्या तळमजल्यावरील खोलीतून आम्हांला वरच्या मजल्यावरील खास खोलीत घेऊन गेले. तिथे झोपायला पलंग होते, गाद्या, पलंग पोस, उश्या सर्व सोई होत्या आणि मुख्य म्हणजे खोलीतच लागून स्वतंत्र संडास व स्नानगृह होते. सार्वजनिक स्नानगृह, संडास वापरण्याची आवश्यकता नव्हती. त्यावेळीही माझे वय पंचाहत्तर असल्याने मला हा बदल सोयीस्कर ठरला. मला वाटले की आपल्याला आपली स्वत:ची जितकी काळजी वाटते त्यापेक्षा अनंतपटीने ती आपल्या रामभैय्याला वाटत असते. ते खरोखरंच आपल्याला फुलासारखे जपत असतात.

दुसऱ्या दिवशी आम्ही स्नान वगैरे करून पहाटेच तयार झालो तोवरच आम्हांला नेण्यासाठी गाडी धाडण्यात आली होती. भक्तनिवासांतील कर्मचाऱ्यांनाही पू. डुंगरदासजींनी स्वत: येऊन आमच्या सुविधांकडे लक्ष पुरविले याबद्दल आश्चर्य वाटले होते. नंतर आम्ही पूज्य श्रद्धेय रामसुखदासजी महाराजांचे दर्शन घेण्यास गेलो तेव्हा मला काय वाटले कुणास ठाऊक, मी श्री. नाईकांना म्हटले की, येथे कुठे तुळस असेल तर मला जरा चार पाने आणून द्या. त्यांनी लगेच पू. डुंगरदासजींच्याकडे चौकशी करून तुळशीची काही पाने धुवून स्वच्छ अशी माझ्या हातात आणून दिली. मी पूज्य श्रद्धेय स्वामी रामसुखदासजी यांच्या दर्शनास गेल्यावर लांबूनच त्यांच्या पुढील डेस्कवर ती टाकली आणि नमस्कार केला आणि आश्चर्य म्हणजे त्यांनी ती तात्काळ उचलून आपल्या मुखात टाकली. मला अत्यंत आनंद झाला! यानंतर मी जेव्हा जेव्हा पूज्य स्वामी रामसुखदासजींना पत्र लिहित असे तेव्हा 'पत्र कुणाचे ते पू. डुंगरदासजींनी सांगितले की ते विचारीत असत की, 'रामजी को भाई मानती है वह क्या?' त्यांच्या समोर लाखो लोक येत असत पण रामभैय्याशी नाते जोडले असल्यानेच त्यांना माझी ओळख पटत असे! 'राम ते अधिक राम कर दासा' हेच खरे!

प. पू. स्वामी रामसुखदासजी यांचे प्रत्यक्ष दर्शन यानंतर झाले नाही. पण त्यांची अपार कृपा मात्र मला लाभली. मी त्यांच्या नावाने पत्र लिहित

असे. ती पत्रे पू. डुंगरदासजी महाराज त्यांना वाचून दाखवीत व ते काय म्हणाले ते पत्रोत्तरी मला लिहून कळवत असत. मी एका पत्रात लिहिले होते की, आपले आमच्यावर फार उपकार आहेत. त्यातून उतराई आम्ही होऊ शकत नाही. तसेच शबरी जर स्वत:ला 'अधमी अधम अति नारी ।' म्हणते तर मग मी काय म्हणावे? यावर त्यांनी म्हटले होते की, 'हम आपको ऋणी मानतेही नहीं !' आणि तू स्वत:स अधम आदि मानू नकोस. कारण 'भगवानकी गिनती में तेरा प्रथम क्रमांक है ।' आता यापेक्षा अधिक कृपा ती काय करावी? नंतर श्रीसद्गुरू कृपेने त्यांच्या काही हिंदी पुस्तकांचे मराठी अनुवाद माझ्या हातून झाले. मी अनुवाद करून धाडला की पूज्य श्री महाराज श्री विष्णुप्रसादजी चाँदगोठियाजी किंवा गीताप्रेसच्या कुणाला बोलावून घेऊन तो प्रकाशित करण्यास सांगत. एकदा तर त्यांनी म्हटले की त्यांच्या ज्या ग्रंथाचे मराठी अनुवाद झालेले नसतील ते माझ्याकडे धाडून द्यावे. एका पत्रांत त्यांची वाक्ये आहेत की 'द्रौपदी दिव्य थी तो क्या हुआ? वह भी दिव्य हो जाएगी।' त्यांच्या सांगण्यावरून जी पत्रे लिहिली गेली त्यांच्या झेरॉक्स प्रती या मजकूरासोबत जोडल्या गेल्या आहेत.(जातील)

प. पू. स्वामी रामसुखदासजी यांचेमुळे 'मी फक्त रामभैय्याची आहे आणि रामभैय्या माझे आहेत.' याचे निरंतर अनुसंधान राहून परमानंदाची प्राप्ती होत आहे. शिवाय कुणाचेही मूल्यमापन करण्याचा आपल्याला जराही अधिकार नाही हे ही मनांत ठसले आहे. मी फक्त भगवंताचा अंश आहे. प्रकृतीशी पंचभौतिक देहाशी माझा काहीही संबंध नाही हे ही बिंबले आहे.

***

## प. पू. डुंगरदासजी महाराज

माधवनगर येथील श्रीराधाकृष्ण गीता मंदिराच्या प्राणप्रतिष्ठापन सोहळ्यास प. पू. श्रद्धेय स्वामी रामसुखदासजी महाराजांच्या बरोबर पू. डुंगरदासजी महाराज आले होते. तेव्हा ते मुद्दाम मला भेटले होते. पण तेव्हा अगदीच ओझरता परिचय झाला होता. नंतर पू. रामसुखदासजी महाराजांना भेटण्यासाठी मंडळाच्या वतीने जेव्हा श्री. श्रीरामजी गिल्डा व श्री. ग. स. नाईक गेले होते तेव्हा त्या दोघांचा पूज्य डुंगरदासजी महाराजांशी

अधिक परिचय झत्तला. नंतर गीताप्रेस गोरखपूर द्वारा 'मानस गूढार्थ चंद्रिका' हिंदी टीका प्रकाशित होणार हे पक्के ठरल्यावर माझ्या असे लक्षात आले की, प. पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती यांनी मराठी 'मानस गूढार्थ चंद्रिका' या बृहत् टीकेचा स्वत:च हिंद अनुवाद करून दोन्हीच्या मुद्रण प्रतीही करून ठेवल्या होत्या. पण मराठीत ते असतानाच प्रकाशित झालेल्या प्रस्तावना खंडाचा हिंदी अनुवाद त्यांनी केलेला नाही. शिवाय ते परंडा येथे असताना ते मला पत्र लिहून मराठी प्रस्तावना खंडातील विशिष्ट लेखांचा हिंदी अनुवाद माझे गुरुबंधु श्री. आर. व्ही. कुलकर्णी (जे कन्या शाळेत इस्लामपूर येथेच हिंदीचे शिक्षक होते) त्यांच्या सहाय्याने करून 'मानसमणि' या मासिकाकडे धाडण्यास सांगत असत व त्याप्रमाणे आम्ही तसा अनुवाद करून धाडत असू. याशिवाय ही ते 'मानसमणि' त वाचकांच्या शंकांचे समाधान परंडा येथून हिंदीत लिहून धाडीत असत आणि त्यांनी लिहिलेली 'श्रीरामचरितमानसा' ची पंचरंगी पोथी त्यांना रामवनला मानससंघास अर्पण केली होती. तेथे एकावर्षी पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती यांना श्रीरामनवरात्रात रामायणावरील प्रवचनासाठी आमंत्रित करण्यात आले होते. तेथे त्यांची हिंदीत प्रवचने झाली होती व ती लोकांना खूप आवडली होती. तेथील संस्थापक, संचालक श्रीशारदाप्रसादजी त्यामुळे खूप प्रभावित झाले होते. त्यामुळे त्या स्थळी प. पू. बाबा गंगादास आणि प.पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती यांचे पुतळेही 'मानससरोवरा' चे चतुर रखवाले म्हणून बसविण्यात आले होते. आम्ही इस्लामपूरच्या भगिनी 'रामनामलड्डू' लिहून 'रामवन' ला धाडीत असू व नंतर त्यांनी 'मानस गूढार्थ चंद्रिका' हिंदीतील बालकांडातील काही भाग दोन खंडात प्रकाशित केला होता. त्यामुळे मानससंघ व श्री शारदाप्रसादजी यांच्याशी संपर्क साधला गेला होता. असो.

पूज्य डुंगरदासजींना पत्र लिहून मी 'मानस गूढार्थ चंद्रिका' प्रस्तावना खंड फक्त मराठीत आहे. त्यांचे हिंदी रूपांतर बहुतेक माझ्या हातून होईल असे प. पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वतींनी बोलून दाखविले होते. तरी मी थोडा अनुवाद करून धाडीत आहे.तो पसंत आला तर संपूर्ण ग्रंथाचा हिंदी अनुवाद श्रीसद्गुरू कृपेने केला जाईल असे लिहिले होते. ते पत्र वाचून

त्यांना फार आनंद झाला. तो प्रस्तावना खंड वाचता यावा म्हणून त्यांनी मराठी भाषा शिकण्याचाही प्रयत्न केला होता पण तो सफल झाला नाही. मी केलेला अनुवाद त्यांना आवडला व मी संपूर्ण ग्रंथाचा हिंदी अनुवाद करावा अशी इच्छा त्यांनी प्रकट केली. तेव्हा मला अतिशय आनंद झाला. त्यानंतर गीताप्रेस गोरखपूरकडून माझ्याकडे 'मानस गूढार्थ चंद्रिका' हिंदीची प्रूफे तपासण्यास येऊ लागली. प्रत्येक प्रूफ तीन-तीनदा तपासावे लागे. अशी सर्व सातही कांडाची प्रूफे तीन-तीनदा तपासली गेल्याने त्या निमित्ताने मानसाचा सखोल अभ्यास घडला. एकीकडे प्रस्तावना खंडाचे हिंदी भाषांतरही लिहिले गेले. नोखामंडीस जाऊन आल्यानंतर काही महिन्यातच माझ्या पाठीच्या मणक्यांत दोष उत्पन्न झाल्याने मला कमरेला पट्टा बांधून काठी अगर वॉकरच्या सहाय्याशिवाय घरांतही चालणे अशक्य झाले होते. त्यामुळे माझे हिंडणे-फिरणेही बंद झाले होते. पण श्रीसद्‌गुरुंनी अशा स्थितीतही माझ्याकडूनही सेवा करून घेतली त्यामुळे वेळेचा सदुपयोग होऊन परमानंदाचा लाभ बसल्या ठिकाणी होऊन जीवन सार्थक झाले. प्रारब्ध प्रतिकूल असले तरी गुरुकृपा ईशकृपा असेल तर त्यातून परमानंदाचा लाभ कसा होऊ शकतो याचा अनुभव आला.

ममानस गूढार्थ चंद्रिका' हिंदीचे एकूण ७ खंड आहेत. त्यांची प्रूफे मी ३/३ वेळा तपासून धाडली की श्री. श्रीरामजी गिल्डा गोरखपूर येथे काही दिवस जाऊन राहात असत आणि फायनल (अंतिम) प्रूफे तेथेच तपासत व मग तो किंवा ते खंड प्रकाशित होत असत. हे काम ३/४ वर्षे चालू होते. त्या अवधित त्यांना ३/४ वेळा तेथे जावून राहावे लागले. त्यांच्यामुळेच ते पूर्णत्वास गेले. त्यासाठी त्यांना फार परिश्रम पडले. त्यांचा व माझा जन्मच बहुधा यासाठी झाला असावा. तसेच श्री. आदिनाथ यादव यांनी पू. स्वामींच्या सर्व हस्तलिखित वह्या कित्येक वर्षे प्राणापलिकडे जपून ठेवल्या म्हणूनच हे सर्व घडू शकले. त्यांच्या गुरुसेवेला तोड नाही! त्या दोन्ही गुरुबंधुंना विनम्र अभिवादन! त्यांच्या संत्संगतीचा मला भरपूर लाभ झाला. त्यांना व त्यांच्या पत्नींना मी श्रीरामसीता व शिवपार्वतीच समजते! जास्त काय लिहावे.

नोखामंडी येथे असता एकादशी आली तेव्हा गीताप्रेस गोरखपूर तर्फे हजारो लोकांना गीतेची पुस्तके वाटण्यात आली आणि हजारो लोकांनी

सामुदायिकरित्या संपूर्ण गीता म्हटली, वाचली तो अनुभव अपूर्व होता. अकरावा अध्याय वाचताना अश्रु आवरेनात. नंतर सर्वांनी पुस्तके परत केली. मला वाटते २०/२५ हजार लोक तरी असतील.

पुढे परंडा येथे श्रीराम मंदिराचे बांधकाम पूर्ण होऊन श्रीराम-सीता-लक्ष्मण, हनुमान, श्री गणेश आदि मूर्तींची प्राणप्रतिष्ठा परम पूज्य श्री. मुरारी बापूंच्या हस्ते व्हावयाचे ठरले. तेव्हा असे ठरले की, कलशारोहण ब्रह्मचाऱ्याच्या हस्ते करावयाचे असते तर त्यासाठी पू. डुंगरदासजी महाराजांना बोलवावे म्हणून त्यासाठी प. पू. श्रद्धेय रामसुखदासजी महाराजांची अनुमतिही घेतली होती. पण तेवढ्यात प. पू. श्रद्धेय स्वामी रामसुखदासजी यांची तब्येत थोडी बिघडल्याने पू. डुंगरदासजी महाराजांनी आपण येऊ शकत नाही असे टेलिफोनवरून आम्हाला कळविले. यामुळे आयत्यावेळी सज्जनगडावरील पू. मोहनबुवा रामदासी यांना विनंती करण्यात आली आणि त्यांनी ती मान्य करून त्याप्रमाणे ते परंड्यास आले आणि त्यांच्या हातून कलशारोहण थाटांत संपन्न झाले. प. पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती हे स्वत: समर्थभक्त होते व स्वत:स 'ईश्वरदास रामदासी' म्हणवीत होते म्हणून बहुतेक हा योग आला असावा.

नंतर प. पू. श्रद्धेय स्वामी रामसुखदासजी यांची महासमाधि झाल्यावर एकवर्षी पूज्य डुंगरदासजींना मुद्दाम श्रीं च्या पुण्यतिथी उत्सवात आदराने परंड्यास आणण्यात आले. त्यावेळी तीन दिवस त्यांचा मुक्काम परंड्यास होता. त्यांनी हिंदीत सुंदर प्रवचने केली आणि त्यांच्यासाठी म्हणून मलाही तीन दिवस हिंदीत (मोडक्या तोडक्या) प्रवचने करावी लागली व आमच्यावर गुरूकृपा कशी झाली हे सांगावे लागले. तीन दिवस परंड्यास व जाता-येताना प्रवासातही त्यांच्या सत्संगतीचा लाभ झाला. ते इतके विनम्र आहेत आणि अबोलही आहेत की मी त्यांना माझे शत्रुघ्न भैय्याच म्हणते. अद्यापही माझी राखी त्यांना जाते व फोनवरून आमचे एकमेकांशी बोलणेही होते. पूज्य रामसुखदासजींच्या सहवासांत राहिल्याने आणि त्यांची कित्येक वर्षे सेवा घडल्याने त्यांचा जन्म सार्थकी लागला. गीतेचे व मानसाचे तत्त्वज्ञान त्यांच्या जीवनांत प्रत्यक्ष उतरले आहे. त्यांचीही ठिकठिकाणी प्रवचने, ज्ञानयज्ञ होत असतात. विनम्रता आणि सद्‌गुणांचा तो पुतळा आहे. त्यांचे

निर्हेतुक प्रेम मला लाभले आहे ही रामभैय्यांनी फार मोठी कृपा केली आहे.

माझी फार इच्छा होती की प. पू. स्वामी तेजोमयानंदजींची आणि प. पू. रामसुखदासजी महाराज व पू. डुंगरदासजी यांची गांठभेट व्हावी. ती इच्छाही रामभैय्याच्या कृपेने पूर्ण झाली. प. पू. स्वामी तेजोमयानंदजी रूरकी येथे ज्ञानयज्ञासाठी गेले असता मुद्दाम सवड काढून ते स्वर्गाश्रमाला गेले. तेथे पू. रामसुखदासजी महाराज त्यांना प्रेमाने भेटले व त्यांना प्रवचन करावयास सांगून स्वत: श्रवण केले. त्यामुळे पू. डुंगरदासजींना फार आनंद झाला आणि पूज्य स्वामी तेजोमयानंदजींनाही झाला. (सन २००२ मध्ये २३ मार्च रोजी)

***

## डॉ. भीमराव कुलकर्णी

परंडा येथे पूज्य मामासाहेब देशपांडे यांच्या शुभ हस्ते 'प्रज्ञानानंद सरस्वती' या संतचरित्रमालेतील प्रथम पुष्पाचे प्रकाशन झाले. तेव्हा डॉ. कल्याण काळे यांनी Ph.D. साठी लिहिलेला 'श्री हंसराज स्वामी' यांच्यावरील चरित्र ग्रंथाबद्दल त्यांचाही सत्कार केला गेला व त्यावेळी जवळजवळ एक हजार पृष्ठांचा त्यांचा तो टंकलिखित ग्रंथ पाहून माझी छाती दडपून गेली होती. त्यावेळी आमच्या भेटीच्यावेळी त्यांनी माझ्या Ph.D. च्या प्रबंधाबद्दल आस्थेने चौकशी केली तेव्हा मी आमचे वास्तव्य मुंबईत व माझे मार्गदर्शक प्रा. कृ. ब. निकुंब हे बेळगांवला. त्यामुळे काम रखडले असल्याचे सांगितले. तेव्हा ते म्हणाले की, माझे मित्र प्रा. भीमराव कुलकर्णी यांची बदली मुंबईला ना. दा. ठाकरसी विद्यापीठात झाली आहे. त्यांचा फोन नंबर देतो, त्यांच्याशी तुम्ही संपर्क साधा व त्यांच्याकडे मोकळी जागा असली तर त्यांच्या हाताखाली नांव नोंदवून त्यांचे मार्गदर्शन घ्या म्हणजे तुमचा प्रबंध पूर्ण होईल. त्याप्रमाणे डॉ. कल्याण काळे डॉ. भीमराव कुलकर्णी यांचेशीही बोलले. तेव्हा मी मुंबईला डॉ. भीमराव कुलकर्णी यांची गाठ घेतली व त्यांनी आनंदाने मला मार्गदर्शन करण्याचे मान्य केले. मी प. पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती यांचेवर प्रबंध लिहिण्याची इच्छा व्यक्त केली. कारण त्या विषयाचा माझा संपूर्ण अभ्यासही झाला

होता. पण ते म्हणाले, 'एकनाथी भागवतावर तुम्ही इतकी वर्षे अभ्यास केला आहे. ३ प्रकरणेही पूर्ण झाली आहेत. शिवाय पू. प्रज्ञानानंद सरस्वतींचे नांवही अद्याप जास्त लोकांना माहित नाही, तेव्हा एकनाथी भागवतावरील प्रबंधच पूर्ण करा' त्यांचे म्हणणे मलाही पटले.

मग मी माझे कर्नाटक विद्यापीठात नोंदवलेले नांव रद्द करून मुंबई येथे नाथीबाई दामोदर ठाकरसी विद्यापीठात नांव नोंदवून अभ्यासास सुरूवात केली.

प्रथम नाथांच्या इतर साहित्यात 'एकनाथी भागवता' चे स्थान व इतर संतांच्या ज्ञानयोग, कर्मयोग, भक्तियोगावरील मतांची व नाथांच्या मतांची तुलना असा फार विशाल दृष्टिकोन मी ठेवला होता. पूज्य भीमरावांनी मला फक्त नाथभागवतावर लक्ष केंद्रीत करा असे सांगितले त्याप्रमाणे मी केले. मी त्यांच्यापेक्षा वयाने मोठी असल्याने ते मला 'ताई' म्हणत आणि सर्वप्रकारे सहकार्य करीत. विद्यापीठाच्या ग्रंथालयात माझ्याबरोबर येऊन आवश्यक ते ग्रंथ ग्रंथपालाकडून घेऊन स्वतःच्या नावावर नोंदवून मला देत असत. कधी ते आमच्या घरी येत तर बरेचवेळा मी विद्यापीठात जाई. त्यामुळे अभ्यासला गती मिळून दोन वर्षात प्रबंध पूर्ण झाला व मला वाटते १९८६ च्या नोव्हेंबरमध्ये मी तो विद्यापीठात सादर केला.

नंतर १९८७ साली जुलैमध्ये माझी Viva तोंडी परीक्षा होणार असल्याची सूचना मिळाली. मी परीक्षेसाठी विद्यापीठात गेले. तेव्हा मला कळले की, डॉ. भीमराव कुलकर्णी यांची तब्बेत बरी नाही व त्यामुळे Viva घेण्यासाठी जो हॉल (सभागृह) उपयोगांत आणला जाई त्या ठिकाणी माझी परीक्षा घेतली जाणार नसून ज्या खोलीत माझे एक परीक्षक डॉ. श्रीधर रंगनाथ कुलकर्णी (हैद्राबाद येथून येवून उतरले होते)ज्या खोलीत आहेत तेथे परीक्षा होणार आहे. हे ऐकून मी अगदी थक्कच झाले. तेथे गेल्यावर पाहिले तर डॉ. भीमराव कुलकर्णी तेथील पलंगावर झोपले होते व डॉ. श्रीधर रंगनाथ कुलकर्णी एका खुर्चीवर बसले होते व तेथे माझ्यासाठीही एक खुर्ची ठेवलेली होती. त्या दोघांना नमस्कार करून मी माझ्या खुर्चीवर बसले आणि डॉ. कुलकर्णी (हैद्राबाद) यांनी मला प्रश्न विचारण्यास सुरूवात केली. डॉ. भीमराव यांच्या मार्गदर्शनाखालीच प्रबंध पूर्ण झाला होता. त्यांनी

एकही प्रश्न विचारला नाही. मला वाटते दीड-दोन तास ही प्रश्नोत्तरे झाली असतील नंतर डॉ. भीमराव यांनी चि. डॉ. रमेश बाहेर थांबला होता त्यास बोलावून घेतले व चहाही मागवला. नंतर त्या दोघांनी चि. डॉ. रमेशला सांगितले की, तुमच्या आई पास झाल्या आहेत. तुमचे व त्यांचे हार्दिक अभिनंदन! नंतर चहा घेऊन आम्ही तेथून बाहेर पडलो. रामभैय्यांच्या व श्रीसद्‌गुरुंच्या कृपेने पंधरा वर्षाचे परिश्रम सुफळ संपूर्ण झाले.

नंतर डॉ. भीमराव यांच्यावर डॉ. भालेराव हे उपचार करीत होते व त्यांची-माझी चांगली ओळख होती म्हणून चि. डॉ. रमेशने फोन करून त्यांना डॉ. भीमराव कुलकर्णी यांच्या तब्बेतीविषयी विचारले तेव्हां कळले की त्यांना लिव्हर कॅन्सर झाला असून त्यावर काही इलाज नाही! किती दिवस जातील ते जातील! हे ऐकून फार वाईट वाटले! नंतर ऑगस्टमध्ये अधिकृत निकाल जाहीर झाल्यावर चि. रमेश व मी कांदीवलीला आदरणीय श्री. भीमरावांना भेटण्यास गेलो तेव्हा पेढे न नेतां फळे नेली होती. ते झोपलेले उठून बसले आणि त्यांनी चि. रमेशला विचारले की, तुम्ही वृत्तपत्राला बातमी दिली की नाही? तेव्हा आम्ही 'नाही' म्हटल्यावर त्यांनी कुठल्या वृत्तपत्रात काय मजकूर द्यायचा तो स्वत: लिहून दिला. नंतर ते रोज ती वृत्तपत्रे बघतील म्हणून आम्ही त्या वृत्तपत्राकडे तो मजकूर धाडला. स्वत: इतके आजारी असतांनाही त्यांनी माझी परीक्षा पुढे ढकलली नाही वा रद्द केली नाही. तसेच पास झाल्यावरही स्वत:स बरे नसता उठून मजकूर लिहून दिला! ते संत साहित्याचे गाढे व्यासंगी तर होतेच शिवाय संतांचे तत्त्वज्ञान त्यांनी जीवनात उतरविले होते. स्वत:ची पर्वा न करतां लोकांच्या सुखाने सुखी होणे यातच संतत्व दडलेले असते हेच खरे! पुढे सप्टेंबरमध्ये ललिता पंचमीस त्यांना देवाज्ञा झाली! हरी इच्छा!

डॉ. भीमराव कुलकर्णी यांच्या मार्गदर्शनाखाली प्रबंधाचे काम सुरू असतांना मुंबईत अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन झाले होते. डॉ. भीमराव स्वागताध्यक्ष होते व मी त्यांची विद्यार्थिनी म्हणून त्यांनी मला पास दिले होते. त्यामुळे मला पहिल्या रांगेत बसता येई. यात एक दिवस असे घडले की, माझ्या एका बाजूला श्री. सुधीर फडके बसले होते तर दुसऱ्या बाजूस श्री. गजानन जहागिरदार बसलेले होते. मधल्या वेळेत (मध्यंतरात)

मी श्री. सुधीर फडके यांच्याशी बोलून त्यांच्याशी श्रीसद्गुरू स्वामी प्रज्ञानानंद व त्यांनी रचलेल्या मराठी श्रीरामचरितमानसबद्दल बोलले आणि त्यांनी मला त्यांच्या घरी भेटण्यास बोलावले. पत्ता सांगून रविवार सकाळी ९.०० ते ९.३० च्या सुमारास या म्हणाले. त्याप्रमाणे मी त्यांच्या घरी गेले.

गेल्यावर त्यांनी चांगले स्वागत केले. मी त्यांना 'मराठी मानसा' चा गुटका भेट दिला. त्यांनी तो ग्रंथ चाळला. मी म्हटले की, 'गीतरामायण' प्रमाणे 'मराठी मानसा' तील निवडक प्रसंगांना त्यांनी संगीत देऊन चाली लावल्या तर बरं होईल. ते म्हणाले, 'मी आनंदाने हे काम केले असते पण मला स्वातंत्र्यवीर सावरकर यांच्यावर चित्रपट काढायचा आहे त्यासाठी जवळजवळ एक कोटी रूपये लागणार आहेत. सध्या मी ती रक्कम कशी उभी करायची या प्रयत्नात आहे. त्यामुळे या कामासाठी आवश्यक तो वेळ मी देऊं शकणार नाही. मी तुम्हाला श्री. यशवंत देव यांचे घर दाखवतो, त्यांना तुम्ही भेटा, त्यांनी मनावर घेतले तर तुमचे काम होईल.' मी म्हटले, 'तुमच्या चिरंजीवांना तुम्ही सांगितलेत तर?' ते म्हणाले 'तो नोकरी करतो त्यास सध्या हे जमणार नाही.' मग त्यांच्या घरासमोरच श्री. यशवंत देव राहात होते. त्यांचे घर त्यांनी मला दाखवले व मग मी श्री. यशवंत देव यांच्या घरीही गेले. पण ते नेमके त्यावेळी घरी नव्हते. बाहेरगांवी दौऱ्यावर गेले होते. म्हणून मी परत घर गेले. असो. या निमित्ताने श्रीरामायण प्रेमी श्री. सुधीर फडके यांचा परिचय झाला होता. त्यांची घरी जाऊन त्यांच्याबरोबर ब्रेड टोस्ट आणि कॉफी यांचा समाचार घेता आला आणि त्यांच्या सौजन्याचाही अनुभव आला.

***

## प्रा. कृ. ब. निकुंब

आम्ही बेळगांवला असतांना घरी अभ्यास करून मी मुंबईला जाऊन नाथीबाई दामोदर ठाकरसी विद्यापीठाच्या परीक्षा External Student म्हणून देत होते. १९६९ मध्ये बी.ए. पास झाल्यावर एम्. ए. चा अभ्यास सुरू असतांना मला असे वाटले की, साहित्य विषयक अभ्यासासाठी प्रा.कृ.ब.

निकुंब यांची व्याख्याने जर मला ऐकायला मिळाली तर फार बरे होईल. तोपर्यंत प्रा. विजयाताई धोपेश्वरकर जी मारुती गल्लीतच राहात असे तिच्याशी माझी काही कारणाने ओळख झाली होती. तीही प्रा. निकुंबांचीच विद्यार्थिनी होती आणि त्यांच्याच हाताखाली लिंगराज कॉलेजला शिकवत होती. तिने प्रा. निकुंबाना विचारले तेव्हा त्यांनी मी लिंगराजमध्ये जाऊन त्यांची व्याख्याने ऐकण्यास परवानगी दिली व त्याप्रमाणे मी त्यांची, चार-पांच व्याख्याने ऐकली. ते फारच सुंदर शिकवत असत. ते स्वत:ही रंगून जात आणि विद्यार्थ्यांनाही दंग करून सोडत. या निमित्ताने त्यांचा परिचय झाला व म्हणून १९७१ साली मी एम्.ए. झाल्यावर जेव्हा Ph.D. होण्याचे ठरवले तेव्हा प्रथम त्यांना याबद्दल मी विचारले.

त्यांनीच 'एकनाथी भागवत' हा विषय सुचविला. तोपर्यंत या विषयावर कुणी प्रबंध लिहिला नव्हता. मला अध्यात्म्याची आवड असल्याने मला तो विषय आवडला. तेव्हा ते म्हणाले, 'ग्रंथ फार मोठा आहे. तुम्ही तो प्रथम वाचून पहा व मग ठरवा.' पूर्वी मी एकदां श्रीसद्गुरूंना विचारले होते की क्रोध कमी व्हावा यासाठी काय करावे? तेव्हा त्यांनी मला 'एकनाथी भागवतातील भिक्षुगीत(अध्याय २३वा) वाचावयास सांगितला होता. तेव्हा मी फक्त तोच अध्याय वाचला होता. श्री. सरांनी सांगितल्यावर मी सर्व ग्रंथ नजरेखालून घातला व तोच विषय घ्यावयाचा असे ठरवले. नंतर २ वर्षे त्यांच्या मार्गदर्शनाखाली पहिली तीन प्रकरणे लिहिली. त्यांची भाषा आणि मार्गदर्शन करण्याची हातोटी विलक्षण होती. दोन वर्षांनी कर्नाटक विद्यापीठाकडे त्यांनी अहवालही सादर केला. अभ्यासाच्या योगे त्यांच्या घरी येणेजाणे झाले आणि त्यांच्या पत्नीबद्दलही आत्मीयता उत्पन्न झाली. नंतर आम्ही मिरजेस असतांना ते आमच्या घरीही येऊन गेले होते. पण पुढे मला कर्नाटक विद्यापीठातील नांव रद्द करावे लागले व मुंबईला डॉ. भीमराव कुलकर्णी यांच्या मार्गदर्शनाखाली प्रबंध पूर्ण करावा लागला. प्रा. निकुंब कवि होते, त्यांचे 'घाल घाल पिंगा वाऱ्या माझ्या अंगणात, माहेरी जा सुवासाची कर बरसात' खूप लोकप्रिय आहे. 'मृगावर्त' खंडकाव्यही प्रसिद्ध आहे व त्यांची समीक्षक म्हणूनही खूप प्रसिद्धी होती. त्यांच्या स्मृतीस विनम्र अभिवादन! ***

प.पू. स्वामी **चिन्मयानंदजी (श्रीगुरुदेव)**

श्रीगुरुदेवांचे प्रथम दर्शन मिरजेला झाले होते. किती साली ते आता आठवत नाही. पण कुठल्या तरी थिएटरमध्ये इंग्रजीतून त्यांचे प्रवचन ऐकले होते व प्रभावित झाले होते. त्यावेळी श्रीगुरुदेवांची इतकी कृपा लाभेल अशी कल्पनाही आली नव्हती. नंतर सन १९८८ मध्ये प.पू. स्वामी तेजोमयानंदजींचे दर्शन होऊन त्यांची कृपा लाभली आणि निर्हेतुक प्रेमही लाभले. नाशिकचे श्री. सारडा जे प.पू. गंगेश्वरनंदजी (प्रज्ञाचक्षु वेदमूर्ती) यांचे परम भक्त होते. त्यांची इच्छा होती की प.पू. गंगेश्वरानंदजी अथवा प.पू. श्रीगुरुदेव स्वामी चिन्मयानंदजी यांनी जर सल्ला दिला तर ते 'मानस गूढार्थ चंद्रिका' च्या छपाईसाठी काही सहाय्य देणार होते. प.पू. तेजोमयानंदजीशी मी हे बोलले होते. म्हणून बहुतेक ते याबद्दल श्रीगुरुदेवांशी बोलले असावेत. त्यामुळे माझ्याकडे श्रीगुरुदेवांच्याकडून पत्र आले होते. ते श्री. सारडा यांना उद्देशून होते व त्यांत लिहिलले होते की 'मानस गूढार्थ चंद्रिके' ची छपाई हे फार उत्तम कार्य आहे. त्याला अवश्य सहाय्य करावे. सेंट्रल चिन्मय मिशन ट्रस्टचे अनेक प्रकल्प अद्याप पूर्ण व्हावयाचे आहेत ; त्यामुळे चिन्मय मिशन त्यासाठी कटिबद्ध आहे. त्यापत्राबरोबर श्रीगुरुदेवांनी स्वत:चा एक फोटो धाडला होता तो अद्याप मजजवळ आहे. ते पत्र श्री. सारडा यांना धाडण्यात आले होते.

श्री. किसनजी सारडांचा कल पाहून श्री. श्रीरामजी गिल्डा व मी मुद्दाम प.पू. स्वामी गंगेश्वरानंदजींच्या दर्शनासही गेलो होतो. पण त्यांचा असा अभिप्राय पडला की, 'श्रीरामचरितमानसा' वर अनेक टीकाकारांच्या टीका प्रकाशित झालेल्या आहेत. त्यात आणखी एका टीकेची भर घालण्यात काही अर्थ नाही. यामुळे श्री. किसनजी सारडा यांनी नंतर यातील लक्ष काढून घेतले. असो.

यानंतर मला वाटते, पू. गुरूदेवांचा पांचशेवा ज्ञानयज्ञ मुंबईत झाला. त्यास मी व सौ. सुरेखा श्रवणास गेलो होतो व नंतर आम्ही श्रीगुरूदेव जेथे उतरले होते तेथे त्यांच्या दर्शनासही गेलो. तेव्हा तेथे प.पू. स्वामी पुरूषोत्तमानंदही होते. त्यावेळी आम्ही दोघी श्री गुरुदेवांच्या अगदी चरणापाशी

बसलो होतो. त्यावेळी त्यांच्याशी थोडे बोलणे झाले तेवढेच! पण पुढे प.पू. स्वामी तेजोमयानंदजी यांच्यामुळे चिन्मय मिशनविषयी आत्मीयता वाटू लागली. पुण्याच्या ओंकार ट्रस्ट तर्फेपू. श्री गुरुदेवांवर विशेषांक निघणार होता म्हणून मी पू. श्रीगुरुदेवांच्या साहित्याचा, चरित्राचा अभ्यास करू लागले आणि खरोखरच मी थक्क तर झालेच पण परम पूज्य तपोवन महाराज आणि परम पूज्य स्वामी चिन्मयानंदजी यांच्या चक्क प्रेमात पडले! त्यांचे नाव निघाले तरी अंत:करण भरून यावे एवढी आत्मीयता निर्माण झाली.

नंतर श्रीसद्गुरुंच्या व रामभैय्यांच्या कृपेने 'प्रज्ञाचरितमानस' हे ब्रह्मलीन श्रीसद्गुरू प्रज्ञानानंद सरस्वती स्वामींचे काव्यबद्ध चरित्र माझ्या हातून लिहिले गेले. ते त्यावेळी सांगली येथील चिन्मय मिशनच्या केंद्राचे आचार्य पू. प्रयागजी चैतन्य ब्रह्मचारी यांना मी दाखवले. तेव्हा ते सहज म्हणाले की, पूज्य श्रीगुरूदेवांचे काव्यबद्ध चरित्रही अद्याप लिहिले गेलेले नाही ते जर तुम्ही लिहिलेत तर त्याचीही पारायणे होऊ शकतील. हे ऐकून मी म्हटले, 'मला हे कसे काय जमणार?' पण गंमत अशी झाली की मला आपोआप स्फूर्ती होऊन ओवी मागून ओवी रचली जाऊ लागली. तेव्हा मला वाटले की, हे कार्य माझ्या हातून व्हावे अशी रामभैय्याचीच इच्छा दिसते. म्हणून मी लगेच पू. श्रीगुरुदेवांच्या चरित्रावर जितके म्हणून इंग्रजी, हिंदी वा मराठी ग्रंथ होते ते गोळा करून त्यांचा अभ्यास सुरु करून चरित्र लेखनाच्या दृष्टीने (टाचणे तयार केली) मुद्दे नोंदवून ठेवले व ते काम पूर्ण झाल्यावर जसे सुचेल तसे चरित्र काव्यबद्ध करू लागले. काव्य ओवीबद्ध असले तर स्थळांची, व्यक्तिंची नावे व दिनांकांचे उल्लेख यात बदल करणे शक्य नव्हते. त्यामुळे ते पूर्ण निर्दोष होऊ शकले नाही. पण भगवान हे भावग्राही असतात. भाषेकडे ते पहात नाहीत असा पूर्ण विश्वास असल्याने ते कार्य माझ्याकडून तडीस गेले व पुढे चिन्मय प्रेमी व्यक्तींच्या सहकार्यामुळे ते चिन्मय मिशनच्या पुणे केंद्रातर्फे प्रकाशितही झाले. यात पू. शैलेशजी ब्रह्मचारी आताचे पूज्य स्वामी सिद्धेशानंद यांचे मोलाचे सहाय्य झाले. ३ ऑगस्टला टोप - संभापूर, जिल्हा कोल्हापूर येथे पूज्य स्वामी पुरूषोत्तमानंदजींच्या हस्ते प्रकाशन समारंभ झाला. त्यांनी त्यावेळी मला मुद्दाम बोलावून घेवून माझ्या समक्ष त्यातील ४ अध्यायांचे सामुदायिक

वाचनही केले व शाल व श्रीफळ देऊन सत्कार केला तो मी पूज्य गुरूदेवांचा प्रसाद समजूनच स्वीकारला!

नंतर हे सर्व पाहून प्रिय श्री. निर्मलाताई (पू. प्रयागजींच्या मातोश्री) असे म्हणाल्या की, मराठीप्रमाणे हिंदीत जर चरित्र काव्यबद्ध झाले तर सर्व भारतीय चिन्मय प्रेमींना त्याचा लाभ होईल, तर हिंदीतूनही रचना करा! मी परत रामभैय्यांच्या कृपेवरच सर्व अवलंबून आहे असे म्हटले! आणि त्यांच्या कृपेनेच स्फूर्ती होऊन 'चिन्मय-चरित-मानस' हे काव्य चौपाई दोहा वृत्तात रचले गेले ! तेही निर्दोष नाही याची पूर्ण जाणीव आहे. त्याची कुणीही 'श्रीरामचरितमानसा' शी तुलना करू नये. कारण कुठे इंद्राचा ऐरावत आणि कुठे शामभटाचे तट्टू (तट्टाणी) तशीच वस्तुस्थिती आहे.

मात्र ज्या दिवशी हे काव्य पूर्ण झाले ; त्या रात्री मला स्वप्नात मुरलीधर भगवान् श्रीकृष्णांचे दर्शन होऊन ते मुरली वाजवीत आहेत आणि मी त्यांना 'बजाव, बजाव मुरली, कन्हैय्या' असे म्हणत आहे असे दिसले आणि जेव्हा मला जाग आली तेव्हा मी अंथरुणावर बसलेली होते आणि वरील गीत गात होते आणि ते भजन बंदच होईना. जवळजवळ पंधरा वीस मिनिटे ते सुरूंच होते! मी पू. स्वामी पुरूषोत्तमानंदांना हे स्वप्न लिहून कळविल्यावर त्यांनी लिहिले की, यावरून पू. श्री गुरुदेव व भगवान् श्रीकृष्ण एकच आहेत हेच भगवंतानी दाखवून दिले आहे. हे वाचून मला आनंद झाला. ते काव्य मी प.पू. स्वामी तेजोमयानंदजींच्या चरणी अर्पण केले आहे. पूज्य गुरूदेवांच्या कृपेने ते यथासमय प्रकाशित होईल!

प.पू. गुरुदेवांची गुरूभक्ती, विरक्ती, नामप्रेम, चिकाटी, लोकोद्धाराची त्यांची तळमळ व त्यांनी त्यासाठी घेतलेले परिश्रम, अडचणींच्यावर मात करण्याचे सामर्थ्य, खरोखर सर्वच अलौकिक आहे. त्यांना मी खरोखर आद्य शंकराचार्यांचा अवतारच समजते. जगांत २५० च्या वर चिन्मय केंद्रे त्यांनी स्थापन केली व अद्यापही ती कार्यरत आहेत हाच केवढा चमत्कार आहे. पू. तपोवन महाराजांचीही पुस्तके मी वाचली आहेत. त्यांनी ज्या निरनिराळ्या प्रकारे पू. स्वामी चिन्मयानंदांची परीक्षा घेतली व ज्या प्रकारे विविध शंकांचे निरसन केले ते सर्व वाचून गुरु कसे असावे, त्यांनी शिष्यास कसे पारखावे व कसे मार्गदर्शन करावे याचा आदर्श वस्तुपाठच मिळतो.

त्यांचे ईश्वरदर्शन, गिरिविहार वगैरे ग्रंथ वाचले की त्यांच्या अध्यात्मिक अधिकाराची थोडीफार कल्पना येते. अशा संतांच्या चरित्रवाचनानेही फार प्रगति होते यांत संशय नाही!

चिन्मय मिशनच्या अनेक आचार्यांशी माझा जवळून संबंध आला आहे. त्या सर्वांची गुरुनिष्ठा, कार्यतत्परता, सहृदयता यांचा अनुभव मी गेली २०/२१ वर्षे घेत आहे. सर्वांचाच परिचय देणे काही शक्य नाही. पण नामोल्लेख तर केलाच पाहिजे. प.पू.स्वामी पुरूषोत्तमानंदजी व विशेषत: प.पू. स्वामी तेजोमयानंदजी यांच्याबद्दल सविस्तर लिहिले जाईलच. पण पू. सुबोधानन्दजी, पू. स्वामिनी गयानंदाजी, पू. स्वामिनी मंगलानंदाजी, पू. स्वामिनी निश्चलानंदाजी, पू. स्वामिनी कीर्तनानंदाजी, तसेच पू. स्वामी सिद्धेशानंदजी, पू. प्रयागजी ब्रह्मचारी तसेच इतर सौ. सविता चक्रवर्ती, पू. वर्षाजी, व सर्व काईतवाडे कुटुंबिय, पू. स्वामी आत्मदेवानंदजी, श्री. शालिनीताई मराठे, श्री. रवि नेने, सौ. नंदिनी नेने, सौ. माधुरी राणे, डॉ. सौ. रेवती जावडेकर, प्रिय मीरा, प्रिय मनिषा, प्रिय सौ. पार्वतीअम्मा व इतर अनेकांचे जे निर्हेतुक प्रेम मला लाभले आहे, त्यांच्या ऋणांतून मी मुक्त होऊ शकत नाही. चुकून ज्यांचा नामोल्लेख राहिला असेल त्यांनी क्षमा करावी.

***

## प.पू. स्वामी पुरूषोत्तमानंदजी

प.पू. स्वामी पुरूषोत्तमानंदजी यांचे प्रथम दर्शन मुंबईला फडकेवाडी श्रीगणेशमंदिर येथे त्यांचा ज्ञानयज्ञ झाला तेव्हा ते श्री. जोशी यांच्या घरी उतरले असतां झाले व त्यानंतर पू. श्रीगुरुदेवांच्या दर्शनास गेले होते तेव्हा झाले. पण त्यावेळी परिचय होण्याचा योग आला नाही. तर परमपूज्य स्वामी तेजोमयानंदजी हे जगभरांतील चिन्मय मिशन प्रमुख झाल्यावर पू. गुरुदेवांच्या रौप्यतुले साठी टोप–संभापूर येथे आले असता त्यांच्या बरोबर परत पू. पुरूषोत्तमानंदांचे दर्शन घडले. प.पू. स्वामी तेजोमयानंदजीना माझी दरवर्षी ते जिथे असतील तेथे राखीपौर्णिमेस राखी जात असे. एका वर्षी असे झाले की राखीपौर्णिमा अमेरिकेत झाल्यावर लगेच ते मुंबईस

आले व लगेच मला वाटते मराठीत वेदांत कोर्सचा शुभारंभ करण्यासाठी लगेच टोप-संभापूरला येणार असे मला कळले होते व त्यांनी मला तेथे भेटण्यासही बोलावले होते. मी अमेरिकेस राखी धाडली होती. पण त्यांना पोहोचली की नाही हे कळले नव्हते व ते लगेच टोप-संभापूर येथे आले.

तेथे एका हॉलमध्ये भारतीय बैठकीवर परमपूज्य स्वामी तेजोमयानंदजी येऊन बसले व त्यांच्या शेजारीच त्यांच्या उजव्या बाजूस प.पू. स्वामी पुरूषोत्तमानंदजी येऊन बसले. मी लगेच ताह्मणांत औक्षणाचे साहित्य काढून राखी ठेवली व निरांजनेही पेटवली व पुढे होऊन प.पू. स्वामी तेजोमयानंदजीना कुंकुमतिलक लावला. एवढ्यात त्यांनी खिशांत हात घालून मी त्यांना अमेरिकेच्या पत्त्यावर पोस्टाने धाडलेली राखी काढली आणि मला म्हणाले, 'हं! बांधा ही तुमची राखी!' मी हे पाहून थक्क झाले पण लगेच त्यांच्या हातांतील राखी घेऊन ती त्यांनी पुढे केलेल्या त्यांच्या उजव्या हाताच्या मनगटावर बांधली. त्यांच्या हातावर मिठाई दिली आणि मस्तकावर अक्षता टाकून त्यांना ओवाळू लागले. तेव्हा ताम्हनातील राखी त्यांच्या दृष्टीस पडली. तेव्हां त्यांनी डोळ्यांनी इशारा करून ती राखी मी प.पू. स्वामी पुरूषोत्तमानंदजींना बांधावी असे सूचित केले. त्याप्रमाणे प.पू. स्वामी तेजोमयानंदजींना ओळावून झाल्यावर परमपूज्य स्वामी पुरूषोत्तमानंदजींना तिलक लावल्यावर त्यांनीही लगेच आपला उजवा हात पुढे केला. तेव्हा त्यांच्या मनगटावर राखी बांधून, मिठाई देऊन मी त्यांनाही औक्षण केले. या सर्वांमुळे अतिशय आनंद झाला. मी प.पू. स्वामी तेजोमयानंदजी यांना पत्रात लिहिलेही होते की जणू ज्ञानदेव, निवृत्तिनाथ अथवा कृष्ण बलराम यांनाच मी ओवाळले असे मला वाटत आहे. प.पू. स्वामी पुरूषोत्तमानंदजींना यानंतर त्यांची महासमाधि होईपर्यंत मी दरवर्षी राखी धाडीत असे व ते न चुकतां राखी पोहोचल्यावर मला पत्र लिहित असत. तसेच ते जर सांगली, मिरजला आले तर त्यांच्या भेटीला मुद्दाम जात असे. तसेच त्यांचा सोलापूरला ज्ञानयज्ञ असतांना श्री. आदिनाथ यादव व सोलापूरचे श्री. देशमुख यांना कळवून ते परांडा येथील श्रीरामविश्रामधाम मधील श्रीराम परिवाराचे व पू. हंसराज, पू. प्रज्ञानानंद सरस्वती व पू. अनंतदास महाराजांच्या समाधींच्या दर्शनास जाऊ शकतील अशी व्यवस्था

केली होती व तेही आमच्या विनंतीस मान देऊन परंड्यास जाऊन आले.

सन १९१० साली ते सांगलीस ज्ञानयज्ञासाठी आले होते. तेव्हांही मी त्यांच्या दर्शनास गेले होते. त्यावेळी मी त्यांना पूज्य तुकडोजी महाराजांचे भजन मला ऐकवा अशी विनंती केली होती. तेव्हा ते म्हणाले की, 'जरूर ऐकवीन पण तुम्हांलाही माझ्याबरोबर ते म्हणावे लागेल.' मी 'ठीक आहे' म्हटले व मग त्यांनी मला एक सुंदर भजन ऐकवले व आम्हीही त्यांच्याबरोबर ते म्हटले. तोपर्यंत त्यांची भिक्षेला जाण्याची वेळ झाली होती. तेव्हा त्यांनी मलाही त्यांच्याबरोबर येण्याचा आग्रह केला. पण माझ्या प्रकृतिच्या कमजोरीमुळे मला त्यांना नकार द्यावा लागला. यानंतर त्यांचे दर्शन होऊ शकले नाही. जानेवारी १७ (२०११) ला ते समाधिस्थ झाले. त्यांच्या षोडशीला व प्रथम पुण्यतिथिला मी टोप-संभापूर येथे गेले होते. त्यांना प.पू. हंसराज स्वामींचे ग्रंथ आवडत असत म्हणून डॉ. कल्याण काळे यांनी पू. हंसराजांचे ग्रंथ त्यांना भेट दिले होते. त्यांचे स्मरण वारंवार होते. पू. श्री गुरूदेव यांनी वेदान्ताचा अभ्यासक्रम सुरू केला तेव्हा अगदी पहिल्या ग्रूपमध्ये ते सामील झाले होते. पूज्य श्रीगुरूदेवांचे कार्य त्यांनी चाळीस वर्षाहूनही अधिक काळ केले. महाराष्ट्रांत चिन्मय मिशनच्या कार्याचा प्रचार व प्रसार त्यांच्यामुळेच झाला. चिन्मय सांदीपनी आश्रम टोप-संभापूर (कोल्हापूर) व चिन्मय गणाधीश यांच्यामुळे त्यांचे निरंतर स्मरण होत राहील. त्यांच्या चरणी विनम्र अभिवादन!

***

## परम पूज्य स्वामी तेजोमयानंदजी

सन १९८८ मधील गोष्ट असावी. सौ. ताराकाकूचा फोन आला होता की, दादरला तिच्या घरासमोरच (गुडविल बिल्डींग समोरच) चिन्मय मिशनतर्फेप.पू. स्वामी तेजोमयानंदजी यांचा 'श्रीरामचरितमानस' वर ज्ञानयज्ञ आहे, तरी मी तिच्याकडे येऊन राहावे. घरातल्या गच्चीत बसून सुद्धा दिसू शकेल, ऐकू येईल. पण मला सांगलीला चि. सौ. मंगलकडे महिनाभर जावयाचे होते. त्यामुळे मला या संधीचा लाभ होऊ शकला नाही. पण मी श्री. श्रीरामजी गिल्डांना फोन करून या संधीचा लाभ घ्यावा असे सुचविले

व त्याप्रमाणे ते या ज्ञानयज्ञास हजर राहिले व त्यांचा व पू. स्वामीजींचा परिचयही झाला. पू. स्वामीजींनी 'मानस पीयूष' मधील पू. प्रज्ञानानंद सरस्वती स्वामीजींची 'मानसा' वरील टीका वाचली होती व त्यामुळे त्यांना पू. प्रज्ञानानंद स्वामींच्या विषयी आदर होता. म्हणून त्यांनी 'मानसा' च्या मराठी अनुवादाची विक्री करण्यासही परवानगी दिली आणि आश्चर्याची आणि आनंदाची गोष्ट म्हणजे माझी सौ. काकू स्टॉलवर बसली आणि २० ग्रंथ लोकांनी विकत घेतले. तिने वयाचा विचार न करता हे कार्य केले हे विशेष!

मी सांगलीहून आल्यावर श्री. श्रीरामजी मला भेटायला आले आणि प.पू. स्वामी तेजोमयानंदजींच्या बद्दल खूप आदर व्यक्त केला आणि म्हणाले, 'आज आपण त्यांच्या दर्शनास पवईला जाऊ या.' मग त्यांनी लगेच पू. स्वामीजींना फोन करून 'आम्ही भेटायला येऊ का' म्हणून विचारले. तेव्हा पू. स्वामीनी लगेच अनुमति देऊन दुपारी ३।। वाजतां तेथे या म्हणून सांगितले. त्याप्रमाणे आम्ही दोघे बरोबर योग्य वेळी तेथे पोहोचलो. जातांना पू. स्वामींचे चरित्र, 'मानस गूढार्थ चंद्रिका' मराठी प्रस्तावना खंड, अभिनव रामायण वगैरे ग्रंथ त्यांना भेट म्हणून घेऊन गेलो. त्यांना खूप आनंद झाला. माझा व त्यांचा परिचय श्री. भाऊनींच करून दिला. मग त्यांनी आम्हांला थोडे थांबण्यास सांगितले आणि ते आतल्या खोलीत जाऊन एक पाकीट घेऊन आले आणि 'ही तुमच्या मंडळास अल्पशी भेट' असे म्हणाले. मग त्यांनी विचारले की, 'तुमचे मंडळ रजिस्टर झाले आहे कां? ' यावर आम्ही 'नाही' असे म्हणालो. तेव्हा ते म्हणाले की, 'प्रथम तुम्ही ताबडतोब तुमचे मंडळ (ट्रस्ट) रजिस्टर करा म्हणजे मग मलाही मंडळास देणगी देण्यास कुणाला सुचवितां येईल.' यानंतर त्यांना प्रणाम करून आम्ही तेथून निघालो व घरी परतलो. त्यावेळी प.पू. स्वामी तेजोमयानंदजी पवई येथील सांदीपनीचे प्रमुख आचार्य म्हणून कार्य करीत होते.

नंतर त्यांचा माझा पत्रव्यवहार सुरू झाला. पहिले पत्र दि.२३/१२/१९८८ चे पवईहून आलेले आहे. मी त्यांना दिवाळीचे ग्रिटींग कार्ड धाडले होते. ते त्यावेळी परदेश दौऱ्यावर गेलेले होते. तेथून आल्यावर त्यांनी पोच देऊन आनंद व्यक्त केला होता. नंतर ता. २१/२/८९ च्या पवईहूनच आलेल्या पत्रांत त्यांनी आमचा ट्रस्ट रजिस्टर झाल्याबद्दल आनंद व्यक्त

केला आहे व इचलकरंजीस प्रिय मंगलाताईचे कीर्तन ऐकल्याचे व ते आवडल्याचे लिहिले आहे. यानंतर त्यांची U.S.A. मध्ये चिन्मय वेस्टचे आचार्य म्हणून नेमणूक झाली व त्यांचा मुक्काम जास्त करून San Jose येथे जवळजवळ १९९३ मध्ये प.पू. श्रीगुरुदेव स्वामी चिन्मयानंदजींची महासमाधि होईपर्यंत होता. अधूनमधून ते भारतातहीआले होते. ते आले की लगेच मला फोन येई व मी त्यांना भेटण्यास जात असे. मी सकाळी साधारण ९.०० ते ९.३० च्या सुमारास सँडहर्स्ट रोड स्टेशनवरून लोकलने कांजूरमार्गला जाई व तेथून रिक्षा करून पवईला जात असे. ते मला तेथे प्रसाद घेतल्याशिवाय कधीच परत येऊ देत नसत. १२.००-१२.३० ला प्रसाद घेऊन मी परत रिक्षाने कांजूरमार्ग स्टेशनवर जाऊन सँडहर्स्ट स्टेशनवर उतरून २.३० वाजेपर्यंत घरी येई. तेथे त्यावेळी त्यांच्याशी भरपूर गप्पागोष्टी होत. दरवेळी मी बहुतेक एकटीच जात असे. त्यांचा माझा अनेक जन्मांचा ऋणानुबंध असला पाहिजे. त्याशिवाय इतकी आत्मीयता, इतकी निरपेक्ष कृपा मला लाभली नसती! मी श्रीरामप्रभूंना माझे बंधु मानत आले आहे. हे नाते गेल्या पन्नास-साठ वर्षांत इतके दृढमूल झाले आहे यांत श्रीसद्गुरू प्रज्ञानानंद सरस्वतीस्वामींच्या इतकेच श्रेय परम



पूज्य स्वामी तेजोमयानंदजींनाही आहे आणि परम श्रद्धेय स्वामी रामसुखदासजी यांचे तर इतके उपकार आहेत की काय सांगावे? या सर्वांच्यामुळेच रामभैय्यांच्याबद्दल प्रतिक्षण वर्धमान प्रेम उत्पन्न होऊन जो परमानंद प्राप्त होत आहे तो अवर्णनीय आहे! प.पू. स्वामी तेजोमयानंदांच्या रूपाने रामभैय्याच माझ्यावर अविरत निर्हेतुक कृपेचा प्रेमाचा वर्षाव करून राहिले आहेत असा माझा २१/२२ वर्षांचा अनुभव आहे आणि याला त्यांचा कृपालुशील स्वभाव जसा कारणीभूत आहे तसेच प.पू. स्वामी रामसुखदासजींचा उपदेश कृतीत आणण्याचा जो प्रयत्न श्रीसद्गुरुकृपेने केला गेला की सारखे महे रामभैय्या मी फक्त तुमची आहे आणि तुम्ही माझे आहात.' याचा पुनरूच्चार करणे हेही कारण आहेच. आता 'रामभैय्या' म्हणतांना आपोआप डोळ्यांतून अश्रु वाहू लागतात आणि रामभैय्यांच्या कृपेनेच विलक्षण आनंद परमशांती प्राप्त होते! परम श्रद्धेय स्वामी रामसुखदासजी, मी रामांशी नाते जोडले होते म्हणूनच माझ्यावर इतके प्रसन्न झाले होते!

प.पू.स्वामी तेजोमयानंदजी अमेरिकेस गेल्यावर त्यांनी तेथून मला फोन करून श्री. प्राणजीवनजी लोधिया हे आमच्या ट्रस्टसाठी देणगी धाडणार आहेत ती पोहोचल्यावर त्यांना इंग्रजीत पत्र लिहून पावती धाडून आभार मानावे असे सांगितले. श्री. प्राणजीवनजी यांनी १९८९ मध्ये तर देणगी धाडलीच, पण नंतर दरवर्षी दिपावलीनिमित्त ते मंडळास देणगी धाडीत असतात.१९९० मध्येच श्री.प्राणजीवनजी व सौ. ललिताजी लोधिया भारतात आली होती तेव्हा प.पू. स्वामी तेजोमयानंदजींच्या सांगण्यावरून दोघेही मुंबईला आम्ही जे.जे. हॉस्पिटलच्या कर्मचारी निवासांत राहात होतो. तेथे येऊन मला भेटून गेले. त्यामुळे त्यांना व मलाही फार आनंद झाला. तेव्हापासून त्यांच्याशी माझा सतत संपर्क आहे. नंतर १९९० मध्ये प.पू. स्वामी तेजोमयानंदांनी अमेरिकेतून मला त्यांच्या (मानस) अरण्यकांडावरील प्रवचनाच्या टेप्स भेट म्हणून धाडल्या. पवई आश्रमांतून त्या माझ्या घरी पोहोचत्या करण्यात आल्या. फक्त अरण्यकांडावर बारा टेप्स होत्या. त्यामुळे सविस्तर विवरण आल्याने त्या मला फार आवडल्या. मी त्यांचे सविस्तर रसग्रहण करून त्यांचे आभार मानले. त्यामुळे त्यांना

फार आनंद झाला. श्री. प्राणजीवनजी व सौ. ललिताजी यांची परत प्रत्यक्ष भेट जानेवारी १६, २०१२ मध्ये (टोप - संभापूर येथे) झाली.

पुढे असे झाले की, ते (पू. स्वामीजी) काही कारणाने अमेरिकेतून मुंबईला पवई येथे आले होत नेहमीप्रमाणे मला फोन आला की, 'मी आलो आहे, येवून भेटावे' मी सकाळी ९/९।। च्या सुमारास सँडहर्स्ट रोड स्टेशनजवळ आले. तेथे बाहेरच्या बाजूस राख्या विकणारे बसलेले होत राखी पौर्णिमा दोन दिवसांवर आली होती. म्हणून मी रामभैय्या व घरांतील इतरांसाठी काही राख्या विकत घेतल्या आणि लोकल पकडून कांजूरमार्गला जाऊन तेथून पवईस गेले. प. पू. स्वामी तेजोमयानंदजींच्या खोलीत पाऊल टाकून नमस्कार करून बैठकीवर बसले. मला वाटते त्यावेळी तेथे पू. स्वामीजींच्या शिवाय सौ. माधवी आनंद अर्थात सौ. सविता चक्रवर्तीही होती. थोडेफार बोलणे झाल्यावर अरण्यकांडाच्या टेप्स धाडल्या होत्या. त्यावरून त्यांचे प्रेम कळून आल्यामुळेही असेल कदाचित पण मला एकदम काय वाटले कुणास ठाऊक? मी पू. स्वामीजींना म्हटले, 'स्वामीजी! मी आपल्याला काही विचारू शकते कां?' ते म्हणाले, 'हो विचारा की काय ते!' मी म्हटले, 'स्वामीजी! मी आपल्याला राखी बांधू शकते कां? आपण संन्यास घेतला आहे म्हणून मुद्दाम विचारते आहे! ' ते म्हणाले, 'मग संन्यास घेतला असला म्हणून काय झाले? बांधा ना राखी!' आणि



असे म्हणून त्यांनी त्यांचा उजवा हात माझ्या पुढे केला! मला इतका आनंद झाला! मी पर्स उघडून त्यातील राख्यातून एक राखी हातात घेतली आणि उभी राहिले आणि ती राखी त्यांच्या उजव्या मनगटावर बांधली. बरोबर कुंकू नेलेले नव्हते. औक्षणाचे सामान नव्हते, काही गोड, मधूर खाद्य पदार्थही जवळ नव्हता. पण त्यांच्या रूंद बळकट मनगटावर राखी बांधताना इतक्या वर्षात कधी उचंबळून आले नव्हते एवढे प्रेम उचंबळून आले! वाटले 'आज खऱ्या अर्थाने मी रामभैय्याला राखी बांधत आहे!' आणि एकदम आनंदाने आणि प्रेमाने इतके रडू कोसळले की आवरता आवरेना! पू. स्वामीजींना बहुतेक काय बोलावे, काय करावे हे कळेनासे झाले असावे. ते बाहेरील बाजूस नुसते येरझारा घालू लागले.

सौ.माधवी माझ्या पाठीवरून हात फिरवून मला शांत करण्याचा प्रयत्न करू लागली. मग तिने पाणी प्यायला दिले! मग हळूहळू आवेग ओसरला आणि मी शांत झाले. पण त्या अश्रुतही आणि रडण्यातही विलक्षण आनंद होता. आजही तो प्रसंग आठवला तरी अंत:करण भरून येते. तेव्हापासून श्री रामभैय्याच्या कृपेने हे व्रत अद्याप निभावले गेले आहे आणि पुढेही निभावले जाईल ही खात्री आहे. अद्यापही त्यांना राखी बांधताना अष्टसात्विक भाव जागृत होऊन हाताला कधी कधी कंप सुटू लागतो आणि राखीची गाठही नीट बांधता येणे अवघड होऊन बसते!

यानंतर आमचा जो पत्रव्यवहार सुरू झाला आहे त्यात माझ्या बाजूने अद्यापही खंड पडलेला नाही. त्यांना मी जेवढी पत्रे लिहिली तेवढी आयुष्यात दुसऱ्या कुणालाही कधी लिहिली नाहीत. कारण माझे पत्र गेले आणि पू. स्वामीजींचे पत्रोत्तर नाही असेही इतक्या वर्षात कधी घडलेले नाही! त्यांची शेकडो पत्रे, मजजवळ आहेत. त्यांनी ज्या पाकीटावर स्वहस्ते पत्ते लिहिले आहेत ती पाकिटेही मी जपून ठेवली आहेत. श्रीरामचरितमानसात वर्णन आले आहे की जनकराजांनी दशरथांना सीता स्वयंवराची वार्ता कळवून मिंथिलेला वैदिक पद्धतीने विवाह समारंभ व्हावा म्हणून जी आमंत्रण पत्रिका धाडली होती ती दशरथ महाराजांनी अंत:पुरात राणीवशात सर्व राण्यांना बोलावून घेऊन वाचून दाखविली तेव्हा त्यांना अत्यंत आनंद झाला आणि सर्व राण्यांनी – रामांच्या मातांनी 'लेहिं परस्पर

अति प्रिय पाती । हृदयँ लगाइ जुड़वहिं छाती ।' असे केले. त्याप्रमाणे पू. स्वामीजींचे पत्र आले की माझी अवस्था होते. अर्थात् त्याला कारणही तसेच घडले आहे.

एकदा पू. स्वामीजींचा ज्ञानयज्ञ पुण्यात होता. म्हणून मी पुण्यास गेले होते व ते बिबवेवाडीत मला वाटते श्री. गोखले यांच्या घरी उतरलेले होते म्हणून मी सकाळी दहाच्या सुमारास त्यांना भेटण्यासाठी तेथे गेले होते. त्यावेळी इतरही काही महिला तेथे दर्शनासाठी आलेल्या होत्या. पू. स्वामीजी थोड्यावेळाने तेथे आले तेव्हा आम्ही सर्वांनी उठून त्यांना क्रमश: वंदन केले. त्यांनी प्रेमाने सर्वांची विचारपूस केली आणि बोलता बोलता म्हणाले की, माझ्या तीन आई (माता) आहेत आणि त्यातील एक या आहेत असे म्हणून माझा निर्देश केला! हे ऐकून तर मी थक्कच झाले. मी राखी तर बांधतच होते पण हे ऐकून माझ्यातील वात्सल्यभावही जागृत झाला आणि काय वाटले हे शब्दांत सांगणे कठीण आहे! तेव्हापासून दरवर्षी श्रावणांतील शुक्रवारी जिवतीची पूजा करून घरात जेव्हा मुलाबाळांना, लेकीसुनांना ओवाळते तेव्हा चि.रमेशला परत पू. स्वामीजींचे नांव घेवून ओवाळते आणि 'उदंड आयुष्य लाभो' असे म्हणून वात्सल्यभावाने त्याच्या मस्तकावर अक्षता टाकते आणि मनात येते की पू. स्वामीजी जगाच्या पाठीवर कुठेही असोत. त्यांच्यापर्यंत माझे हे शुभाशीर्वाद नक्की पोहोचतील. कारण शेवटी आत्मरूपाने सर्व एकच आहेत ना!

एकदा – दोनदा त्यांची गाठ पडल्यावर हा वात्सल्यभाव इतका अनावर झाला होता की त्यांच्या मस्तकाचे अवघ्राणही केले होते. हा सर्व वेडेपणा आहे हे कळते पण वळत नाही. पू. स्वामीजींच्याबद्दल प. पू. श्रीसद्गुरू प्रज्ञानानंद सरस्वती स्वामीजींच्याप्रमाणे 'त्वमेव माता पिता त्वमेव । त्वमेव बन्धुश्च सखा त्वमेव । त्वमेव विद्या द्रविणं त्वमेव । त्वमेव सर्वं मम देव देव ।' ही भावना तर आहेच. पण पू. श्रीसद्गुरूसंबंधी वात्सल्यभाव कधीच नसतो. पू. स्वामी तेजोमयानंदजींच्या बाबत या सर्वात वात्सल्यभावही मिसळलेला असतो. त्यामुळे त्या भावनेला एक वेगळेच सौंदर्य, मधुरता, प्रेम प्राप्त झाले आहे. मी जेव्हा श्रीरामकृष्ण परमहंसाचे चरित्र वाचले आणि त्यांना नरेंद्राबद्दल वाटणाऱ्या विलक्षण

ओढीचे वर्णन वाचले तेव्हा त्यात, मला पू. स्वामीजींच्याविषयी वाटणाऱ्या विलक्षण ओढीचे त्यांची भेट व्हावी म्हणून होणाऱ्या व्याकुळतेचे प्रतिबिंब आढळले. मी हे रामभैय्याचे स्मरण करून आणि ते अंतर्यामी आहेत, सर्वज्ञ आहेत याची जाणीव ठेवून लिहित आहे याकडे वाचकांनी लक्ष द्यावे. मला पूर्ण माहित आहे की, 'पू. रामकृष्ण परमहंसाची सर कुणालाच येऊ शकणार नाही! पण प. पू. स्वामी तेजोमयानंदजी आणि प. पू. विवेकानंद स्वामी हे एकरूपच आहेत याबाबत तर दुमत होण्याचे कारण नाही.'

प. पू. मुरारी बापू, प. पू. गोविन्ददेवजी गिरि, प. पू. रमाकांतजी व्यास, माझे अनेक गुरूबंधु, चिन्मय मिशनमधील काही आचार्य वगैरेंनाही माझी राखी न चुकता जाते पण 'श्रीरामचरितमानसा' त राम, भरत, लक्ष्मण, शत्रुघ्न आदि चारही भावांबद्दल जसे म्हटले आहे की, 'चारिउ सील रूप गुन धामा । तदपि अधिक सुखसागर रामा ।' त्याप्रमाणे माझे हे सर्वच बंधु 'सील रूप गुन धाम' आहेत. पण त्यामध्ये प. पू. स्वामी तेजोमयानंदजी 'तदपि अधिक सुखसागर' रामच आहेत! प. पू. मुरारी बापू वा प.पू. स्वामी गोविंददेव गिरि हे व इतरही प्रेम करतात पण त्यांना पत्रे पोहोचली तरी फार तर फोनवरून कळते पण ते पत्रोत्तरे लिहितच नाहीत आणि प. पू. स्वामी तेजोमयानंदजी जरी गेली ८/१० वर्षे फारसा पत्रव्यवहार करीत नसले तरी पत्र पोहोचताच फोन आला नाही असे कधीही केव्हाही घडत नाही. मग ते जगाच्या पाठीवर कुठेही हिंडत असले तरी यात कधी चूक होतच नाही! एवढे निरपेक्ष निर्हेतुक प्रेम रामभैय्याशिवाय कोण करू शकणार आहे? माझा अनेक वर्षाचा अनुभव आहे की, मी दाशरथी रामासाठी, माझ्या प्राणप्रिय रामभैय्याच्या आठवणीने जेव्हा अत्यंत व्याकुळ होऊन रडते तेव्हा ध्यानीमनी नसता अचानक प. पू. स्वामी तेजोमयानंदजींचा फोन येतो! आता याला काय म्हणावे बरे!

माझ्या भावनांची त्यांना किती कदर आहे यासाठी एकच उदाहरण पुरेसे आहे. त्यांनी दिनांक १/८/१९९३ रोजी Camp. San Diego येथून मला लिहिलेल्या पत्रात ते म्हणतात की, तुमचे ८ जुलैचे पत्र मिळाले. तारीख २५ जुलै रोजी पूज्य गुरूदेवांना San Diego येथे अचानक Heart attack येऊन सध्या ते गंभीर स्थितीतच Hospital मध्ये आहेत. मी फार

व्यस्त आहे. पुढे लिहीन. माझे मागील पत्र मिळाले असेल....तुमचा तेजोमयानंद.

एकदा असेच पू. स्वामीजी अमेरिकेहून पवईला आले असता त्यांच्या मातोश्री त्यांना भेटण्यासाठी पवईला आल्या होत्या तेव्हा त्यांचा मला फोन आला की, 'माझी आई आली आहे. तिची तुम्हाला भेटण्याची इच्छा आहे. तरी तुम्ही आश्रमात या.' म्हणून मी लगेच पवईला त्यांच्या आईंना भेटण्यास गेले होते. प. पू. स्वामीजी अमेरिकेत असताना मी त्यांना धाडलेली काही पत्रे त्यांनी त्यांच्या आईंना धाडून दिली होती. त्यामुळेच त्यांना मला भेटण्याची इच्छा झाली होती. त्यांना मी भेटल्यावर खूप आनंद झाला आणि मला तर परमानंद झाला. कारण 'पुत्रवती जुबती जग सोई। रघुपति भगतु जासु सुतु होई' अशा श्रेष्ठ श्रेणीतल्या एका मातेचे दर्शन मला झाले होते आणि त्यांचे वात्सल्ययुक्त प्रेम मलाही लाभले. प. पू. स्वामीजींचा सन १९५२ मध्ये मुंबईत बिर्ला मातोश्री क्रीडा केंद्रात ज्ञानयज्ञ झाला तेव्हा ते व त्यांच्या मातोश्री श्री. आशाताई कामदारांकडे उतरली होती आणि एक दिवस दुपारी आमच्या घरी भिक्षेसही आली होती. या निमित्ताने त्या दोघांचे चरणरज आमच्या घराला लागले होते. तो माझ्या जीवनातील अविस्मरणीय दिवस होता! खरेच सत्संगतीचे महत्त्व किती आहे हे मात्र रामभैय्यांच्या कृपेशिवाय कळत नाही. सामान्य व्यवहारी जगाच्या दृष्टीने ज्या गोष्टी अगदी मूर्खपणाच्या वाटतात त्याच भगवत् कृपेने परमानंद देत असतात. गोस्वामी, तुलसीदासांच्या 'गृही बिरति रत हरष जस विष्णु भगत कहुँ देखि' याची प्रचीति 'बिरति रत' नसूनही आली ही रामभैय्याचीच कृपा!

दिनांक ३०/०७/१९९० च्या पत्रात माझी व श्री. निर्मलाताई बजोरिया यांची भेट झाल्याबद्दल त्यांनी आनंद व्यक्त केला आहे. श्री. निर्मलाताई बजोरिया कलकत्ता येथे राहात असत. त्यांचे माहेर मुंबईला श्री. रूईया यांच्याकडे होते. त्या मुंबईला आल्या असता त्यांचा मला फोन आला. त्यांनी मला मलबार हिलवरील रूईया यांच्या निवासस्थानी भेटावयास बोलावले होते. प. पू. स्वामी तेजोमयानंदजींच्याकडूनच त्यांना माझी माहिती कळली होती. मी सौ. सुरेखास घेऊन मलबार हिलवर त्यांच्या

निवासस्थानी त्यांना भेटण्यास गेले. राजवाडा सदृश त्या निवासस्थानी त्यांची शुभ्र साध्या वेषातील हसतमुख अलंकाररहित वैराग्ययुक्त मूर्ती पाहून आम्हांला आनंद झाला आणि आश्चर्य वाटले. त्या पहिल्या भेटीतच आम्हा दोघींत आत्मीयता निर्माण झाली. त्यानंतर बरेच दिवस आमचा पत्रव्यवहारही सुरू होता. त्या दरवर्षी काही महिने अयोध्येत निवास करीत असत. मी कधी अयोध्येला गेले नव्हते म्हणून मी त्यांना माझ्यासाठी अयोध्येतील पवित्र मिट्टी, माती धाडा अशी विनंती केली होती आणि त्यांनी पोस्टल पार्सलने मला तेथील पवित्र मिट्टी धाडून दिली होती तेव्हा त्यांचे ते निर्हेतुक प्रेम पाहून मला इतका आनंद झाला होता! जेव्हा परंडा येथील रामविश्रामधाममधील राम मंदिरात श्रीराममूर्तीच्या प्रतिष्ठापनेसाठी चबुतरा (ओटा) बांधण्यात आला. तेव्हा त्यात मिसळण्यासाठी मी ती माती चि. संतोष चिटगोपकरजवळ दिली होती. त्या रामभैय्याच्या सिंहासनाखाली अयोध्येतील माती असल्याने त्या स्थानास माझ्या दृष्टीने अधिक माहात्म्य प्राप्त झाले आहे.

नंतर पूज्य निर्मलाजींची पू. मुरारीबापूंशी ह्रषीकेशला गाठ पडली असताना त्यांनी त्यांच्याशीही आमच्या मंडळाच्या कार्याबद्दल चर्चा केली होती. नंतर त्यांनी मला कळविले होते की, रामकृष्ण मिशनचे पू. आत्मानंद स्वामींना 'मानस गूढार्थ चंद्रिका' हिंदी टीका दाखवावी. ते मानसमर्मज्ञ आहेत. त्यांनी अनुकूल अभिप्राय दिला तर पू. निर्मलाजी ती टीका प्रकाशित व्हावी म्हणून प्रयत्न करतील म्हणून मी. पू. आत्मदेवानंदजींशीही पत्रव्यवहार केला होता तेव्हा त्यांनी मला कळविले होते की, ते मुंबईला खार येथील त्यांच्या आश्रमांत येणार आहेत. तेव्हा तेथे आल्यावर ते ती टीका पाहतील म्हणून चि. रमेश व सौ. सुरेखा यांनी त्या टीकेच्या २ वह्या खार येथील रामकृष्ण आश्रमांत प. पू. रामानुजानंदजी स्वामींच्याकडे नेऊन दिल्या होत्या. कारण त्या पू. स्वामीजींनी मुद्दाम फोन करून माझा परिचय करून घेतला होता व मी दादरच्या विवेकानंद केंद्रात त्यांच्या दर्शनासाठी गेले होते. त्यांनी वह्या ठेवून घेतल्या, पण झाले असे की पू. स्वामी आत्मदेवानंदजी मुंबईस येण्यापूर्वीच अपघात होऊन त्यांना देवाज्ञा झाली. ह्या सर्व गोष्टी मी पत्राने प. पू. तेजोमयानंद स्वामीजींना कळविल्या

होत्या. तेव्हा त्यांनी पत्रात लिहिले की (दिनांक १३/९/१९८९ चे पत्र San Jose हून लिहिलेल्या) आपले पत्र मिळाले. पूज्य स्वामी आत्मानंदजी अचानक ब्रह्मलीन झाले व ते ही अपघातात हे वाचून अतिशय दुःख झाले. 'मानस गूढार्थ चंद्रिके' च्या प्रकाशनासाठी खडतर तपश्चर्या करावी लागणार असे दिसते. श्रद्धा, भक्ती व धैर्यपूर्वक ती केली पाहिजे. याशक्ती मी देखील सेवा करीन.

प्रत्येक संकटाच्या प्रसंगी त्यांनी मला साह्य केले आहे ते ही अत्यंत निरपेक्षतेने! ऑक्टोबर ३० ते ५ नोव्हेंबर १९९२ या अवधीत त्यांचा श्रीमत्भगवतावरील ज्ञानयज्ञ बिर्ला क्रीडा केंद्र, चौपाटी, मुंबई येथे होणार होता. ते त्यासाठी अमेरिकेतून भारतात मुंबई येथे येणार होते. त्यावेळी मी त्यांना आमच्याकडे एक दिवस भिक्षेसाठी यावे अशी पत्राने विनंती केली होती व त्यांनी तेथूनच पत्राने सोमवार दिनांक २ नोव्हेंबरला दुपारी आपण आमच्या घरी भिक्षेला येऊ शकू असे कळविले होते आणि त्याप्रमाणे ते व त्यांच्याबरोबर त्यांच्या पूज्य मातोश्री, ज्या भागवत सप्ताहासाठी मुद्दाम इंदूरहून मुंबईस आल्या होत्या त्या ही आल्या होत्या. तसेच श्री. आशाताई कामदार ज्यांच्याकडे पू. स्वामीजी व पू. मातोश्री उतरल्या होत्या त्या ही आल्या होत्या. त्यावेळी श्री. श्रीरामजी गिल्डा व सौ. भाभीही डोंबिवलीहून आमच्याकडे ज्ञानयज्ञाला जाण्यासाठी राहावयास आली होती. रोज सकाळी ७॥ ते १० व संध्याकाही ६ ते ९ अशी प्रवचनाची वेळ होती. म्हणून ते आमच्याकडेच राहिले होते. ते सर्व दिवस आनंदात केव्हा निघून गेले हे कळलेच नाही. गोस्वामी श्रीरामचरितमानसात म्हणतात त्याची प्रचीति आली. श्री शिवजी म्हणतात,

*'गिरिजा संत समागम सम न लाभ कछु आन ।*
*बिनु हरि कृपा न होइ सो गावहिं बेद पुरान ॥ (७/१२५/ख)'*
*'अब मोहि भा भरोस हनुमंता ।*
*बिनु हरि कृपा मिलहिं नहिं संता ॥' (५/७/४)*

असे बिभीषण हनुमंतास म्हणतात. लंकिनीही हनुमंतास म्हणते–

*मतात स्वर्ग अपबर्ग सुख धीरअ तुला एक अंग ।*
*तूल न ताहि सकल मिलि जो सुख लव सतसंग ॥' (५/४)*

किती उतारे देणार? थोडक्यात सत्संगात जे सुख मिळते ते अवर्णनीय असीम आणि विलक्षण हृदयस्पर्शी असते.

*मपर उपकार बचन मनकाया । संत सहज सुभाउ खगराया ।।'*
*(७/१२१/३)*

कायावाचा मनोभावे परउपकार करणे, इतरांच्या दु:खाने दु:खी होणे, इतरांच्या सुखाने सुखी होणे, संकटकाळांत जास्तच प्रेम करणे हा संतांचा सहज स्वभाव असतो. तसाच स्वभाव प. पू. स्वामी तेजोमयानंदजींचा आहे. याचा अनुभव मी इतके वर्ष घेत आहे. माझे जावई श्री. नारायण रामकृष्ण वैद्य उर्फ मधुभाऊ यांना २० जुलै १९९० मध्ये देवाज्ञा झाली. तेव्हा मी पू. स्वामीजींना पत्राने कळविले होते. त्यावर हे दु:खद वृत्त वाचून त्यांनाही दु:ख झाले असे लिहिले होते व भगवत् कृपेने त्यांना उत्तम गती मिळो व आम्हांला हे दु:ख सहन करण्याचे धैर्य भगवत् कृपेने मिळो असे लिहिले होते व हरीच्छा नेहमी बलवान असते असे म्हटले होते.

यानंतर सन १९९८ मधील दोन गोष्टी मला आठवत आहेत. माझी मोठी मुलगी सौ. मंगला व जावई श्री. श्रीकृष्ण उर्फ भैय्यासाहेब अभ्यंकर ही दोघे यात्रा कंपनीतर्फे बँकॉक, हाँगकाँग, सिंगापूर येथे सहलीला जाणार होती. बुकींग झाले होते आणि जावयाच्या आधी एकाएकी श्री. भैय्यासाहेबांना चक्कर आली होती व तपासण्या होऊन तज्ञाच्या सल्ल्यानुसार औषधोपचार सुरू होते व त्यांनी सहलीला जाण्यास हरकत नाही असे सांगितले होते. जाण्यास पंधरा दिवस असता ही घटना घडली होती. पण यामुळे सौ. मंगलला त्यांच्या तब्येतीविषयी चिंता लागून राहिली होती की इतक्या लांब जायचे आहे आणि त्यांना परत काही त्रास झाला तर तिकडे कोणीच ओळखीचेही नाही. तिने तिची ही काळजी माझ्याजवळ बोलून दाखविली

होती. तेव्हा मी तिला म्हटले की, तू काळजी करू नको. मी प. पू. स्वामी तेजोमयानंदजींशी बोलते किंवा पत्राने त्यांना कळवते आणि त्याप्रमाणे मी करताच लिहिलेल्या दिनांक २२/९/१९९८ च्या पत्रात त्यांनी लिहिले आहे की, मुंबईहून पू. स्वामी चिदानंदांच्या मार्फत तुम्हांस माझा संदेश मिळालाच असेल की मी सिंगापूर व हाँगकाँग मिशन केंद्राकडे सौ. सुमंगला व श्रीकृष्ण अभ्यंकर यांना मदत करण्याविषयी कळविले आहे. काळजी

नसावी आणि खरोखरच माझी काळजी मिटली. असे निरपेक्ष प्रेम भगवत् भक्तांशिवाय दुसरे कोणी करूच शकत नाही. श्री भगवत् कृपेने श्री. अभ्यंकरांना मदत घेण्याची वेळ आली नाही पण त्यामुळे ज्या तत्परतेने पू. स्वामीजींनी मदतीची व्यवस्था केली. तिचे महत्त्व कमी होत नाही. म्हणूनच समर्थ म्हणतात, 'दीनाचा दयाळू, मनाचा मवाळू । स्नेहाळू, कृपाळू, जगी दासपाळू। तया अंतरी क्रोध संताप कैसा । जगी धन्य तो दास सर्वोत्तमाचा ।।' ती सर्व लक्षणे प. पू. स्वामी तेजोमया नंदजींना लागू पडतात हे अनेक वर्षे त्यांचे सूक्ष्म निरीक्षण करून माझ्या अनुभवास आले आहे.

माझा नातू अमेरिकेतून Solar Engery मध्ये M.Sc. करून आला होता पण येथे काही त्याला योग्य नोकरी मिळेना हे मी पू. स्वामीजींना सांगितल्यावर त्यांच्यासाठीही त्यांनी श्री. आठवले यांना आदेश देऊन त्याला नोकरी (Fellowship) मिळेल. अशी व्यवस्था केली. आज त्यांच्या कृपेने तो Tata Sons मध्ये खूप उच्च श्रेणीवर कार्यरत आहे. इतरही त्यांचे गुण असे आहेत की मुलांच्यावर ते इतके प्रेम करतात की आपण ते पाहून थक्क होतो.

परंड्यास ते आले असता एका महिलेने आपल्या तान्हुल्याला आणून त्यांच्या चरणावर ठेवले. तेव्हा त्यांनी ज्या प्रेमाने त्या शिशुला उचलून घेऊन गोंजारून त्याच्या चिमुकल्या हाताचा मुका घेतला की ते दृश्य पाहून मी थक्क झाले होते! तसेच वृद्ध व्यक्तींना ते इतक्या आदराने आणि प्रेमाने वागवतात की काय सांगावे? माझे मेहुणे श्री. रमाकांत नार्वेकर एकदा पवई आश्रमात मी असताना तेथे पू. स्वामीजींच्या दर्शनास आले होते. त्यांचे वय ८० वर्षाच्या पुढे होते. शिवाय त्यांना पार्किसन्स रोग झाला होता. त्यांनी खोलीत प्रवेश करताच पू. स्वमीजींचे त्यांच्याकडे लक्ष जाताच ते चटकन आपल्या खुर्चीवरून उठून दाराशी गेले आणि त्यांना हातास धरून आत आणले व आपल्या शेजारच्या खुर्चीवर प्रेमाने आदराने बसवले. नंतर श्री.रमाकांतांनी मला फोनवर विचारले होते की, 'मी पूज्य स्वामींच्या दर्शनास आलो असतां मी त्यांचे दर्शन घेण्यापूर्वीच ते स्वत:हून उठून येऊन मला हातास धरून आणून खुर्चीवर त्यांनी बसविले हे कसे काय?' मी म्हटले, 'आता मी ते कसे सांगणार?' पण तो त्यांचा स्वभावच आहे असे मला वाटते.

मी अनेकवेळा त्यांना पत्रातून निरनिराळे प्रश्न, शंका वगैरे विचारत असे

आणि ते तत्परतेने त्यांचे निराकरण करीत असत. त्यांनी मला जे उत्तमोत्तम आशीर्वाद दिले आहेत त्याबद्दल त्यांचे कितीही आभार मानले तरी ते अपुरेच पडतील आणि मुख्य म्हणजे त्यांचे आशीर्वाद अमोघ असतात असा माझा इतक्या वर्षांचा अनुभव आहे. ज्या ज्यावेळी ते भेटतात त्या त्यावेळी मला एखादा तरी ग्रंथ, कॅसेटस् अथवा सी.डी. दिल्याशिवाय त्यांना राहावतच नाही. मी तर काहीच सेवा करू शकत नाही. तरीही ते इतके निर्हेतुक प्रेम करतात ही विशेष भगवत्कृपाच आहे. (त्यांच्या पत्रोत्तरातून साधकांना उपयुक्त जो काही मजकूर आहे त्याचे संकलन करून तो या ग्रंथात परिशिष्ट रूपाने देण्यात आला आहे.)

श्रीरामचरितमानसात जी संत लक्षणे दिली आहेत ती प्रस्तावनेत दिली गेली आहेत. एकनाथी भागवतातही नाथांनी ३० लक्षणे दिली आहेत. यातील बहुसंख्य लक्षणे मला प. पू. स्वामी तेजोमयानंदांच्यामध्ये आढळून आली आहेत. दिनांक २९/०८/२००१ च्या पवई आश्रमातून लिहिलेल्या पत्रांत त्यांनी मला लिहिले होते की, 'माझ्या रामायण प्रवचनांचा आस्वाद तुम्ही घेत आहात हे वाचून आनंद झाला. माझ्यावर सीताराम व शिवपार्वती आशीर्वाद देत असल्याचे तुम्हाला दिसलेले दृश्य मला फार आवडले. त्याची नेहमीच गरज आहे. संपूर्ण तुलसी रामायण गान पाठ करावे असा संकल्प आहे. त्यासाठी रोज दोन तास स्टुडिओत जावे लागेल. श्री प्रभुरामचंद्रच संकल्प पूर्ण करू शकतील.' यानंतर श्रीरामभैय्यांचे कृपेने तो संकल्प पूर्ण झाला आणि त्याच वर्षी डिसेंबरमध्ये चिन्मय मिशनला पन्नास वर्षे पूर्ण झाली म्हणून मुंबईत जो जागतिक सुवर्ण महोत्सव झाला त्यावेळी त्या संपूर्ण सेटचे प्रकाशन करण्यात आले होते. माझ्या प्रकृति असवास्थ्यामुळे मी त्या संमेलनास जाऊ शकले नव्हते. पण ते संमेलन संपताच सांगली चिन्मय मिशन शाखेचे जे सदस्य त्या महोत्सवास गेले होते. त्यांच्याकडून मला असे कळले की सांगलीचे सदस्य जेथे उतरले होते तेथे स्वत: परमपूज्य स्वामी तेजोमयानंद आले होते आणि त्यांनी माझ्यासाठी संपूर्ण तुलसी रामायण गान पाठाचा संपूर्ण संच असलेली पिशवी (कॅरीबॅग) त्यांच्या जवळ देऊन माझ्याकडे पोहोचती करण्याचा आदेश दिला होता. म्हणून त्यांनी तो माझ्याकडे तात्काळ पोहोचता केला होता. हे सर्व ऐकून

मला काय वाटले हे शब्दात कसे सांगणार? त्या सर्व महोत्सवाची जबाबदारी त्यांच्यावरच होती. ते जगभरातील चिन्मय मिशनचे प्रमुख असून आणि कार्यात अत्यंत व्यस्त असून स्वत: जाऊन तो संच देऊन आले! असे निर्हेतुक प्रेम अशी तत्परता कुठे पहावयास सापडेल?

त्यांच्या त्या रामायण गानाच्या कॅसेटस् मला खूप आवडल्या. रोज ३, अथवा अधिक कॅसेटस् ऐकून मी त्यावरून अनेक नवाह पारायणे ऐकली. स्वत: वाचण्यापेक्षा त्यांच्या आवाजांतील कॅसेटस् ऐकत डोळे मिटून ते ते प्रसंग डोळ्यापुढे आणून त्यांचा आस्वाद घेण्यात काही वेगळाच आनंद मिळे म्हणून मी प. पू. स्वामी तेजोमयानंदजींना कळविले होते की, त्या रामायण गान पाठाचा एक संच पू. डुंगरदासजींना धाडावा अशी माझी इच्छा आहे. कारण पू. डुंगरदासजी महाराजांना संपूर्ण श्रीराम चरितमानस मुखोद्गत असून त्यांना कुठल्याही कांडातील दोहा चौपाईचा नुसता आकडा सांगितला तर ते लगेच ती म्हणून दाखवू शकतात. तेव्हा त्यांनी माझ्या विनंतीनुसार लगेच पू. डुंगरदासजींच्याकडे एक संच धाडण्याची व्यवस्था केली व मला कळविले की त्याचे पैसे धाडण्याची आवश्यकता नाही. नंतर दिनांक १/२/२००२ च्या पत्रात पू. स्वामीजींनी मला लिहिले होते की श्री डुंगरदासजींना रामायण गानाच्या कॅसेटस् आवडल्या इतकेच नव्हे तर त्यांनी त्यांच्या मित्रांनाही त्या ऐकवल्या आणि परम श्रद्धेय स्वामी रामसुखदासजींची पुस्तके व कॅसेटस् त्यांनी परम पूज्य स्वामी तेजोमयानंदजींना धाडल्या होत्या आणि पू.स्वामीजींनी त्यांना धन्यवादाचे पत्रही लिहिले होते. हे मला दि.१६/३/२००२ च्या स्वामीजींच्या पत्रावरून कळले होते. पुढे त्या दोघांची समक्ष गाठभेटही झाली होती. ती हकीगत यापूर्वी लिहिली गेली आहे म्हणून येथे परत लिहित नाही.

सन १९९५ मधील घटना आहे. श्री आदिनाथ यादव यांच्या ज्या घरात परम पूज्य श्रीसद्गुरु प्रज्ञानानंद सरस्वती स्वामींचे दीर्घकाळ वास्तव्य झाले होते ते त्यांनी विकावयाचे ठरविले होते. परम पूज्य स्वामींनीच ते घर बांधले गेले तेव्हा त्यास 'रामविश्रामधाम' हे नांव दिले होते. इस्लामपूर येथील आमच्या घरीही पू. स्वामीजींचे दीर्घकाळ वास्तव्य झाले होते, तेथे त्यांना प्रभु रामचंद्रांचा साक्षात्कारही झाला होता. पण ह्यांना सन १९६५

मध्येच देवाज्ञा झाल्याने आम्हांला पुढे ते १९७० च्या सुमारास विकावे लागले होते. त्या गोष्टीची मला फार खंत वाटत होती. श्री. आदिनाथ यादवांचे 'रामविश्रामधाम' परंड्यातच श्रीं च्या समाधि मंदिराच्या अगदी जवळच होते व तेथेही श्रीं चे अनेक वर्षे वास्तव्य झाले होते. विाय श्रीं ची पुण्यतिथी वगैरे परंड्यातच साजरी होत असे, त्यामुळे आम्ही सर्व परंड्यास दरवर्षी न चुकता जमत असू. म्हणून आता ही जागा तरी दुसऱ्या कुणाच्या हाती न जाता श्रीरामचरितमानस प्रेमी मंडळाकडे राहावी अशी माझी तीव्र इच्छा होती. श्रीं च्या पुण्यतिथी उत्सवांत १९९५ मध्ये या विषयावर चर्चा होऊन असे ठरले होते की, मंडळाजवळ पैसे नसले तरी इसारा म्हणून लागणारी रक्कम पंच्याहत्तर हजार रूपये प्रत्येकाने अकरा अकरा हजार अशी सात व्यक्तींनी दिली तरी ती जागा मंडळास मिळू शकेल व नंतर उरलेली रक्कम जमा होताच मंडळ ती जागा खरेदी करू शकेल. मी उत्सवानंतर नेहमीप्रमाणे मनमोकळेपणाने ही सर्व हीकगत परमपूज्य स्वामी तेजोमयानंदजींना कळविली होती. लगेच त्यांनी दि.२२/३/१९९५ ला बंगलोरहून पत्र लिहिले होते. त्यात त्यांनी लिहिले होते की, '१३ तारखेचे पत्र मिळाले. श्री.यादव यांचे घर संस्थेसाठी अवश्य घ्यावे. मी त्यासाठी रू.११०००/- धाडीन. अशी जागा पुन्हा मिळणार नाही' आणि लगेच त्यांच्याकडून अकरा हजारांचा ड्राफ्ट आला म्हणजे मी नुसते आमचा असा विचार आहे असे कळविताच आम्हा कुणाकडून पैसे जमा होण्यापूर्वीच त्यांच्याकडून देणगी आली आणि कार्याचा शुभारंभ झाला. आज तेथे श्रीरामभैय्यांच्या कृपेने भव्य दिव्य श्रीराम मंदिर उभे आहे. त्यानंतर जेव्हा एखादा नवीन प्रकल्प हाती घ्यावयाचा असतो तेव्हा मी त्यांना विनंती करते की, 'त्यांच्या हातून शुभारंभ व्हावा म्हणजे ते कार्य उत्तमप्रकारे संपन्न होते अशी माझी दृढ निष्ठा आहे. तरी त्यांनी फुल ना फुलाची पाकळी धाडावी आणि या विनंतीला ते लगेच मान देऊन माझा लळा पुरवितात व ते कार्य उत्तमरित्या सुफळ संपूर्ण होते हे विशेष!' दि.२९/३/१९९५ ला म्हैसूरहून लिहिलेल्या पत्रांत त्यांना लिहिले आहे व तुम्हांला माझे पत्र व अकरा हजारांचा चेक मिळाला असेल. त्यांनी म्हटले होते की, यात आभार कसले मानता? मला जरी श्री स्वामीजींचे प्रत्यक्ष दर्शन झालेले

नसले तरी मी ही त्यांचा भक्तच आहे. नंतर १९९८ मध्ये पू. स्वामीजी परंड्यास आले होते तेव्हा तेथे फक्त जागेचे भूमीपूजन झाले होते.

त्यावर्षी त्यांचा ज्ञानयज्ञ सोलापूर येथे होणार होता. तो झाल्यावर परमपूज्य स्वामीजी १७ मार्च रोजी सकाळी सोलापूरहून निघून बार्शीस थोडावेळ थांबून परंड्यास येणार होते. त्या आधी सोलापूरला जाण्यापूर्वी ते पंढरपूरला येणार होते व तेथे श्रीविठ्ठल रूक्मिणींचे दर्शन घेऊन पुढे सोलापूरला जावे असा त्यांचा विचार होता. श्री. श्रीरामजी गिल्डांनी आम्हांला, पू. स्वामी तेजोमयानंदजींना श्रीविठ्ठल रूक्मिणीचे दर्शन घेण्याची इच्छा आहे, तरी पू. वा. ना. उत्पातांना भेटून व्यवस्था करावी असे कळविले होते. पूज्य श्री. वा. ना. उत्पात यांची पूर्वीच ओळख झालेली होती. त्यांचे घरही मंदिराजवळच आहे. मग सौ. रेखा पटवर्धन व मी पू. स्वामीजी पंढरपूरला येणार होते त्याच्या आदल्या दिवशीच पंढरपूरला गेलो आणि श्री. वा. ना. उत्पात यांना भेटून दुसरे दिवशी प. पू. स्वामी तेजोमयानंदजी पंढरपूरला येणार आहेत आणि त्यांना श्रीविठ्ठल रूक्मिणीच्या दर्शनाची इच्छा आहे असे कळवले. तेव्हा त्यांनी सांगितले की, ते मंदिराकडे निघाले की फोन करा म्हणजे मी देवळात उपस्थित राहीन.

नंतर आम्ही आमची गुरूभगिनी श्री. यमूताई आराध्ये ही पंढरपूर येथेच कऱ्हाड मार्गावर राहात होती. तिच्याकडे प. पू. स्वामी तेजोमयानंदजी पुण्याहून आले की थांबतील व न्याहरी करून मंदिराकडे जातील अशी सर्व व्यवस्था केली. दुसऱ्या दिवशी सकाळी आमच्यापैकी काही मंडळी कऱ्हाड-पंढरपूर रस्त्यावर पू. स्वामीजींचे स्वागत करण्यासाठी जाऊन उभी राहिली होती व त्यांची मोटार येतांच त्यांना थांबवून श्री. आराध्यांच्या घराकडे घेऊन आली. आम्ही तेथे फुलांच्याच पायघड्या घातल्या होत्या, रांगोळी काढली होती. ते येताच औक्षण करून व त्यांच्यावर पुष्पवृष्टी करून त्यांना मोठ्या आदराने व प्रेमाने घरांत घेऊन आलो. तेथे त्यांच्या दर्शनासाठीही काही मंडळी येऊन थांबली होती. त्यांनी सर्वांची प्रेमाने विचारपूस केली व नंतर न्याहरीही केली. आम्ही श्री. उत्पातांना कळवून लगेच मंदिराकडे जाण्यास निघालो. तेथे श्री. वा. ना. उत्पात उपस्थित होतेच. त्यांनी श्री नामदेव पायरीपाशीच पू. स्वामीजींचे स्वागत केले व

सर्वांना मंदिरात घेऊन गेले. तेथे जाता जाता त्यांनी पू. स्वामीजींना मंदिरासंबंधी सर्व माहिती देण्यास सुरूवात केली. नंतर सभागृह ओलांडून आम्ही पायऱ्या चढून गेलो व आत श्री विठ्ठलापाशी पोहोचलो. तेथे पू. स्वामींच्या हस्ते पांडुरंगाची तुलसी वाहून अर्चना करण्यात आली. त्यामुळे पू.स्वामीजींनाही फार आनंद झाला. नंतर विठ्ठलास प्रदक्षिणा घालून त्यांना श्रीरूक्मिणी मातेच्या दर्शनास नेण्यात आले. त्यावेळी तेथील चौकांतील रूक्मिणी स्वयंवरासंबंधीची सुंदर छायाचित्रे श्री. उत्पातांनी मुद्दाम पू. स्वामीजींना दाखविली. असे म्हणतात की, रूक्मिणी मातेचे पत्र घेऊन सुदेव नावाचा जो ब्राह्मण भगवान श्रीकृष्णाकडे गेला होता त्याचे वंशज हे उत्पात असून ते मुख्यत: श्रीरूक्मिणी मातेचे उपासक मानले जातात. असो दर्शन घेऊन झाल्यावर श्री. उत्पात पू. स्वामीजींना त्यांच्या संस्थेच्या ऑफीसात घेऊन गेले. तेथे आम्हां सर्वांना मसाल्याचे दूध प्यावयास देण्यात आले आणि परमपूज्य स्वामी तेजोमयानंदजींना श्रीविठ्ठलाचा पीतांबर प्रसाद म्हणून देण्यात आला व नंतर तेथून दुसऱ्या एका विठ्ठल मंदिरात नेण्यात आले. तेथील दर्शन घेतल्यावर आम्हांला निरोप देण्यात आला.

नंतर तेथून प. पू. स्वामी तेजोमयानंदजी श्री. मीनाक्षी देशपांडे हिच्या घरी भिक्षेसाठी गेले व आम्ही श्री. यमूकडे भोजनासाठी गेलो. तेथून प. पू. स्वामीजी सोलापूरला जाणार होते म्हणून सोलापूरहून त्यांना नेण्यासाठी मला वाटते टाटा सुमो धाडण्यात आली होती. आम्ही गुरूबंधु भगिनीही सोलापूरात पू. स्वामीजींच्या ज्ञानयज्ञासाठी जाणार होतो. म्हणून आम्ही ही गाडी ठरविणार होतो. म्हणून पू. स्वामीजी म्हणाले की, सोलापूरहून जी गाडी आली आहे त्यातूनच आम्ही यावे. दुसरी गाडी ठरविण्याची आवश्यकता नाही. त्यांनी ती गाडी आराध्ये यांच्याकडे धाडून दिली. त्या गाडीत सामानासह बसून आम्ही श्री. मीनाक्षी देशपांडे हिच्या घरी गेलो. ती स्वत: अपंग असून तिने अपंगासाठी संस्था काढली असून खूपच मोठे कार्य ती करीत होती. म्हणून पूज्य स्वामीजींना तिचे फार कौतुक होते. शिवाय श्री.प्राणजीवनजी लोधियांकडूनही आमच्याप्रमाणे तिच्या संस्थेलाही देणगी येत असे. या निमित्ताने तिची ओळख झाली व आत्मीयता उत्पन्न झाली. अजूनही ते प्रेम टिकून आहे. असो.

नंतर आमची गाडी पुढे व तिच्या पाठोपाठ पू. स्वामीजी जिच्यांत बसले होते ती गाडी अशा दोन्ही पंढरपूर शहर सोडून बाहेर पडल्या आणि एकाएकी त्यांची गाडी पुढे काढून ती आमच्या गाडीच्या पुढे नेऊन उभी करण्यात आली आणि परमपूज्य स्वामीजी व त्यांच्या बरोबर एक गृहस्थ गाडीतून उतरून आमच्या गाडीजवळ आले. मी टाटा सुमोत मागील बाजूस बसले होते. पू. स्वामीजी मला म्हणाले, 'कमलताई! तुम्ही आपल्या गाडीत चला' व त्या गृहस्थांना त्यांनी आमच्या गाडीत बसण्यास सांगितले. ते स्वत: उतरून आल्याने मी थक्कच झाले आणि मुकाट्याने त्यांच्या पाठोपाठ जाऊन त्यांच्या गाडीत बसले. पू. स्वामीजी स्वत: पुढे ड्रायव्हरजवळ बसले व मी मागील बाजूस त्यांच्या पाठीमागील सीटवर बसले. तेथे मागील बाजूस आणखी एक गृहस्थ बसलेले होते. उन्हाची वेळ होती. पू. स्वामीजींच्या गाडीत ए. सी. होता, त्यामुळे उन्हाचा त्रास होत नव्हता. मला उन्हाचा त्रास होऊ नये म्हणून मला त्यांनी त्यांच्या गाडीत मुद्दाम बोलावून घेतले होते. हे निर्हेतुक प्रेम पाहून अंत:करण आधीच भरून आले होते. त्यात गाडी सुरू होताच त्यांनी कुणा संतांच्या प्रवचनाची किंवा कुणाच्या भजनाची सी. डी. लावली! झाले, तेवढे निमित्त पुरले आणि प्रेमाने मला जे रडू कोसळले ते काही केल्या आवरेना! नाईलाजाने मी पू. स्वामीजी बसलेले होते तेथून फटीतून त्यांचे वस्त्र हाताला आले ते धरून ओढले आणि हुंदके देत देत 'स्वामीजी! प्लीज.....' एवढेच बोलू शकले. त्यांनी लगेच सी.डी. बंद केली व माझ्या शेजारी बसलेल्या गृहस्थांना मला पिण्यास पाणी देण्यास सांगितले. मी कशीबशी पाणी प्यायले व मग माझा आवेग ओसरला. पण नंतर मला इतके संकोचल्यासारखे झाले की काय सांगावे? पू. स्वामीजी कामात इतके व्यस्त असतात की त्यांना जराही सवड नसते. असे प्रवासास निघाले की त्यांना त्यांच्या आवडीची भजने अथवा प्रवचने यांचे श्रवण करण्यास अवसर मिळतो. त्यात माझ्यामुळे अडथळा आला होता. ज्ञानयज्ञ संपल्यावर परत त्यांच्या बरोबर त्यांच्या गाडीतून जेव्हा सोलापूरहून बार्शीस निघाले तेव्हा परत तसाच गोंधळ होऊन त्यांना सी. डी. बंद करावी लागली. प्रत्यक्ष बोलून क्षमा मागण्याचे धाडसही झाले नाही. नंतर पत्रातून याबद्दल त्यांची क्षमा मागितली होती.

पण त्यांना बहुतेक माझा रागच आला नव्हता तर ते काय म्हणणार? नंतरही ते मला मुद्दाम आपल्याबरोबर आपल्या गाडीतून घेऊन गेले होते असा अनुभव मला आला आहे. श्रीराम चरितमानसात जनकराजांनी रामभैय्यांना म्हटले होते की, 'मोर भाग्य राउर गुन गाथा । कहि न सिराहिं सुनहु रघुनाथा । (२/३४२/३)' तसे मला म्हणावेसे वाटते.

सन २००० मधील गोष्ट आहे. प. पू. स्वामी तेजोमयानंदजी अमेरिकेत डलास येथे गेले असता तेथे त्यांच्या हस्ते श्रीराम मूर्तीची स्थापना झाली तेव्हा त्यांना माझी आठवण झाली होती. कारण मी नेहमी म्हणत असे की, 'रामविश्रामधाम' मध्ये जी राममूर्ती बसेल तर ती सिंहासनाधिष्ठित रामभैय्याची सपरिवार असेल. प्रत्येक ठिकाणी त्यांना उभे कशाला करून ठेवायचे? पूज्य श्रीसद्गुरूंनी 'रामविश्रामधाम' नाव ठेवले आहे तर त्यांना जरा विश्राम करू देत ना! त्यामुळे तेथे सिंहासनाधिष्ठित श्रीरामसीता व रामचरणाजवळ हनुमान अशी मूर्ती पाहून त्यांना माझी आठवण झाली. पण एवढ्यावर भागले नाही. त्यांनी दि.२०/१/२००० ला लिहिलेल्या पत्रांत त्या मूर्तीविषयी सर्व माहिती मला कळविली. मूर्तीची उंची, रूंदी, खोली यांची मापे, मूर्तीकाराचे नांव, पत्ता, फोन नंबर, त्या श्री विग्रहाचे मूल्य वगैरे माहिती स्वत:च्या हस्ताक्षरात लिहून धाडली व नंतर तेथील श्रीविग्रहाचे छायाचित्रही धाडले. त्यावेळी रामभैय्याच्या हातात धनुष्य नव्हते. ते डलास येथे देण्यात आले असे लिहिले होते. त्या पत्राच्या उत्तरात मी लिहिले असावे की यात लक्ष्मणभैय्यांची मूर्ती कशी नाही? हे मला खटकले असावे. त्यानंतर दि.२२/३/२००० च्या मला लिहिलेल्या पत्रात त्यांनी लिहिले होते की, डलास येथे लक्ष्मणादि बंधु अदृश्य रूपाने आहेत! नंतर सन २००४ मध्ये ऑगस्टमध्ये ते डलास येथे गेले असता त्यांचा मला फोन आला की 'आताच मी येथील मंदिरात लक्ष्मणांची प्रतिष्ठापना केली असून आता प्रवचन देण्यास जात आहे.' हे ऐकून मला फार आनंद झाला आणि इतक्या गडबडीतही त्यांना माझी आठवण येऊन फोन करावासा वाटला याबद्दल आश्चर्यही वाटले. विशेष म्हणजे ताबडतोब त्यांनी तेथून लक्ष्मणभैय्यांच्या स्थापनेची दोन छायाचित्रे तेथून णीसशपीं कुरियरने धाडून दिली ती ही मला २/३ दिवसात मिळाली!

मी प. पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वतींच्या मुखातून असे ऐकले होते की नारदभक्तिसूत्रें वा शांडिल्य भक्तिसूत्रें याप्रमाणे मानसभक्तिसूत्राचीही रचना व्हावयास हवी आहे. कारण या सर्वापेक्षाही त्यात काही वेगळेपणा आढळतो. 'जाते बेगि द्रवउँ मैं भाइ । सो मम भगति भगत सुखदाई ।।' (३/१६/२) तसेच 'सोइ सेवक प्रियतम मम सोई । मम अनुशासन मानै जोई ।।' (७/४३/५) तसेच 'संकर भजन बिना नर भगति न पावइ मोरि ।।' अशी काही वेगळी वैशिष्ट्ये 'मानसात' आढळतात. भगवंताचे अनुशासन मानणारे भगवंतास प्रिय होतात. जसे मातृपितृभक्त पुंडलिक, पतिव्रता सतीशिरोमणी अनुसूया माता अथवा गुरूचरित्रात ज्याचा उल्लेख आहे तो गुरूभक्त शिष्य वेदधर्मा यांच्या आचरणाने भगवान द्रवले आणि त्यांनी स्वतःहून त्यांना दर्शन दिले. गुरू हे शिवस्वरूप असतात म्हणून गुरूकृपा वा प्रत्यक्ष शिवकृपा झाल्याशिवाय रामभक्ति प्राप्त होत नाही असे पूज्य स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती म्हणत. पण 'मानसभक्तिसूत्रे' रचली जावीत ही त्यांची इच्छा पूर्ण झाली नव्हती. प. पू. स्वामी तेजोमयानंदजी संस्कृत रचना सुंदर करतात हे मी पाहिले होते. म्हणून मी त्यांना माझ्या श्रीसद्गुरूंची इच्छा सांगून ते ती पूर्ण करू शकतील असे म्हटले होते. तेव्हा ते 'पाहू! प्रभूंची इच्छा असेल तसे होईल!' असे म्हणाले होते आणि आश्चर्याची आणि आनंदाची गोष्ट म्हणजे दिनांक १४/१२/२००१ रोजी रामभैय्यांच्या कृपेने त्यांना स्फूर्ती होऊन त्यांच्याकडून 'मानसभक्तिसूत्रां' ची रचना झाली. माझी इच्छा होती की सूत्रे ९, १८ किंवा २७ अशा संख्येत असावीत ती ही इच्छा पूर्ण झाली होती. ती १८ सूत्रे त्यांनी लगेच माझ्याकडे धाडून दिली होती. त्यावेळी मला परमानंद झाला होता, त्यांच्या परवानगीने ती आम्ही 'प्रज्ञानानंद सरस्वती' च्या वर ओंकार ट्रस्ट पुणे या संस्थे तर्फे जो विशेषांक निघाला त्यात प्रकाशित केली होती. पुढे चिन्मय मिशनतर्फे पू. स्वामी तेजोमयानंदाच्या त्यावरील इंग्शिल कॉमेंट्रीसह प्रकाशित झाली. नंतर त्यांचा 'हिंदी अनुवादफ मला वाटते पू. स्वामी भास्करानंदानी केलेला व मराठी अनुवाद रामभैय्यांनी माझ्याकडून करून घेतलेलाही चिन्मय मिशन तर्फे प्रकाशित झाला.

प. पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती यांच्या 'मानस गूढार्थ चंद्रिका' या

'मानसा' वरील बृहत् टीकेत तसेच प. पू. स्वामी तेजोमयानंदजी यांच्या 'मानसा' वरील प्रवचनात पू. श्री. मधुसूदन सरस्वती यांच्या 'श्रीमद् भगवत् भक्ति रसायन' ग्रंथातील संदर्भ येत असत, म्हणून त्या ग्रंथासंबंधी मला फार उत्सुकता होती. मी पू. स्वामी तेजोमयानंदजींना याबद्दल कळविले होते. तेव्हा त्यांनी तो ग्रंथ भांडारकर इन्स्टिट्युटकडे कदाचित मिळेल असे म्हटले होते. पण तेथे वा मुंबईच्या एशियाटिक लायब्ररीत चौकशी केली पण तो ग्रंथ मिळू शकला नाही असे मी त्यांना कळविताच त्यांच्याकडे असलेल्या त्या ग्रंथाची संपूर्ण झेरॉक्स प्रत काढून (जवळजवळ १८० पृष्ठे असावी) त्यांनी मला धाडून दिली व त्याचा आनंद लुटावा असे कळविले. रामभैय्यांच्या कृपेने मी आनंद तर लुटलाच शिवाय त्यांनी तो हिंदी अनुवादासह धाडला होता त्याचा संपूर्ण मराठी अनुवादही केला. नंतर डॉ. कल्याण काळे यांच्याकडून तो ग्रंथ पुनर्मुद्रित झाल्याचे कळले म्हणून त्याची प्रत व पूज्य दासगणू महाराजांनी त्याचा भावार्थ मराठी प्रकाशित केला होता. तो ग्रंथ 'भगवत् भक्ति रसायन भावार्थ प्रकाशिका' ही मागवला व दोन्हीचा समन्वय करून मराठी गद्य रूपांतर लिहून काढले. ते 'अवलोकन' या त्रैमासिकातून क्रमश: प्रकाशित होत आहे! पू. स्वामीजींच्यामुळेच या अद्‌भुत ग्रंथाचा सत्संग घडला. नवरसांत पूर्वी भक्तिचा समावेश केला गेला नव्हता. या ग्रंथामुळेच भक्तिला स्वतंत्र रस म्हणून मान्यता मिळाली! ग्रंथ अवघड आहे असे पू. दासगणू महाराजांनीही म्हटले आहे!

मी नेहमी पू. स्वामीजींना पत्रे लिहित असे. त्यामुळे १९९० सालापासून चि. आरती व चि. सचिनही त्यांना पत्रे लिहून परीक्षेच्यावेळी किंवा वाढदिवसाच्यावेळी त्यांनी आशीर्वाद द्यावे म्हणून विनंती करीत व पू. स्वामीजीही न चुकता त्यांच्या पत्रांना उत्तर देत असत. त्यांना चांगले मार्कस् पडले की त्यांचे खूप कौतुक करीत. ते ड्रप गीश होते तेव्हा त्यांनी मुद्दाम त्यांचे फोटोही मागवून घेतले होते. प्रत्येक पत्रांत भगवत् स्मरण करून कार्य करावे असे लिहित असत. त्यांनी नातवंडांना लिहिलेली पत्रेही जपून ठेवली आहेत. आता चि. सचिन आणि डॉ. सौ. आरती आपापल्या व्यवसायात आणि कुटुंबियात दंग झाली आहेत. पण ती दर्शनास गेल्यावर पू. स्वामीजींना अजूनही आनंद होतो.

त्यांच्या सहवासातील काही प्रसंग हृदयात कोरले गेले आहेत. पू. स्वामीजींचा ज्ञानयज्ञ डोंबिवलीस होता. त्याचवेळी डोंबिवलीत श्रीगणेश मंदिरात आमच्या गुरूबंधुभगिनींचे सामुदायिक मराठी मानसाचे पारायण ठरले होते. सौ. अलकाताई व श्री. मुतालिक तसेच श्री. ध्रुवजी कुलकर्णी यांच्यामुळे हा दुर्लभ योग जमून आला होता. पारायण मंदिरात होत असे व जेवण्याची व राहण्याची व्यवस्था श्री. ध्रुवजींनी केली होती. नंतर संध्याकाळी सर्वांना पू. स्वामीजींच्या रामायणावरील प्रवचनांचा लाभ होत असे. ते तेथील चिन्मय शाखेच्या जागेत उतरलेले होते. मी तब्येतीच्या कारणामुळे जाऊ शकत नव्हते. पण मी मनाने तेथेच होते. फोनवर पू. स्वामीजींशी बोलणे झाले होते. तेव्हा ते म्हणाले होते की, तुम्ही इकडे येण्याची दगदग करू नका. नंतर लगेच मी टोप-संभापूरला येणार आहे. तारीख ८ जानेवारीला. तेव्हा तेथे या. त्या दिवशी माझा वाढदिवसही येत होता. पण मी म्हटले की, 'स्वामीजी, पण मला कोण आणणार? ' तेव्हा ते म्हणाले, 'मी सौ. रेखा पटवर्धनला सांगितले आहे, ती तुम्हास घेऊन येईल. मी संध्याकाळी ६ ला तेथे पोहोचेन. त्या सुमारास तुम्ही तेथे या.फ

त्याप्रमाणे त्यांनीच सर्व व्यवस्था करून ठेवली होती. खरे म्हणजे सौ. रेखा आदले दिवशीच मुंबईहून आली होती. पण चि. सुहास व ती मला घेऊन संध्याकाळी ४।।/५ सुमारास मिरजेहून निघाला आणि सहाचे सुमारास टोप-संभापूरला जाऊन आम्ही पोहोचलो. आत जाऊन गाडी उभी करून आम्ही थांबलो होतो. तेवढ्यात पू. स्वामीजी तेथे पोहोचले. आम्ही गाडीतच बसलो होतो. त्यांचे पूर्णकुंभाने स्वागत करण्यात आले आणि ते पायऱ्या चढून सत्संगासाठी लोक जमले होते त्या हॉलमध्ये त्यांच्या आसनावर जाऊन बसले. नंतर आम्ही तिघे उतरलो व हळूहळू पायऱ्या चढून त्या हॉलच्या दाराशी जाऊन उभे राहिलो. माझी दृष्टी पू. स्वामीजींच्यावर पडली की काय होते ते कळतच नाही! अंत:करण इतके आनंदाने आणि प्रेमाने भरून येते की रडूच कोसळते. ते आवरता आवरत नाही. हुंदकेच येऊ लागतात आणि हातापायांतील शक्तीच गेल्यासारखी होऊन धड उभेही राहवत नाही अशी स्थिती होते. इतर आजूबाजूला लोकांनाही काही कळतच नाही की ह्यांना एकदम असे रडायला काय

झाले? पू. स्वामीजींना या गोष्टीची सवय झाली आहे. त्यांनी स्वयंसेवकांना मला त्यांच्या खोलीत नेवून बसविण्यास सांगितले. त्याप्रमाणे त्यांनी आम्हा तिघांना त्यांच्या खोलीत नेवून बसवले व मला पाणी प्यावयास दिले.

थोड्यावेळाने पू. स्वामीजी खोलीत आले आणि माझ्या शेजारी खुर्चीवर येऊन बसले. मी उठून नमस्कार करण्याचा प्रयत्न केला पण त्यांना माझे हात धरून मला परत खुर्चीवर बसविले. त्यांना माझा वाढदिवस आहे हे माहित होते म्हणून माझे हात धरून त्यांनीच वाढदिवसासाठी म्हणावयाचे जे शुभचिंतनपर काव्य केले आहे, 'अयि प्रिय सखे.....' ते म्हटले. त्यावेळी मला काय वाटले हे कसे सांगणार? अशारितीने माझा वाढदिवस कधीच साजरा झाला नव्हता! शिवाय मला भेट म्हणून खूप प्रवचनाच्या, भजनाच्या कॅसेटस् दिल्या. तेव्हा म्हणाले की, 'मी कुठेही गेलो तर आधी तुमचे पत्र आले आहे का याची चौकशी करतो' कारण, ते एकदा म्हणाले होते की तुम्ही मला पत्र लिहिता आणि ते माझ्यापर्यंत पोहोचून तुम्हाला उत्तर लिहून ते तुमच्यापर्यंत पोहोचेपर्यंत तुम्हाला धीर नसतो! तुम्ही लगेच उत्तराची वाट पाहात राहता! आता हनुमंतालाच सांगायला हवे की तुमची पत्रे लवकर पोहोचती करा!

नंतर मी त्यांना जे गोड पदार्थ नेले होते ते भरवले. त्यांची दृष्ट काढली व मग काहीवेळ बोलून आम्ही जावयास निघालो. तेव्हा इतके जीवावर आले होते की, तेथून पाय निघेना! मी म्हटले, 'आता परत केव्हा दर्शन?' तेव्हा ते चटकन म्हणाले, 'आठ दिवसांनी, १५ तारखेला परत या. मी येथेच असेन!' मी म्हटले, 'खरेच?' तेव्हा त्यांनी म्हटले 'हो!' तेव्हा इतका आनंद झाला! दिनांक १५ जानेवारील त्यावर्षी संक्रांत येत होती त्यामुळे संक्रातीला त्यांचे दर्शन होणार म्हणून मला खूप आनंद झाला होता. कारण जरी मी दरवर्षी त्यांना पोस्टाने तिळगूळ धाडीत असे तरी समर्थांनी म्हटल्याप्रमाणे 'मानसपूजा प्रत्यक्ष दर्शन । महदंतर ।।' हेच खरे आहे. त्यावेळी आमच्याबरोबर डॉ. सौ. उषाताई गुणे आणि मंगलाताई ओक याही आल्या होत्या. पू. स्वामींनी सांगितलेल्या वेळेवर आम्ही सर्व सौ. रेखाच्या गाडीने टोप-संभापूर येथे पोहोचलो. दिनांक ८ जानेवारीला झाला तसा गोंधळ होऊ नये म्हणून मी गाडीतच बसून राहिले होते. चि.

सुहास, सौ. रेखा वगैरे सर्व जिना चढून वर गेली होती. पू. स्वामीजी अभ्यासवर्ग घेत होते. मी. सौ. रेखाला सांगितले होते की, क्लास झाल्यावर पू. स्वामीजी त्यांच्या खोलीत गेले की मग येऊन मला वर घेऊन जा.' पण झाले असे की, क्लास संपल्यावर पू. स्वामीजी त्यांच्या खोलीकडे न जाता सरळ पायऱ्या उतरून खाली आले आणि गाडीत मी पुढे बसले होते तेथे येऊन दार उघडून मला म्हणाले, 'हं चला!' आणि माझा हात धरून मला गाडीतून उतरविले आणि एकदम त्यांना काय वाटले कुणास ठाऊक, मला म्हणाले, 'जरा थांबा!' आणि तेथे जे वीर युवा उभे होते त्यांना सांगितले, 'अरे खुर्ची आणा, आणि कमलाताईंना खुर्चीतून उचलून नेऊन वर माझ्या खोलीत घेऊन जा!' हे ऐकून ते लगेच खुर्ची आणण्यास धावत गेले. मी पू. स्वामीजींना म्हटले, 'स्वामीजी! मी हळूहळू वर चढून येईन!' तेव्हा त्यांनी तोंडावर बोट ठेवून खूण करून मला त्या युवकानी आणलेल्या खुर्चीवर बसावयास सांगितले! आता यावर काय बोलणार? मला हात देऊन त्यांनी खुर्चीवर बसावयास लावले आणि त्या तरूणांनी बघता बघता ती खुर्ची उचलून पायऱ्या चढून मला पू. स्वामीजींच्या खोलीत नेऊन तेथील खुर्चीवर बसवले! मला इतके लाजल्यासारखे झाले की सांगता येत नाही! एवढ्यात पू. स्वामीजीही खोलीत आले आणि त्यांच्या खुर्चीवर बसले. मंगलाताई आलेली पाहून तसेच सौ. उषाताईंनाही पाहून त्यांना खूप आनंद झाला. नंतर मी त्यांना तिळगूळ भरवला तो त्यांनी खाल्ला व इतरांनी दिलेलाही खाल्ला. नंतर बऱ्याच गप्पा गोष्टी झाल्या. त्यात जो रस होता तो ब्रह्मानंदालाही मागे सारणारा होता. गोस्वामींनी जे म्हटले आहे (काकभुंशुडीच्या मुखाने) की, 'संत मिलन सम सुख जग नाही ।।' (७/१२१/१३) त्याची प्रचीति आली. आम्ही जेव्हा जावयास उठलो तेव्हा मी नमस्कार करू लागताच त्यांनी आशीर्वाद दिला की, 'करउँ बहुत रघुनायक छोहू' (५/१७/३) आणि रामप्रेम इतके उचंबळून आले की मला रडू आवरेना! हे लिहितांनाही तीच दशा होत आहे! हे रामभैय्यांचे स्मरण करून लिहित आहे! पू. स्वामीजींचे आशीर्वाद प्रिय जानकी भाभीप्रमाणेच अमोघ असतात असा माझा अनुभव इतक्या वर्षांचा आहे. वरील आशीर्वादामुळे रामप्रेम प्रतिक्षणी वर्धमान होत आहे! यापेक्षा अधिक कृपा ती काय

असणार आहे? वरील मजकूर लिहिल्यावर आवेग ओसरल्यावरच हा मजकूर लिहिला जात असे. त्यांनी आशीर्वाद देताच अशी अवस्था झाली की पू. स्वामीजींना इतरांना सांगावे लागले की, 'यांना नीट सांभाळून न्या!'

प. पू. स्वामीजींच्या इतक्या ह्रदयस्पर्शी आठवणी माझ्याजवळ आहेत की त्या सर्व लिहावयाच्या म्हटल्यावर तो एक वेगळाच ग्रंथ होईल. ते अमेरिकेत असताना त्यांना पॅरालिसिसचा झटका गुरुपौर्णिमेलाच आला होता. त्या दिवशी त्यांनी कुणाचेही फोन घेतले नव्हते असे मला नंतर कळले. पण आश्चर्याची गोष्ट म्हणजे भारतात दुसरे दिवशी पहाटे त्यांचा स्वतःहून मला फोन आला होता. ती तेथे गुरूपौर्णिमेच्या दिवशीची रात्र होती. मी नेहमीप्रमाणे प्रणाम केला. त्यांनी शुभेच्छा दिल्यावर मला जाणवले की त्यांची तब्येत ठीक नसावी. मी विचारले, 'स्वामीजी! आपली तब्येत कशी आहे?' ते म्हणाले, 'ठीक नाही!' मी म्हटले की, 'ताप वगैरे आला आहे कां?' तेव्हा ते म्हणाले, 'नाही! मला भयंकर थकवा आला आहे!' मी म्हटले, 'तब्येत सांभाळा' मग हरिः ॐ म्हणून त्यांनी फोन ठेवला. नंतर मला माझी मैत्रीण विजया धोपेश्वरकर टोप-संभापूर येथे शिबिरासाठी गेलेली होती तिचा फोन आला की, 'तुम्हाला माहित आहे कां की, पूज्य स्वामी तेजोमयानंदजींना अमेरिकेत स्ट्रोक आला असून येथे त्यांच्या स्वास्थ्यासाठी सामुदायिक महामृत्युंजय मंत्राचा जप केला जात आहे ' हे ऐकून मी थक्क झाले! कारण पू. स्वामीजींनी मला फोनवर फक्त 'मला भयंकर थकवा आला आहे' एवढेच सांगितले होते! मला काळजी वाटेल म्हणून त्यांनी तसे केले असावे! आता या प्रेमाला कशाची उपमा द्यावी?

नंतरही त्यांच्या निरनिराळ्या दुखण्यातही त्यांनी माझ्या भावनाविषयी इतकी संवेदनशीलता दाखवली आहे की ती शब्दात वर्णन करता येणार नाही. एकदा मी चिन्मय विभूतीवर त्यांच्या ज्ञानयज्ञासाठी गेले असतां त्यांनी मला एक ग्रंथ भेट दिला. मी तो पहावा म्हणून पर्स उघडून चष्मा काढू लागले. पाहते तर चष्म्याचे घर पर्समध्ये होते पण त्यात चष्माच नव्हता. नंतर सर्वत्र शोधूनही तो सापडला नाहीच! मी त्यावेळी म्हटले होते की, 'अरे चष्मा कुठे गेला?' तेव्हा त्यांनी स्वतःचा चष्मा काढून माझ्या हाती दिला आणि म्हणाले, 'पहा, हा लागतो आहे कां?' मी लावून

पाहिल्यावर मला वाचता आले. मी म्हटले की, 'हो, मला वाचता येत आहे!' लगेच ते म्हणाले, 'मग तो घ्या तुम्हांला! ' आणि मला तो चष्माच देऊन टाकला! मी मिरजेस परत आल्यावर परत डोळे तपासून त्या नंबरचा चष्मा करवून घेतला! पण पू. स्वामीजींनी दिलेला चष्मा म्हणजे माझ्या मर्मबंधातील ठेव आहे, जी मी जपून ठेवली आहे! त्यांनी मला अद्वैत दृष्टीच प्रदान केली अशी माझी दृढ निष्ठा आहे! त्यांनी दिलेले काही आशीर्वाद येथे नमूद करीते.

*मसीतारामगुणग्रामपुण्यारण्ये विहार: आनंद मंगलप्रद अभवत् ।'*

प्रभुरामचंद्राचा कृपावर्षाव होत आहे. आनंदात राहा.

*'जो चाहे सो कर कृपा। तेरो तुलसी है।'* हा भाव असावा.

*'मश्रीराम: शं ते करिष्यति ।'*

प्रभुरामचंद्र तुमची मनोकामना शीघ्रतिशीघ्र पूर्ण करोत हीच प्रार्थना.

*मगुरूकृपा हि केवलम् ।' 'सकीर्त्यमान: शीघ्रमेवाभिर्भवति । अनुभावयति च भक्तान् ।'*

'आज श्रीगणेश चतुर्थी – त्या मंगलमूर्तीची कृपा तुमच्यावर सतत राहो.'

*'रामे चित्तलय: सदा भवतु ते ।'*

*'तुमचे मन सदैव रामरंगी रंगून राहो, जसे आता आहे.'*

दि.२९/५/२००० ला स्व-स्पर्शित पेन व श्रीराम परिवाराचा फोटो धाडला सौ. रेखाबरोबर. असे किती म्हणून सांगावे!

***

## श्री समर्थ संप्रदाय

'श्रीरामचरितमानस प्रेमी मंडळा' चे पहिले उपाध्यक्ष होते डॉ. रा. वा. चिटणीस; त्यांची व कै. श्री. ना. भा. जोशींची ओळख होती. डॉ. चिटणीस हे डोंबिवली मध्ये रहात होते व 'श्रीरामचरितमानस प्रेमी मंडळा' चे मुख्य कार्यालय श्री. श्रीरामजी गिल्डा यांच्या घरी होते. श्री. श्रीरामजी सर्व कार्य करीत होते पण त्यांच्या तत्वात पदाधिकारी होणे बसत नव्हते. म्हणून त्यांचा मुलगा श्री. विष्णु जो डोंबिवलीतच त्यांच्याजवळ रहात होता तो, श्री. आदिनाथ यादव (सचिव) यांबरोबरच सचिव म्हणून काम पहात होता.

मला अध्यक्षपद स्वीकारावे लागले कारण सद्गुरूंची इच्छा तशी होती. डॉ. रा. वा. चिटणीस हे समर्थ भक्त होते. त्यांनी समर्थांवरच प्रबंध लिहीला होता. तो प्रकाशित झालेला नव्हता. पण त्यांना देवाज्ञा झाल्यावर त्यांच्या पत्नी श्रीमती रजनीताई चिटणीस व चिरंजीव यांनी डॉ. अशोक कामत यांच्या मदतीने तो 'मना सज्जना' या शीर्षकाखाली प्रकाशित केला. डॉ. रा. वा. चिटणीस म्हणजे 'साधी रहाणी उच्च विचरसरणी' याचे मूर्तिमंत उदाहरण होते. आमच्या मंडळातर्फे 'गूढार्थ चंद्रिका' त्रैमासिक काढायचे ठरले तेव्हा ट्रस्ट नोंदवणे, त्रैमासिक सुरू करण्यासाठी आवश्यक त्या सर्व बाबींची पूर्ती डॉ. चिटणीसांनीच केली. मला तर त्यांचा वडिलांसारखा आधार वाटे. श्रीमती रजनीताई माझ्यावर खूप प्रेम करतात. त्या मला भेटण्यासाठी मिरजेस आमच्या घरीही येऊन गेल्या होत्या.तसेच मी पवईला चिन्मय मिशनच्या सांदीपनी साधनालयात गेले होते. तेव्हाही त्या भेटून गेल्या, श्री. श्रीरामजी गिल्डांचे व त्यांचे येणे जाणे सतत होते. माझ्याशीही टेलिफोनवरून सतत संपर्क असतो. त्यांच्यामुळे श्रीमती सुमतिताई निगुडकर यांच्याशीही परिचय झाला होता. तसेच श्री. मुतालिक, सौ. अलका मुतालिक यांना डॉ. श्रीकृष्ण देशमुख यांचा अनुग्रह असून ती सर्व मंडळीही समर्थ भक्त आहेत. सौ. अलका मुतालिक यांची टि व्ही. वर दासबोधावरील सुश्राव्य प्रवचने होतात. डोंबिवली येथील सुप्रसिद्ध श्रीगणेश मंदिराच्या त्या विश्वस्तही आहेत. ही सर्व मंडळी तसेच तेथील श्री. ध्रुवाजी कुलकर्णी वगैरेंनी आपले जीवन आध्यात्मास वाहिलेले आहे. त्यांना श्री. श्रीरामजी गिल्डांच्या बद्दल अत्यंत आदर होता. ही सर्व मंडळी एका वर्षी परंडा येथे श्रींच्या पुण्यतिथी उत्सवासाठीही आली होती व सौ. अलका ताईंचे सुंदर प्रवचन 'बालरूप रामचंद्र पूर्ण उगवला' यावर झाले होते, असे वाटते. श्रीरामचरितमानस प्रेमी मंडळास ह्या सर्वांचेच सहाय्य मिळत असते. धन्यवाद. प. पू. स्वामी प्रज्ञानंद सरस्वती हे पूर्वाश्रमीचे समर्थ संप्रदायी होते व स्वतःस 'ईश्वरदास रामदासी' म्हणवून घेत असत. त्या काळत जे काव्य झाले त्यात तसाच उल्लेख आहे. नंतर प. पू. बाबा गंगादा यांची गाठभेट झाल्यावर ते तुलसीदास आणि त्यांचे ग्रंथ, विशेषतः 'श्रीरामचरितमानसा' कडे वळले. तरी ते जेथे असत तेथे दासनवमीच्या वेळी 'दासबोधा' चे

पारायण सामुदायिक होत असे. तसेच करूणाष्टके, मनाचे श्लोक यांनाही महत्त्वाचे स्थान होते. पहिल्या प्रथम पदयात्रा त्यांनी केली तीही सज्जनगडाचीच केली होती. प. पू. श्रीधर स्वामींशी त्यांची मैत्री होती असे त्यांच्या पत्रांवरून दिसून येते. ते असताना समर्थ वंशज पू. आबासाहेब स्वामी त्यांच्या दर्शनासाठी इस्लामपूर येथे आमच्या घरी येऊन गेले होते. त्यांच्या सांगण्यावरूनच आम्ही 'उपासना मार्गप्रदीप' उपयोगात आणत असू. परंड्यात ते होते तेथेच पू. कल्याणस्वामींनी देह ठेवला होता व त्यांचे समाधिमंदिरही मंगळवार पेठेत आहे. श्रींनी ही मंगळवार पेठेत श्री. नानासाहेब देशमुख यांच्या वाड्यात प्रायोपवेशनाने देहत्याग केला व नंतर त्यांचा देह मिरवणुकीने श्रीहंसराज मठात आणण्यात येऊन तेथे समाधि देण्यात आली. श्रीहंसराज हेही समर्थ सांप्रदायिकच होते व पुढे ज्या पू. अनंतदासांची नामसमाधी तेथे बांधण्यात आली तेही समर्थ भक्तच होते. असा समर्थ संप्रदायाशी संबंध असल्यानेच की काय कुणास ठाऊक 'रामविश्रामधाम' मधील श्रीराम मंदिराचे कलशारोहण पू. मोहनबुवा रामदासी यांच्या हस्ते योगायोगाने घडून आले.

खूप वर्षे माझी गडावर जाण्याची इच्छा होती ती १९८६ मध्ये डॉ.



माधव गोगटे यांच्यामुळे पूर्ण झाली. १९८० मध्येही श्रीवेण्णाबाई मठाची मला फार ओढ होती. पण त्याच सुमारास डॉ. रमेशची मुंबईस बदली झाली त्यामुळे दर्शनही दुर्मिळ झाले होते. परत त्यांची मिरजेस बदली झाली. १९९३ मध्ये त्यानंतर परत वेण्णाबाई मठ व समर्थ सांप्रदायाशी संबंध येऊ लागला. श्री. दावि. कुलकर्णी यांची व माझीही २/३ प्रवचने वेण्णाबाई मठात झाली होती. त्यावेळी मठाची दुरावस्था पाहून वाईट वाटे. पण आता मठाचा जीर्णोद्धार होत आहे हे पाहून अतिशय आनंद वाटतो. पू. कौस्तुभ महाराजांनी 'पूर्णविराम' हे मासिकही सुरू केले आहे. एकंदर त्यांचा उत्साह पाहून खूप कौतुक वाटते. अशीच सेवा त्यांच्या हातून घडत राहो. याशिवाय श्री. शामराव साखरे यांचा सत्संगही अधून मधून लाभतो. ते औदुंबर येथील शाश्वतपूजानिधीचेही काम पहातात. एकूण त्यांनी आपले जीवन संपूर्ण भगवत्कार्यास वाहून घेतले आहे. त्यांचा दासबोध अभ्यासक्रमाशी संबंध असून ठिकठिकाणी भागवतावर दासबोधावर वगैरे प्रवचने ही सुरू असतात. तसेच लेखनही सुरू असते.

यानंतर श्री. जाखोटिया, माधवनगर यांच्यामुळे समर्थांची अधिक सेवा घडण्याचा सुयोग आला. परम श्रद्धेय स्वामी रामसुखदासजी महाराजांच्या कृपेने त्यांच्या ८/१० हिंदी ग्रंथांचे माझ्या हातून झालेले मराठी अनुवाद गीता प्रेसतर्फे प्रकाशित झाले होते. गीताप्रेस द्वारा प्रकाशित ३५/४० मराठी ग्रंथांचा थोडक्यात परिचय गीता प्रेसच्या व्यवस्थापकाच्या विनंतीवरून मी लिहून दिला होता. तो त्यांना त्यांच्या पुस्तक विक्रेत्यांना देण्यासाठी हवा होता. अशाप्रकारे व मुख्यतः श्रीसद्गुरू प्रज्ञानानंद सरस्वती स्वामींची बृहत् टीका 'मानस गूढार्थ चंद्रिका' गीता प्रेसतर्फे प्रकाशित झाली होती. त्यामुळे गीता प्रेसमध्ये माझा थोडा फार परिचय झाला होता. त्यामुळे श्रीसमर्थ रामदास स्वामींच्या श्री ग्रंथराज 'दासबोध' या ग्रंथाचे गद्य रूपांतर मी करावे अशी इच्छा श्री. विष्णूप्रसाद पटवारी यांच्याद्वारे गीताप्रेसतर्फे व्यक्त केली गेली त्यावेळी मला फार आनंद झाला की श्रीसद्गुरू कृपेनेच ही समर्थांची सेवा घडत आहे आणि म्हणून मी सम्मति दिली. तेव्हा गीताप्रेसतर्फे सांगण्यात आले की त्याला कुणा प्रसिद्ध व्यक्तिची प्रस्तावना मिळाली तर बरे होईल. म्हणून मी पू. स्वामी गोविंद देवजी गिरी उर्फ श्री

किशोरजी व्यास यांना विनंती केली आणि ती त्यांनी लगेच मान्यही केली. त्याप्रमाणे श्रीसद्गुरू कृपेने ते गद्य रूपांतराचे कार्य पूर्ण होऊन पू. स्वामी गोविंद देवजी गिरी यांच्या प्रस्तावनेसह गीता प्रेसतर्फे प्रकाशित झाले. त्यांच्या तीन आवृत्त्याही निघाल्या आहेत. यायोगे समर्थ सेवा घडून समर्थ कृपाही लाभली. त्यामुळे अनेक समर्थ भक्तांचीही ओळख झाली. त्यामुळे श्री. सुनिल चिंचाळकर घरी येऊन मुद्दाम भेटून गेले आणि त्यांनी 'श्री दासबोध प्रवेश' हा ग्रंथ भेट दिला. तर त्यापूर्वीच दीड दोन वर्षे आधी डॉ. कामत हेही पत्नीसह आमच्या घरचा पत्ता शोधून काढून मुदादम मला भेटून गेले होते व गुरूकुल प्रतिष्ठान तर्फे प्रकाशित झालेला 'दासबोध' मला भेट देऊन गेले होते. त्यांची माझी खूप जुनी ओळख आहे. त्यांच्या सूचनेवरूनच डॉ. सौ. अनिता केळकरने प. पू. स्वामी प्रज्ञानंद सरस्वती यांच्यावर प्रबंध लिहून त्यांच्या मार्गदर्शनाखाली पी. एच. डी. पदवी प्राप्त केली होती. मी पुण्याला त्यांच्या घरी व पुणे विद्यापीठातही त्यांना भेटण्यास गेले होते. याशिवाय 'रघुवीर समर्थ' ह्या मासिकात लेख लिहीण्यामुळे पूज्य भूषण स्वामींशी प्रत्यक्ष नाही परंतु फोनवरून परिचय झाला आहे. शिवाय डॉ. नरेंद्र कुंटे व निंबाळ संप्रदाय यातही 'दासबोधा'स महत्त्वाचे स्थान आहे.



याशिवाय घटना अशा घडत गेल्या की श्रीसद्गुरू कृपेने आणि रामभैय्याच्या कृपेने परत समर्थांच्या सेवेचा योग चालून आला. गीता प्रेस, गोरखपूरच्या विनंतीवरून मी श्रीवाल्मिकी रामायणाचे (संपूर्ण ग्रंथाचे) मराठीत भाषांतर केले होते. युद्धकांडापर्यंत लेखन झाल्यावर त्यांच्याकडून निरोप आला की सध्या वाल्मिकी रामायण छापण्याचा त्यांचा विचार नाही. पण मी संपूर्ण वाल्मिकी रामायणाचे भाषांतर पूर्ण केले होते. सुंदरकांडाच्या वह्या तर गोरखपूरला गेल्या होत्या. बाकीच्याही त्यांच्या स्वाधीन केल्या होत्या. एकीकडे हे सगळे चालू असता श्री. विश्वास रघुनाथ भिडे यांच्याशी परिचय झाला. ते हैद्राबादला बँकेत नोकरी करत होते. निवृत्त झाल्यापासून मराठीतील सर्व आध्यात्मिक वाङ्मय इंटरनेटवर टाकण्याच्या कामास स्वतःस वाहून घेतले आहे. मला वाटते शंभराच्या आसपास मराठी ग्रंथ त्यांनी इंटरनेटवर टाकले असतील. त्यांनी वाल्मिकी रामायणाचा मराठी अनुवाद इंटरनेटवर टाकण्याची इच्छा व्यक्त केली तेव्हा मला अतिशय आनंद झाला व मी गीता प्रेस गोरखपूर कडून माझ्या सर्व वह्या व सुंदरकांडाची सी. डी. मागवून घेतली व श्री. भिडे यांच्या सर्व स्वाधीन केल्या. त्यांनी श्री. सतीश प्रधान यांच्या मदतीने संपूर्ण वाल्मिकी रामायण इंटरनेटवर टाकले. आश्चर्य म्हणजे आमच्याकडून काही मानधन घेण्याऐवजी श्री. प्रधान यांनी श्री. भिडे व मी असे आम्हा दोघांनाच पाच-पाच हजार रूपये मानधन धाडून दिले ते मी परंड्यास श्रीसद्गुरूचरणी अर्पण केले. लोकांचा चांगला प्रतिसाद मिळाला.

पुढे गेल्यावर्षी म्हणजे २०११ मध्ये मला श्री. शरद कुबेर यांचा सातारहून फोन आला की, 'समर्थ वाग्देवता मंदिर' धुळे या संस्थेकडे श्रीसमर्थ रामदास स्वामींच्या हस्ताक्षरातील संपूर्ण वाल्मिकी रामायण आहे व ते स्कॅन करून शिवाय चालू टाईपात संस्कृत संहिता देऊन मराठी भाषांतर व इंग्रजीत त्याचा थोडक्यात सारांश (समरी Summary)अशा स्वरूपात प्रकाशित करण्याचा त्यांचा विचार आहे. तर मी वाल्मीकि रामायणाचा मराठीत अनुवाद केलेला आहे, तो त्यांना मिळु शकेल का? हे ऐकुन मला इतका आनंद झाला की सांगता येत नाही . नंतर त्याच्यावतीने प्रा. निलेश जोशी (वैशंपायन)मला येऊन भेटले व मी बालकाण्ड अर्थात

अधिकांड त्यांच्या स्वाधीन केले! रामभैय्याची कृपा दुसरे काय? हे कार्य खूप मोठे आहे व ते पूर्ण होण्यास ३/४ वर्ष तरी लागतील. शिवाय ३५/४० लाख तरी खर्च येईल. पण श्रीरामभैय्याच्या कृपेने कार्य उत्तम प्रकारे संपन्न होत आहे. २/४ महिन्यात 'आदिकांड 'प्रकाशित होईल असा अंदाज आहे. यानिमित्ताने श्री कुबेर व श्री. नीलेश जोशी यांचा सत्संग लाभला.

***

## चिन्मय मिशन

प.पू स्वामी तेजोमयानंदजी यांच्यामुळे चिन्मय मिशनशी संबध आला. ते पवई आश्रमात होते तेव्हा माझे जाणे येणे झाले तरी सौ. माधवी आनंद व श्री. ग.स. नाईक यांच्याखेरीज कुणाची ओळख झाली नव्हती. नंतर ते आमच्या घरी भिक्षेला आले त्यावेळी त्यांच्या पूज्य मातोश्रींची ओळख झाली होती. व त्यांच्यामुळेच श्री. लोधीयाजी, श्री. निर्मलाजी बदोरिया, श्री. आशाताई कामदार, श्री. जयरामभाई ,प. स्वामी चिदानंदजी अशा काहीची ओळख झाली व पुढे पू. स्वामी पुरूषोत्तमानंदजी व पूज्या स्वामिनी विमलानंदाजी यांची व पूज्य स्वामी गयानंदजी यांची थोडीफार ओळख झाली होती. पण इतर कोणाशी विशेष ओळख नव्हती. श्री . आदिनाथ यादव यांच्यामुळे ॲड. शरद देशपांडे व त्यांच्या पत्नीची ओळख झाली होती. ती दोघेही चिन्मय मिशनची सदस्य होती (माऊली बंगला ) असो. नंतर चि. मीराताई गोगटे व तिचे बंधु श्री. अण्णा आठवले ही दोघेही चिन्मय मिशनची मनापासून सेवा करित असल्यामुळे त्यांची ओळख झाली. नंतर पूज्य प्रयागजी चैतन्य व त्यांच्या मातोश्री निर्मलाताई यांची ओळख झाली. शिवाय पू. स्वामींच्यामुळे सै. नंदिनी नेने व पू.तत्वप्रियाजी वगैरेंची तसेच श्री. काळे (कोल्हापूर) वगैरेंची ओळख झाली होती. त्यांच्यापैकी सौ. नंदिनी नेने व तिचे पती श्री. रवी नेने यांच्याशी सतत संपर्क असतो. कोळवण येथील 'चिन्मय विभुती 'च्या निर्मितीत व आता व्यवस्थापनांत प्रिय रवी नेनेने खूप सेवा केली आहे. सौ.नंदिनी ची आजी श्री.लेले (बेळगांव) हिच्याशी माझा चांगला परिचय होता. त्यामुळे मला तिचे फार कौतुक वाटते.

याशिवाय पू. स्वामिनी मंगलानंदाजी, पू. स्वामिनी किर्तनानंदाजी, पू. स्वामिनी निश्चलानंदाजी, तसेच पू. स्वामी आत्मदेवानंदाजी यांच्याशी ही खूप परिचय असून सर्वच माझ्यावर अपार प्रेम करतात.

पू. स्वामी कीर्तनानंदजी यांनी पुणे येथील केंद्रात आमच्या गुरूभगिनींचे सामुदायिक मराठी तुलसी रामायणाचे पारायणही केले होते. तसेच पू. स्वामी गयानंदजी यांनी पवनार येथेही पारायणाचे आयोजन केले होते. पू. स्वामीनी मंगलानंदाजी परंड्यासही येऊन गेल्या आहेत. तसेच सौ. माधुरी राणे, सौ कल्याणी वगैरे अनेक कार्यकर्त्यांशी परिचय झाला असून आत्मीयता निर्माण झाली आहे . डोंबिवली येथे गुरूभगिनींचे सामुहिक मराठी मानसाचे पारायण झाले तेव्हा आदरणीय श्री. ध्रुवजी कुलकर्णी, सौ. अलका मुतालिक तसेच पू. वर्षाजी यांचे खूप सहाय्य झाले. मी प्रथम डोंबिवलीस गेले तेव्हा श्री. ध्रुवजी शीळ फाट्यापर्यंत मला नेण्यासाठी आले होते व नंतर डोंबिवलीहून पवईपर्यंत पू. वर्षाजी स्वत: आमच्या बरोबर आल्या होत्या. सौ. सविता चक्रवर्ती उर्फ सौ. माधवी आनंदचा परिचय तर २०/२२ वर्षे असून तिने मंगलाताईचे कीर्तनही मुलुंड येथे आयोजित केले होते. तिच्या सतत संपर्कात मी असते. तसेच श्री. शालिनीताई मराठे यांचा १० वर्षापूर्वी पवईला परिचय झाला. त्यांनी संकलन केलेला 'हृष्यामि च पुनः पुनः' हा ग्रंथ वाचून मी भारावून गेले. त्यांनी चिन्मय मिशनची खूप सेवा केली आहे. पू. गुरूदेवांबरोबर त्या काही वेळा परदेशांतही ज्ञानयज्ञासाठी जात असत व पूज्य स्वामी तेजोमयानंद , पू. पुरूषोत्तमानंद ,पू. सुबोधानंद इत्यादि अनेकांबद्दल त्यांना आत्मीयता वाटते. माझे व त्यांचे खूप छान जमते. त्या माझ्यापेक्षा वयाने मोठ्या आहेत. वयोवृद्ध असून त्या माझ्यावर फार प्रेम करतात. त्यांच्या रूपाने मला एका मोठ्या बहिणीचा लाभ झाला आहे.

इंदूरच्या काईतवाडें कुटुंबापैकी श्री. ग.स काईतवाडे व सौ . आशवाहिनी व श्री.अ .स. उर्फ नाना व सौ. रजनीवहिनीही माझ्यावर खूप खूप प्रेम करतात.

***

**प.पू. स्वरूपानंद स्वामी पावस व संबंधित लोक**

माझी भाचे सून कै. मीराताई गोगटे हिची बहीण पावसच्या देसाई कुटुंबीतील श्री.वसंतराव यांना दिलेली आहे. त्याचे वडिल कै. श्री. भाऊराव आठवले यांच्यामुळे त्यांच्यावर भगवद्‌भक्तीचे संस्कार बालपणापासूनच होते.त्यांत श्री. देसाई यांच्या घरीच पूज्य स्वरूपानंदांचा निवास असल्याने त्यांची कृपा सर्वांना लाभली होती. चि. मीराला त्यांचा अनुग्रह व कृपा कशी लाभली होती हे मागे लिहले गेले आहे . माझा प्रबंध प्रकाशित झाला तेव्हा प. पू. स्वामी तेजोमयानंदचा ज्ञानयज्ञ पावसला चालू होता. त्यांना तो अर्पण करावा म्हणून मी पावसला जाण्याचे ठरविले. कारण पू. स्वामी जगभर हिंडत असतात आणि त्यावर्षी महाराष्ट्रात प्रत्यक्ष त्यांचे दर्शन घडण्याची शक्यता नव्हती. म्हणून श्री. माधव पर्वतेला बरोबर येण्याची विनंती केली आणि त्याच्याबरोबर सकाळी ७ च्या रत्नागिरी बसने आम्ही मिरजेहून निघालो. रत्नागिरीला गाडी बदलून पावसला पोहोचलो. तोपर्यंत दुपारचे २।।/२।।। वाजले होते. मला वाटते दुपारची कथा सुरू व्हायची वेळ झाली होती. आम्ही बाहेर नळावर पाय धुवून मंडपाच्या द्वाराशी आलो तेवढ्यात प.पू. स्वामी मांडवाकडे येताना दिसले म्हणून तेथेच उभे राहिलो, आणि ते जवळ येताच त्यांना प्रणाम केला. ते तेथेच दाराजवळच्या खुर्चीवर बसले आणि आमची चौकशी करू लागले. 'केव्हा निघालात? जेवण व्हायचे असेल ना?''वगैरे तेवढ्यात चि. मीराताई तेथे आली आणि तिने मला नमस्कार केला आणि ती पू. स्वामींना म्हणाली ,'स्वामीजी या माझ्या सासुबाई आहेत।''हे ऐकुन ते म्हणाले असे आहे होय? मग त्यांच्या जेवणाचे खाण्याचे पहा आतां!असे म्हणुन ते उठले आणि मंडपात गेले . आम्ही मीराबरोबर आत गेलो. आणि हातपाय धुवून चहा वगैरे घेऊन कथा ऐकायला बसलो. तेथेच मला कोल्हापुरच्या डॉ.भद्रे यांची पत्नी नंदिनी भद्रे भेटल्या. आमची खूप वर्षाची ओळख होती. म्हणून त्यांनी मला रात्री त्यांच्या खोलीतच झोपायला यावयास सांगितले. कथा संपल्यावर मी पू.स्वामी स्वरुपानंदांच्या समाधिच्या दर्शनास मीराताई बरोबर गेले. तेथे खाली ध्यानाला बसण्यासाठी स्वतंत्र सोय केली आहे. पण मला तेथे समाधि जवळच ध्यानाला बसायला मिळाले. संध्याकाळी ७ वाजता तेथे

आरती होते. मी तेथे गेले तेव्हा ६ वाजले होते. मी आसनावर बसले आणि मीराताई तेथून निघून गेली. तेथे त्यावेळी पुजारीपैकी जे कोणी होते त्यांना मी म्हटले की मी येथे ध्यानाला बसते आहे. मी स्वतःहून उठले नाही तर आरतीची वेळ होण्यापुर्वी तुम्ही माझ्या कानाशी 'ताई , उठताना आरतीची वेळ होत आली आहे.'' असे म्हणत रहा म्हणजे मी उठू शकेन '' असे म्हणून मी नेहमी प्रमाणे श्रीसद्गुरूंना वंदन करून ध्यानास बसले. मात्र लगेच माझे चित्त इतके अंतर्मुख झाले की आपण कोठे आहोत, बाहेर काय चालले आहे याचे भान राहीले नाही. आणि आश्चर्य म्हणजे 'सोऽहं' चे अनुसंधान आपोआप होऊ लागले. यात किती वेळ गेला ते कळलेही नाही. मग पुजाऱ्यांचा आवाज कानावर पडू लागला, ताई उठता ना? आरतीची वेळ होत आली, असे ते सारखे म्हणत होते. तेव्हा हळूहळू चित्त बहिर्मुख होऊ लागले व काही वेळाने मी हळूहळू डोळे उघडू शकले. नंतर माझ्या लक्षात आले की माझ्या डोळ्यातुन अश्रु वाहिल्यामुळे माझा पदर थोडाफार भिजला होता. पण हे आधी मला कळलेच नव्हते. हळूहळू आसन सोडून मी कशीतरी उभी राहीले तोपर्यंत आरतीसाठी हळूहळू लोक तेथे येऊ लागले होते. माझे अंग आतुन थरथरत होते. कारण मुद्दाम उठावे लागले होते. त्यांत पू.स्वामीजीही तेवढ्यात तेथे आले होते. मीराताईने मुद्दाम कौतुकाने आरतीचे ताट माझ्या हाती दिले होते. पण हात थरथरू लागल्याने ते धरणे मला अवघड होऊ लागले. असो पण अशा रीतीने आनंदानुभव देऊन पूज्यस्वामी स्वरूपानंदांनी कृपा केली होती त्यामुळे अंतःकरण भरून आले होते. नंतर रात्री भिक्षेसाठी पू. स्वामीजी जेव्हा परत मंडपात आले तेव्हा त्यांना तिलक लावून मी ऋषिकेशहून त्यांच्यासाठी आणलेली शाल व श्रीफळ त्यांना देऊन माझ्या प्रबंधाची प्रत त्यांना अर्पण केली. आणि तेथील कार्यक्रम संपेपर्यंत त्यांच्या पायाशी बसून राहिले. रात्री मी नंदिनीताई भद्रे यांच्या खोलीत 'माऊली'इमारतीत तळमजल्यावर झोपले. दुसऱ्यादिवशी पहाटे उठून नित्यक्रम आवरून आम्ही समाधी मंदिरात आलो. (चि माधव व मी) आणि चहा घेऊन व प. पू. स्वामीजींचे दर्शन घेऊन एस. टी. स्टँडकडे निघालो. पण तेथून पाय निघेना. डोळ्यातून अश्रुधारा वाहु लागल्या. त्यानंतर एकदा आम्ही घरांतील सर्व रत्नागिरी,

सोमेश्वर येथे देवदर्शनास गेलो होतो. रामचरितमानस –उत्तर कांडावर झाला होता, तेव्हा सौ. रेखा व चि. निखिल पटवर्धनबरोबर मी पावसला दर्शनास गेले होते. तेव्हा श्रवण घडले नाही. पण दोन वेळा दर्शन आणि सत्संग मात्र लाभला. त्यावेळी जाण्या येण्याचे श्रम सार्थकी लागले. पू. स्वामींनी मंडळासाठी देणगी दिली व मला दोन पुस्तकही भेट दिली. खरेच सत्संगात जे सुख मिळते त्याची कशाशीही तुलना होऊ शकत नाही . गंमत म्हणजे चि. निखिलने नेले म्हणून दर्शनाचे भाग्य लाभले. पण मी त्याचे आभार मानण्याऐवजी पू. स्वामीजींना जेव्हा हे कळले तेव्हा तेच त्याला Thank You Very Much म्हणाले! असे हे निर्हेतुक प्रेम आहे त्याचे!

पावसच्या स्वामी स्वरूपानंदांच्या शिष्य वर्गापैकी काहींचा जास्त परिचय झाला आहे. त्या सर्वांचा सहवास हा सत्संगच असतो. त्यापैकी एक आहे श्री. प्रताप वामन मंत्री, मालवण. त्याला प्रत्यक्ष पू. स्वामींच्याकडून अनुग्रह मिळालेला आहे व 'सोऽ हं' साधना कशी करावी याचे प्रात्यक्षिक त्यांना प्रत्यक्ष पू. स्वामींच्याकडून प्राप्त झाले आहे ही फार भाग्याची गोष्ट आहे. त्यांने पू. प्रज्ञानानंद सरस्वती स्वामींचे चरित्र वाचले आणि नंतर मुद्दाम आमच्या घरी येऊन माझी ओळख करून घेतली. माझ्यामुळे त्यांना त्यांच्या जीवनांत खूप चांगला बदल होत आहे अशी त्यांची भावना झाली आहे .त्यामुळे त्यांच्या ठिकाणी माझ्याबद्दल आत्मीयता उत्पन्न झाली आहे.त्यामुळे त्याच्याशी गेल्या पाच, सात वर्षात खुपच जवळीक निर्माण झाली आहे. तो परंडा येथील उत्सवासही येऊन गेला व मंडळासही त्यांचे आर्थिक सहाय्यही मिळत असते. पण यापेक्षा त्याचे जे प्रेम मला लाभत आहे ते अनमोल आहे.

सौ.मनिषा अभ्यंकर हिचा परिचय सौ. रेखा पटवर्धनमुळे झाला. तिला एम.ए. संस्कृत परिक्षेच्या वेळी सुवर्णपद प्राप्त झाले होते. श्री. हेर्लेकरशास्त्रींचा श्री भगवद् सप्ताह आदर्श मंगल कार्यालय, मिरज येथे झाला. त्यावेळी सौ.मनिषाचा परिचय झाला. ती संस्कृतचे क्लासेस (अभ्यास वर्ग) घेते त्यामुळे तिचे संस्कृत ज्ञान अद्ययावत असून तिचे व्याकरण उत्तम असून ती संस्कृत मध्ये काव्यही करते. अत्यंत हुषार, अभ्यासू, सरल स्वभावाची असून प. पू. स्वरूपानंदांनी तिच्या स्वप्नात येऊन तिच्यावर कृपा केली

आहे. ती काव्यही सुंदर करते. ग्रंथाचा व्यासंग असून लेखन शैलीतून तो प्रगट होत असतो. अनेक विषयांवर अभ्यासपूर्ण लेख लिहून ती मला आणून दाखवते तेव्हा तिची अध्यात्मिक उंचीही जाणवते व मला आनंद होतो.

योगायोग असा आला की रामभैय्याच्या आणि श्री सद्गुरूंच्या कृपेने माझी नात चि. सौ. आरती हीचा विवाह पू.श्री बाबा देसाई ज्यांनी पू. स्वामी स्वरूपानंदाच्या आजारपणात त्याची सेवा केली होती व ज्यांचे परस्परांवर अत्यंत प्रेम होते. त्यांचे सुपुत्र श्री. श्रीकृष्ण देसाई यांचा सुपूत्र डॉ. चि. समीर देसाई यांचेशी झाला असून भाग्यवान् भगवत् कृपा पात्र श्री. देसाई कुटूंबाशी नातेसंबध जुळून आला आहे. याचा मला फार अभिमान वाटतो. डॉ. चि. समीर व चि. सौ. आरती यांना सतत प.पू. स्वामी स्वरूपानंद व प.पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती यांचे स्मरण करावे असे मी सांगत असते.

पावसच्या पू. स्वामींचे शिष्य जे नरसोबाच्या वाडीस राहतात, त्यांचे पूर्वाश्रमीचे नाव श्री. सुधाकर कर्णिक होते. त्यांचा एक दिवस फोन आला की त्यांना मला भेटायची इच्छा आहे व ते माझ्या घरी येत आहेत. अर्थात मला आनंद झाला की रामभैय्याच्या कृपेने मला घरबसल्या सत्संग मिळतो आहे! ते व त्यांच्याबरोबर सौ. माधुरी जोशीही आल्या होत्या. श्री. कर्णिक यांनी मला प. पू. स्वामी स्वरूपानंदांचे सुंदर छायाचित्र लॅमिनेशन केलेले दिले व त्यांनी लिहीलेली ज्ञानेश्वरी व दोन ग्रंथही भेट दिले. त्यावेळी पू. स्वरूपानंदच आपणहून माझ्या घरी आले असे वाटून मला आनंद झाला. त्यानंतर श्री. कर्णिक यांनी संन्यास घेतला असून त्यांचे नाव श्रीगोकुलेंद्र सरस्वती झाले आहे असे कळले. श्री. प्रताप मंत्री त्यांच्या दर्शनास नेहमी जात असतो. सौ.रेखा व चि.सुहास पटवर्धन त्यांचे दर्शन घेऊन आली. त्यांनी पू. स्वामी स्वरूपानंदाचे चरित्रही काव्यबद्ध केले असून ते फार सुंदर झाले आहे.

याशिवाय पावसचे पुजारी श्री. ओळकर हेही काही निमित्ताने सांगलीत आले असता मला भेटून गेले. डॉ जोशी नेत्रतज्ञ हेही पू. स्वरूपानंदांचे अनुग्रहीत आहेत. तेही भेटून गेले आहेत. याप्रकारे अनेकांच्या माध्यमातुन पू. स्वामी स्वरूपानंदांची कृपा मला लाभत आहे.

***

## सौ. सुधावन्स व श्री. श्रीहरी उर्फ हरिभाऊ आफळे

सौ. सुधावन्संचे सासरे पू. स्वामी समर्थांचे एकनिष्ठ भक्त होते. त्यांना (कै.श्रीयुत गोपाळ मारूती आफळे) भाग्याचे मरण आले. (निधन ७९ व्या वर्षी दि. २३/५/१९७९रोजी) दादरच्या श्रीपू. स्वामी महाराजांच्या मठात स्वामींच्या फोटोंच्या गाभाऱ्यात त्यांच्या जेष्ठ मुलाच्या मांडीवर स्वामीकडे नमस्कार करित असता त्यानी शेवटचा श्वास सोडला त्यांना हृदयविकार होता व डॉ. घमांडे हृदयविकार तज्ञ हे त्यांच्यावर औषधोपचार करीत असत. त्यांना पडलेले पाहून इतर दर्शनार्थी भक्त धावत आले. सर्वांना वाटले ते बेशुद्ध आहेत म्हणून त्यांना जवळच असलेल्या डॉ. घमांडे यांच्या हॉस्पीटल मध्ये नेण्यात आले. पण डॉक्टरांनी त्यांना मयत म्हणून घोषित केले होते. मठात जाण्यापूर्वी त्यांनी त्यादिवशी सर्व नवे कपडे धारण केले होते. नातवंडांना जवळ घेऊन त्यांना गोंजारून मुके घेऊन ते बाहेर पडले होते. त्यांना स्वतःचे मरण जणु काय कळले होते आणि त्यांना इच्छा मरणच प्राप्त झाले होते. श्री. हरिभाऊंच्या कडून असे ही कळले की त्यांना तिलांजली देण्यास सर्व समुद्री किनारी जमले असता तेथे एक अपरिचित व्यक्ती येऊन तिनेही तिलांजली दिली आणि ती व्यक्ती हरिभाऊच्या पाठोपाठ समुद्रापर्यंत जाऊन एकाएकी अदृश्य झाली! भगवंताची लीला कुणास कधी कळली आहे का?

सौ. सुधावन्स व श्री. हरिभऊ दोघेही भागवत् भक्त आहेत. त्यांना भगवत्कृपेचा अनुभवही येत असतो. श्री. हरिभाऊ दोन मजल्याच्या उंचीवरून पडले होते व जबर जखमी झाले होते. तेव्हा त्यांचे प्राण कसे वाचले हे एक प्रभुच जाणतात! दोन्ही घराण्यात भगवत् भक्तीचे संस्कार असणे हे पूर्व पुण्याई शिवाय आणि भगवंताच्या कृपेशिवाय घडत नाही!

यावरून एक गोष्ट आठवली की माझे आतेदीर श्री. विनायक शंकर उर्फ बाबुराव वैद्य हे समर्थ भक्त होते. समर्थांच्या कृपेनेच त्यांना खूप उशिरा पुत्रलाभ झाला होता. समर्थ सेवा मंडळाच्या संस्थापक सदस्यांपैकी ते एक होते आणि विषेश म्हणजे सज्जनगडावर चढण्यासाठी पायऱ्या बांधण्यात याव्या म्हणून त्यांनी खूप परिश्रम घेतले होते तसेच समर्थांच्या पादुका घेऊन स्वतंत्र वाहनातून देशभरात दौरे काढले होते. त्यांची समर्थ चरणी

अनन्य निष्ठा प्रेम असल्याने सज्जनगडावर चढून गेल्यावर गडावरच हृदय विकाराचा झटका येऊन समर्थचरणी लीन झाले. समर्थ कृपा दुसरे काय!

***

## प.पू. स्वामी स्वरूपानंद, फुलगाव

पूर्वाश्रमीचे डॉ. वाळवेकर हे इस्लामपूर येथील रहिवासी होते. मिरज मेडिकल कॉलेजमधून त्यांनी M.B.B.S. पदवी मिळवली. सर्जरीत ते प्रथम आले होते. पण नंतर त्यांनी पवईला चिन्मय मिशनमध्ये वेदांताचा अभ्यासक्रम पूर्ण करून ते पू. दयानंदजींच्या बरोबर चिन्मय मिशनमधून बाहेर पडून वेदांत प्रचाराचे कार्य करू लागले. संन्यास दीक्षा झाल्यावर त्यांचे नाव पू. स्वामी स्वरूपानंद झाले. १९९० च्या सुमारास, मी पुण्यास गेले असता पू. स्वामीजींची 'मनिषा पंचकम्' वर प्रवचने गरवारे कॉलेजच्या सभागृहात होती. ती ऐकण्याचा योग सौ. विजयाताई मराठे यांच्यामुळे आला. प्रवचन संपल्यावर मी जवळ जाऊन भेटले व परिचय करून देताच चि. डॉ. रमेशची आई म्हणून त्यांनी मला तात्काळ ओळखे व ते जेथे उतरले होते तेथील पत्ता देऊन तेथे भेटायला या म्हणून सांगितले. त्याप्रमाणे मी माझी भाचेसून चि.मीराताई गोगटे बरोबर तेथे गेले. तेथे बऱ्याच गप्पा झाल्या. आम्ही तेथून निघालो तेव्हा त्या घरातील गृहिणीने मला विचारले की, तुमची पू. स्वामीजींची ओळख केव्हा पासून आहे? तुम्ही आल्याने त्यांना खूप आनंद झाला आहे. तेव्हा मी. पू. स्वामीजी माझ्या गावातील, माझ्या मुलाचे वर्गमित्र आहेत असे सांगितले.

त्यानंतर एकदा सांगलीला टिळक स्मारक मंदिरात त्यांची प्रवचने होती. पण प्रवचने संध्याकाळी असत आणि आम्ही मिरजेस राहात होतो. त्यामुळे एकच दिवस मी प्रवचन ऐकून त्यांना भेटले. त्यांच्या गीतेवरील मराठी प्रवचनांच्या पुस्तकांचा संचही मी त्यांचा पूर्वाश्रमीचा भाचा मला वाटते श्री. यार्दी यांच्या मार्फत विकत घेतला. नंतर एकदम त्यांची गाठभेट माधवनगर येथे श्रीराधाकृष्ण गीतामंदिरातील श्रीविग्रहांची प्राणप्रतिष्ठा झाली त्या दिवशी संध्याकाळी प्रवचनानंतर त्यांचे दर्शन घेतले तेव्हाच झाली. त्यावेळी त्यांनी चि. रमेश वगैरेंची आस्थेने चौकशी केली. डॉ. बबनराव

यादव बार्शी हे मिरज मेडिकल कॉलेजमध्ये त्यांचे सहाध्यायी व रूम पार्टनरही होते. त्यामुळे त्यांची व श्री. आदिनाथ यादव यांचीही ओळख होती. तसेच पू. स्वामीजींची व श्री. मंगलाताई यांची इचलकरंजीस प्रवचने, कीर्तने यांच्या निमित्ताने गाठ पडत असे म्हणून तिचाही चांगला परिचय होता. त्यांची ३ वर्षांपूर्वी डोंबिवलीस प्रवचने झाली तेव्हा श्री.श्रीराम गिल्डांशी परिचय झाला होता. तेव्हा माझी आठवण निघाली होती असे श्री. गिल्डांच्याकडून कळले होते म्हणून मी मुद्दाम फोनवरून पू. स्वामीजींशी बोलले होते. त्यांचे वक्तृत्व प्रभावशाली असून वेदान्तावरील प्रवचने अत्यंत सुदंर प्रभावशाली होतात. त्यांचे मला फार कौतुक वाटते.

## पू. श्री. अनंत बेलगांवकर महाराज

प्रिय कमलताई निलंगेकरमुळे यांचा परिचय. त्यांनी प.पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वतींचे ओवीबद्ध सुंदर चरित्र लिहिले आहे. ते श्रीमत् भागवत फार सुंदर सांगतात. त्यांचा सप्ताह परंड्यास श्रीराम मंदिरात व्हावा अशी पू. कमलताईंची इच्छा होती. तेव्हा ते म्हणाले की, 'कमाताई जर परंड्यास श्रवणास येणार असतील तर मी तेथे श्रीभागवतसप्ताहास येतो!' त्यामुळे मी त्यांच्या सप्ताहासाठी परंड्यास गेले. वयोमानामुळे जास्त दिवस कुठे रहाणे तब्बेतीला झेपत नाही. शिवाय अशा सप्ताहात भावावेश विशेषत: गोपीभाव वगैरेमुळे जी अवस्था होते ती परमानंददायक असली तर शरीरास झेपत नाही असे आता झाले आहे. त्यावेळी काहीच भान नसते व काही त्रासही होत नसतो. पण नंतर भयंकर थकवा येतो. त्यामुळे व शिवाय श्रोत्यांचेही लक्ष विचलीत होते असा अनुभव असल्याने मी जाण्याचेच टाळते. कारण एकदा त्या भारलेल्या वातावरणात प्रवेश केला की, शरीरावर, मनावर भगवंताचेच अधिराज्य असते. मी काहीच करू शकत नाही, कारण 'मी'चाच पत्ता नसतो.

यावरून एक आठवण झाली आहे, ती येथे सांगते. एकदा सांगली मार्केटयार्डा जवळील पेट्रोल पंपाच्या आतील बाजूस प.पू. रमेशभाई ओझा यांचा श्रीमत् भागवत सप्ताह होता. मला वाटते यजमानपद श्री. बियाणी यांच्याकडे होते. मी जरा लवकरच गेले होते. तेव्हा पू. रमेशभाई ओझा शेजारीच कुणा भाविकाकडे गेले होते. तेथे मी जाऊन त्यांचे अगदी

जवळून दर्शन घेऊन तेथेच त्यांची पाद्यपूजा वगैरे चालली होती, तेथे बसून राहिले. व नंतर मंडपात गेले. तेथे माझी श्री. काबरा (डोंबिवली) यांच्याशी गाठभेट झाली. आमची खूप ओळख असल्याने आम्ही बोलत बोलत व्यासपीठापलिकडे निघालो. तेथे स्त्रियांची व पुरुषांची बसण्याची व्यवस्था होती. तेथे मध्ये दोरी बांधलेली होती. मी स्त्रियांच्या विभागातून व ते पुरुषांच्या विभागातून असे त्या दोरीला लागून बोलत बोलत जवळ जवळ व्यासपीठाजवळ गेलो आणि तेवढ्यात पू. रमेशभाईंचे आगमन झाले आणि सर्व लोक अभिवादन करण्यास उभे राहून परत लगेच खाली बसले. मी पण जेथे उभी होते तेथेच खाली बसून गेले. कथेला रंग चढत गेला तशी मीही त्यात रंगून गेले. इतक्यात पू. रमेशभाईंनी 'कैसे आँऊ मैं कन्हैया तेरी दूरी नगरी' हे भक्तिगीत सुरू केले आणि माझे देहभानच हरपले म्हणाना! काय झाले हे मला कळलेच नाही.

कथा संपल्यावर मला तेथील बहुतेक स्वयंसेविका असाव्या जवळ येऊन म्हणाल्या, ''ताई, काही सांगितले तर रागावणार नाही ना?'' मी म्हटले, ''नाही! मुळीच रागावणार नाही!'' मग त्या म्हणाल्या की, 'तुम्ही श्रवणाला आलात जरा लांब अणि दूर न दिसेल अशा ठिकाणी जरा बसा. कारण तुमच्यामुळे श्रोत्यांचे लक्ष विचलीत होते, ते तुमच्याकडेच पहात राहातात.'' हे ऐकून मी ''बरे! ठीक आहे!'' असे म्हटले पण त्याच वेळी ठरविले की शक्य तो असे सार्वजनिक ठिकाणी जायचेच नाही! असो.

श्री. मुळे शास्त्री (आळंदी) यांचा श्रीमत् भागवत सप्ताह परंड्यास झाला होता. तेव्हा मी एक दिवसच श्रवणास गेले तरी गोंधळ व्हायचा तो झालाच!

## पू. श्री. जगन्नाथ कुंटे ('नर्मदे हर!' चे लेखक)

हे सांगलीला माझ्या मुलीकडेच श्री. अभ्यंकर, चार्टर्ड अकौंटंट एक दिवस मुक्कामास होते. त्यांच्याशी गप्पागोष्टी करतानाही अश्रू आवरले नाही. त्यांचे संध्याकाळी खाली अंगणात प्रवचनही झाले होते. तेव्हा त्यांच्या मुखातून त्यांचे नर्मदा-प्रदक्षिणेतील अनुभव ऐकायला मिळाले. भगवंतास शरण गेले की ते आपल्यातील अवगुण दोष यांच्याकडे जराही लक्ष न देता कशी कृपा करतात हे पाहून, ऐकून अंत:करण भरून येते!

***

## उपसंहार

याप्रमाणे जसे श्रीसद्गुरुकृपेने सुचले तसे लिहिले गेले आहे. यात अनेक जणांचा उल्लेख अनवधानाने राहूनही गेला असेल. उदाहरणार्थ (माझ्या वन्संचे यजमान) श्री.नारायण वामन गोगटे, वकील (कऱ्हाड) हे श्रीदत्तभक्त होते व औदुंबर येथे पूजाअर्चा व्यवस्थित व्हावी म्हणून त्यांनी ट्रस्ट स्थापन करून शाश्वत पूजेची व्यवस्था केली. त्या ट्रस्टवर प्रथम श्री सुमित्राराजे भोसले, पूज्य श्री. मामासाहेब देशपांडे, कवि सुधांशु वगैरे मातब्बर मंडळी होती, तो ट्रस्ट अद्यापही कार्यरत असून सध्या डॉ. माधव ना. गोगटे, डॉ. रमेश बा. वैद्य, श्री. शामराव साखरे वगैरे काही मंडळी काम पहात आहेत. तसेच कोल्हापूरातील श्री. वि. गो. देसाई, कै. डॉ. द्रवीड, श्री. माधवदासजी गोएंका, श्री मूळजीभाई, श्री. दीपक भागवत, पू. प्रज्ञानंद स्वामी वगैरे व वडूज येथील वै. श्री. यशवंत इनामदार वगैरेंचा सत्संग लाभला आहे.

माझ्या नणंदा कै. श्री. मनोरमाबाई गोगटे, कै. श्री. कमलाबाई जोग, कै. श्री. पद्मावती वैद्य या सर्व भगवत् भक्त होत्या व त्यांनी व माझ्या सासूबाई कै. आऊताई (गंगाबाई) यांनी माझ्यावर अपार प्रेम केले. श्री. कमलाबाई जोग (कुसुमताई) यांना पू. प्रज्ञानानंद सरस्वती स्वामींचा अनुग्रह होता आणि परमार्थात त्यांची खूपच प्रगती झाली होती. त्यांचा मुलगा श्री. आनंदा जोग दत्तभक्त असूनही 'मानसप्रेमी' आहे व टप्प्याटप्प्याने पायी नर्मदा प्रदक्षिणा करीत असतो.

परंडा येथे श्रींचे दीर्घकाळ वास्तव्य झाल्याने व तेथेच समाधि मंदिर असल्याने तेथील अनेकांशी संबंध येत असे विशेषतः वै. श्री. लक्ष्मणराव मुगांवकर काका व वै. श्री. गोपीनाथ काका माढेकर, त्यांच्या पत्नी, तसेच वै. श्री. श्रीराम माढेकर व श्री. गरड वकील व सौ. विमलताई शहापूरकर (उस्मानाबाद) तसेच वै. पंडित देशमुख, वै. श्री. दीक्षितताई (परंडा) व कै. पांडुरंग वडगांवकर वगैरे अनेकांचा सत्संग लाभला. श्री. वडगांवकरांची कन्या सौ. राणी ऊर्फ सरोज देशपांडे व तिचे पती व कन्या भाग्यश्री कित्येक वर्षे श्रींच्या पुण्यतिथी उत्सवात येऊन भजनसेवा करीत असत.

याखेरीजही ज्यांचा उल्लेख राहून गेला असेल त्यांनी उदार अंत:करणाने क्षमा करावी.

तसेच हे लेखन सुरू झाल्याचे कळताच श्री. प्रताप मंत्री (मालवण) व डॉ. सौ. उषाताई गुणे (तळेगांव) यांनी न मागताच आर्थिक सहाय्य देऊ केले तसेच डॉ. कल्याण काळे, श्री. भा. वा. सातवळेकर, श्री. विश्वास भिडे, सौ. भक्ती करंदीकर, सौ. रेखा पटवर्धन, श्री. उदय जोशी व त्यांचे सहकारी श्री. बेडेकर व श्री. अजित ठोंबरे इत्यादी अनेकांनी नानाप्रकारे साह्य केले आहे. त्या सर्वांचे आभार मानावे तेवढे थोडेच आहेत. शेवटी श्रीसद्गुरू आणि प्रिय रामभैय्याच या सर्वांच्या रूपाने साह्य करीत आहे मी केवळ त्यांच्या हातांतील कळसूत्री बाहुली आहे याची पूर्ण जाणीव आहे. मुलगा, सून व सासर माहेरच्या परिवारांतील लोकांचे आभार मानले तर त्यांना ते आवडणार नाही. पण श्रीसद्गुरू आणि प्रिय रामभैय्या कृपेने ही सर्व मंडळी प्रेमाचा वर्षाव करीतच असतात हे नमूद केल्याशिवाय राहावत नाही हे मात्र खरे.

शेवटी वाचक रूपाने भगवंतानी ही सेवा गोड मानून घ्यावी व प.पू. स्वामी गोविंददेवजी गिरिंच्या प्रमाणे कृपावर्षाव करावा व न्यून ते पूर्ण करून घ्यावे. त्यांच्या कृपेने चोखामेळ्यापर्यंत अगदी अस्थिपर्यंत रामनाम मुरून प्रतिक्षण वर्धमान रामप्रेम लाभून सर्वाभूती भगवद्भाव दृढ व्हावा हीच चरणकमली कळवळून प्रार्थना!

श्रीसद्गुरू चरणरज,

**कमाताई (श्री. कमलताई)**

हरि: ॐ तत्सत् :

***

# परिशिष्ट - १

## पूजनीय तेजोमयानंदांची पत्रे व मार्गदर्शनपर वचने

CHINMAYA MISSION WEST

SANDEEPANY ~~SADHANALAYA~~
1050 PARK AVENUE
SAN JOSE, CALIFORNIA
95126



Swami Tejomayananda

ॐ

१३.८.९०

प्रिय कमलताईस,

सप्रेम नमस्कार. हरि ओम् !

आपले पत्र आजच मिळाले. वाचून दुःख वाटले.

परन्तु - सुनहु भरत भावी प्रबल बिलखि कहेउ मुनिनाथ।
हानि लाभु जीवनु मरनु जसु अपजसु बिधि हाथ॥ हेच खरे.

प्रभु रामचन्द्र जीवास सद्गती व आपणा सर्वांस आध्यात्मिक शक्ती प्रदान करो हीच प्रार्थना.

✓ भगवन्ताच्या दर्शनाची आपली तळमळ मला समजते. मी देखील तसाच व्याकुळ आहे. पत्र वाचून डोळे अश्रूंनी भरून आले. भावापाशी हट्ट करता येतो पण स्वामींपाशी तो पण शक्य नाही. तथापि करुणाशील भगवान तुमच्यावर कृपेचा वर्षाव करतील यांत शंका नाही. मनाच्या अशाच एका स्थितीत मी श्रीरामाला म्हटले होते की :

येईल का कधी जीवनी तो क्षण
पाहीन मी राम धरीन चरण।
प्रेमें उठवूनि मला आलिंगन
देईल का राम चिंतित हे मन॥१॥

व्याकुळ हे मन स्थिति दयनीय
पाहीन कधी मी रूप कमनीय।
नीलवर्णकान्ती स्मित हास्य ओठीं
शरधनु हाती नाशी पाप कोटी॥२॥

अयोध्या सोडूनी जाऊनिया वनी
कृतार्थ हो केले शरभंग मुनी।
सुतीक्ष्ण अगस्ति आणि अत्रिऋषी
पावन ती केली मतंगाची दासी॥३॥

त्यांच्यापरी कांही साधन न केले
परी दर्शनासी मन आतुरले।
एकदा येऊनी दर्शन तू देई
माझे मनोरथ देवा पूर्ण करी॥४॥

॥ रामे चित्तलयः सदा भवतु मे भो राम मामुद्धर॥

॥ शुभास्ते पन्थानः सन्तु॥

घरीं सर्वांस सप्रेम नमस्कार.

आपला,
तेजोमयानंद



CHINMAYA MISSION
*Swami Tejomayananda*
*Chinmaya Mission San Jose*
*Sandeepany San Jose*
*1050 Park Avenue*
*San Jose, Ca 95126*

ॐ (२७.२.०३)

प्रिय कमलताईस,

सप्रेम नमस्कार. हरि ओम् !

तुमचे १७ फेब्रुवारीचे पत्र मिळाले. त्यापूर्वीच्या पत्रास पाठविलेले माझे उत्तर मिळाले असेल.

आता श्री. गिरिजाजींची तब्येत बरी असेल अशी आशा धरतो. हे सत्य आहे की देहाच्या वेदना मनाची शांती व समता विचलीत करतात पण त्यात आश्चर्य नाही. कारण असे की अनादि कालापासून प्रवृत्त झालेला देहाध्यासच तर खरा संसार आहे. अन्य रागद्वेष किंवा सुखदुःख त्याचेच परिणाम आहेत. त्या परिणामांमध्ये समता ठेवणे सापेक्षतः सोपे आहे पण मूळ कारणाची निवृत्ति तितकी सोपी नाही. तथापि त्याची इतकी काळजी करून त्यास अवास्तव महत्त्व पण देऊ नये. ज्याप्रमाणे तहान-भूक लागली असतां त्यांची निवृत्ति करून पुन्हा त्यावर आपण विचार करत बसत नाही त्याचप्रमाणे रोग असतां देहास औषध द्यावे, वेदना असह्य झाल्या तर थोडे रडावे, ओरडावे आणि पुन्हा नामस्मरण करावे. 'वेदनाच होऊ नये' हा पण एक दुराग्रहच आहे. 'त्या भासू नये' किंवा 'त्यांस शांति ढळू नये' असा हट्ट सोडून द्यावा. कारण असे की रडण्या, ओरडण्याने आत्मस्वरूपांत किंवा आत्मज्ञानांत अणुमात्र फरक पडत नाही. तेंव्हा न रडण्याची तरी प्रतिज्ञा किंवा इच्छा का करावी ! जर दुराग्रह सोडला तर शांति पण स्थिर होईल. दुसरे असे की भक्तास खरे दुःख व वेदना तेंव्हा वाटते जेंव्हा देवाचे विस्मरण होते. आणि जर रोगावस्थेत पण स्मरण होत असेल तर काळजीचे कारण काय ? "कह हनुमंत बिपति प्रभु सोई । जब तव सुमिरन भजन न होई ।"

एक अन्य सिद्धांत स्मरणांत ठेवावा. केवळ आत्माच परिपूर्ण आहे आणि तो आत्माच मी. अर्थात् स्वरूपतः मी नेहमी पूर्ण आहे, हे ज्ञान सतत जागृत ठेवावे. आणि जो मनाचा प्रश्न आहे त्याच्या शुद्धतेस किंवा पूर्णतेस सीमाच नाही. आत्मस्वरूप विसरून मनाशीच जास्त तादात्म्य करून त्यास अतिशुद्ध.

करण्याच्या मागे लागल्यास दिवसरात्र विक्षेपच होत राहील. तेव्हा आपल्या मनाच्या दोषांचे भान असू द्यावे पण चिन्तन मात्र देवाच्या गुणांचेच करावे म्हणजे मन आपोआप शुद्ध होत जाईल. उगाच आपल्या समस्या व संघर्ष वाढवू नये. मन अशुद्ध आहे ही एक समस्या आणि त्यावर चिंता करत बसणे ही दुसरी समस्या! गोस्वामीजींप्रमाणे देवासच सांगावे की माझे मन शुद्ध कर - "कामादिदोषरहितं कुरु मानसं च।"

उपर्युक्त विवेचनाने आपणास समाधान मिळाले असेल तर मलाही आनंदच वाटेल.

घरांत सर्वांस सप्रेम नमस्कार. चि. आरती व सचिनला अनेक आशीर्वाद.

आपला.
तेजोमयानंद



SWAMI TEJOMAYANANDA
CENTRAL CHINMAYA MISSION TRUST,
SANDEEPANY SADHANALAYA,
SAKI VIHAR ROAD, MUMBAI 400 072.

रुडकी

ॐ

२४ मार्च २००२.

प्रिय कमलताईस,

सप्रेम नमस्कार !

येथे तुमची दोन पत्रें ता. १४ व १७ मार्चची मिळाली. परांड्यास प्रभु श्रीरामचन्द्र सपरिवार पोहचले असल्याचे ऐकून व वाचून मला अतिशय आनंद झाला. तुम्हा सर्वांचे हार्दिक अभिनंदन ! तेथील सोहळा उत्तम होईल यांत शंका नाही.

चि. आरतीने तुम्हांस तुमची सर्वाधिक प्रिय भेट दिल्याचे वाचून तिचे फार कौतुक वाटले. आबालवृद्धांचे असेच प्रेम तुम्हांस सतत मिळत राहो. प्रभु 'कौतुकी कृपाला' आहेत. अनेक कौतुक दाखवून ते सगुण दर्शनाची कृपा पण करतील.

'बिनु बिराग जप जोग' चा अभिप्राय असा की श्रीरामांच्या पवित्र चरित्राच्या श्रवणाने व गायनानेच रामभक्ति मिळते. त्यासाठी जप आदींचा निराळा स्वपुरुषार्थ आश्रित प्रयत्नही करण्याची गरज नाही. याचा अर्थ असा नाही की आम्ही तसा प्रयत्न करू नये ! पण विश्वास भगवंतावरच ठेवला पाहिजे, असो. तुम्हांस हे सर्व माहित आहे.

सर्वांस सप्रेम नमस्कार. आता कांही दिवस विदेश-यात्रा.

सप्रेम.
तेजोमयानंद

(मागे पहावे)

CCMT PHONE : 91-22-857 2367, 857 8647 (DIRECT); FAX : 91-22-857 3065

ता.क. कळविण्यास फार आनंद वाटतो की काल मी येथून ऋषिकेशला परम पूज्य स्वामी रामसुखदासजी महाराजांना मुद्दाम भेटण्यास गेलो होतो. ते फार प्रेमाने भेटले व मला सर्वांसमक्ष प्रवचन करण्यास सांगून स्वतः ही त्याचे श्रवण केले. मी १५-20 मिनीटे बोललो. कृतकृत्यता वाटली! तेथे पूज्य डूंगरदासजींच्या भेटीने पण फार आनंद झाला. हे सर्व तुमच्यामुळे घडले म्हणून तुम्हास धन्यवाद. पूज्य स्वामीजींची सर्व पुस्तके त्यांनी आधीच दिलेली आहेत.

तेजोमयानंद



**CHINMAYA MISSION SAN JOSE**
1050 Park Avenue, San Jose 95126
Phone: 408-998-2793 279-5558

ॐ

१२.८.९२

प्रिय कमलताईस,

सप्रेम नमस्कार.

तुमचे २२ जुलैचे पत्र कांही दिवसांपूर्वी मिळाले. ह्यावेळी उत्तरास विलम्ब होण्याचे कारण म्हणजे सतत प्रवास व व्यस्त कार्यक्रम. कालच ती आईशी फोनवर बोलणे झाले. तिला तुमचे पत्र मिळाल्याने फार आनंद तिने व्यक्त केला. धन्यवाद.

दुसरे असे कीं 30 ऑक्टोबर ते ५ नोव्हेम्बर पर्यन्त माझा एक भागवत सप्ताह मुंबईला बिरला क्रीडा केन्द्र येथे निश्चित झाला आहे. त्यावेळी तुम्ही तेथेच असाल अशी आशा आहे. तेथे भेट होईल.

मी "विवेकचूडामणि" वर दर रविवारी येथे [इंग्रजीत] प्रवचन देत असतो. आत्तापर्यन्त २५० श्लोक पूर्ण झाले असून त्याच्या टेप्स् आहेत. जसे शक्य होईल तसे तुम्हांस कांही देईन. त्या ग्रन्थांत ५८० श्लोक आहेत. पूज्य गुरुदेवांची टीका त्यावर उपलब्ध आहे.

निर्भयता आणि अक्रोधाविषयीं तुमचा प्रश्न मार्मिक आहे. पूर्णत्वाकडे वाटचाल चालली आहे. इतक्या वर्षांच्या अध्ययन-अध्यापन-प्रचार-साधना आदिंच्या अभ्यासानन्तर समजू लागले कीं भय, क्रोध, काम आदि विकारांचे मूळ कारण व अनन्त निमित्तें कोणती आहेत आणि तेव्हा पासून योग्य उपचारास सुरुवात झाली. स्वतःच्या पूर्वीच्या जीवनाच्या तुलनेत झालेली प्रगती उत्साहवर्धक आहे यांत शंका नाही पण अजून पुढे जायचे आहे हे ही खरेंच आहे. माझा सगळा भरवसा रामावर. त्यांना इतकेच सांगत असतो कीं 'अब तक तो निभाया है, आगे भी निभा देना'। तसेंच "मोक्षमूलं गुरोः कृपा" हे पण तेवढेच सत्य आहे. अधिक काय लिहू? आपला

सर्वांस सप्रेम नमस्कार.

तेजोमयानंद

ॐ

केवळ वेदशास्त्रीने प्राणायामादि केल्यास जड समाधीच मिळते.

४. गृह त्यागणे शक्य नसल्यास

श्रीरामार्थं तत् प्रयुञ्जीत। हाच उत्तम उपाय।

५. रुद्रसूक्तातील पूर्ण मन्त्र असा :

ॐ नमस्ते ऽस्तु भगवन् विश्वेश्वराय महादेवाय
त्र्यम्बकाय त्रिपुरान्तकाय त्रिकालाग्निकालाय कालाग्निरुद्राय
नीलकण्ठाय मृत्युञ्जयाय सर्वेश्वराय सदाशिवाय
श्रीमन्महादेवाय नमः ॥

तुमचे पत्र मी माझ्या आईस पाठवीत आहे.
तिला फार आनंद होईल.

सर्वांस सप्रेम नमस्कार. चि. आरती व सचिनला
अनेक आशीर्वाद.

आपला,

तेजोमयानंद

ॐ

Camp: Washington D.C.
१२ जुलै '९१.

प्रिय कमलताईस,

सप्रेम नमस्कार !

आपले ३ जूनचे 'रसग्रहणात्मक' पत्र वाचून फार फार आनंद झाला. अनेक लोक प्रवचनें ऐकतात, प्रशंसा करतात, आवड दाखवितात पण त्याप्रमाणे तुम्ही 'रसग्रहण' केले तसे प्रगट करणारे क्वचितच भेटतात. मनःपूर्वक धन्यवाद. उत्तर पाठविण्यास उशीर होण्याचे कारण असे कीं पूज्य गुरुदेवांच्या कार्यक्रमातील व्यस्तता. त्यांच्या सान्निध्यांत दिवस आनंदात जात आहेत.

१. भागवतातील निर्गुण भक्ति म्हणजे गुणातीत भक्ति अर्थात् देवाशी प्रेमाचे नाते केवळ प्रेम म्हणून ठेवणें. त्यांत कामनेच्या स्पर्श नाही. येथे निर्गुण शब्दाचा अर्थ निर्गुण ब्रह्म नाही.

2. कॅसेट ८ची दूसरी बाजू मी टेप करून पाठवीन. त्यास थोडा वेळ लागण्याची शक्यता आहे. जमल्यास सौ. माधवी आनंद कडून करवून घ्यावी कारण त्याच प्रवचनांचे टेप्स, मी पाठविले होते.

3. जड समाधीचा अर्थ ज्ञानहीन समाधी किंवा मन स्थिर झाले पण वासनांचे बीज अव्यक्त राहिले तर ती पण जड समाधीच. कर्तव्य पालनाने मन शुद्ध होते म्हणून त्याची फार आवश्यकता आहे.




*Swami Tejomayananda*

Sandeepany San Jose
1050 Park Avenue
San Jose, CA 95126
(408) 279-5958

ॐ

२.१०.'९१

प्रिय कमलताईस,

सप्रेम नमस्कार. हरिः ओम् !

भारतास अचानक येणे झाले व तुम्हा सर्वांची भेट झाल्याने मला फार आनंद वाटला. गर्दीमुळे चि. आरती व सचिनशी काही बोलता पण आले नाही. पुढे केव्हा येणे होते ते पाहू. तुमची माझ्या आईशी भेट झाल्याने फार समाधान वाटले.

जीव भगवंताचा सनातन अंश. अविद्येमुळे तो देवास विसरून संसारात गुंततो. त्याचे दुःख देवास पाहावले जात नाही आणि म्हणून काहींना काही निमित्त उत्पन्न करून तो जीवास स्वतःकडे खेचत असतो. भगवंताची कृपा साधनसम्पन्न जीवावर असतेच पण कुसाधनसम्पन्न राक्षसी जीवांवर पण असते ही विशेष महत्त्वाची गोष्ट आहे. एक आणखी प्रकार म्हणजे निःसाधन जीव. ते दीन भक्त पण म्हणवले जातात. 'विनय पत्रिकेतील' गोस्वामीजींचे एक पद: 'हरि तुम बहुत अनुग्रह कीन्हो' अवश्य वाचावे. दीनते वर ते प्रकाश टाकणारे पद आहे, विशेष करून शेवटचे कडवे.

हिमाचल प्रदेशातील पहाडी लोकांकडून एक दोनदाच 'भोले बाबा को अनाडी मत समझो' हे भजन ऐकले होते. सर्व पद माहित नाही पण मिळाल्यास पाठवीन. भागवतावरील आठवे प्रवचन पण पाठवीन. आचार्य किशोरजींचे प्रवचन ऐकण्यास सुरवात केली आहे. येथे आल्यावर भरपूर विश्रांति घेतली! वेदान्त वर्ग पुन्हा सुरु झाले आहेत.

सर्वांस सप्रेम नमस्कार.

आपला,

तेजोमयानंद




CHINMAYA MISSION

Swami Tejomayananda

Sandeepany San Jose
1050 Park Avenue
San Jose, CA 95126
(408) 279-5958


ॐ

८.९.९१.

प्रिय कमलताईस,

सप्रेम नमस्कार. हरि: ओम् !

तुमची दोन्ही पत्रे मिळालीत. मध्यन्तरी शिकागो, पिट्सबर्ग व फिलॅडेल्फिया येथे कार्यक्रमांत व्यस्त राहिल्याने उत्तर पाठविण्यास उशीर होत आहे.

श्री. किशोरजी व्यास यांची भागवत कथा मालाड भागात निश्चित होत आहे ही आनंदाची बातमी आहे. सौ. माधवी आनंद मदत करतील. माझ्या विशेष परिचयाचे त्या भागात कोणी नाही. परन्तु भगवत्कृपेने कार्य निर्विघ्न होईल.

✓ तुम्हास रामायणावरील प्रवचने आवडलीत याचे समाधान वाटले. विशेषकरून विविध प्रसंगावरील तुमची मते महत्त्वाची वाटतात. ज्ञानसागर अथाह आहे यांत शंका नाही.

तुम्ही लक्ष्मणास श्रीरामाची शपथ घातली त्यांत गैर कांही नाही. भक्तिमार्गाची तीच तर विशेषता आणि मधुरता पण आहे ! नारदभक्तिसूत्रांत म्हटले आहे की -

" तदर्पित अखिल आचार: सन् कामक्रोधाभिमानादिकं तस्मिन्नेव करणीयम् ।"

काम क्रोधादिक देवांवर करावे असा याचा सरळ अर्थ ! आध्यात्मिक साधनेतील एक महत्त्वाची गोष्ट अशी की जी साधना आपल्या हातांत, शक्तीत आहे ती करत रहावी. फल ईश्वराधीन असल्याने चिंता करू नये. साधनेतच आनंद अनुभवावा. नाम आपल्या आधीन तर रूप ईश्वराधीन. म्हणून नाम जपत रहावे. गोस्वामीजी म्हणतात :

जो चाहे सो कर कृपा तेरो तुलसी है।

मी निर्मलाजींना पत्र पाठवीत आहे. तुम्ही त्यांचा पत्ता दिला ते चांगले केले.

माझे येथील कार्य उत्तम चालले आहे व तब्येत पण चांगली आहे.

सर्वांस सप्रेम नमस्कार.

तुमचा,

तेजोमयानंद

पत्रांची दिनांक- Piercy

दि. ११ मे१९९०

संतांच्या जीवनकार्याचे महत्त्व लोकांना समजावयास वेळ लागतो पण एकदा समजल्यानंतर त्यांची भक्ती दृढ होऊ लागते. हिंदीतून प्रवचन देण्याचा प्रयत्न जरूर करावा याद्वारेच आधिकाधिक लोकांना परमपूज्य स्वामीजींच्या जीवन कार्याचा परिचय घडेल. मला रामायणावर इंग्रजीतून प्रवचन देण्यास त्रास होत नाही पण हिंदीची गोडी त्यात येत नाही.

दि.१०/५/१९९०

My dear Aarati,

While Sachin learns swimming you grow in your art of dance. भ means भाव, ग= राग, रस and त means ताल-मुद्रा is that which delights peoples heart. But more important is the lord seated in hearts of people - so please that lord with devotion expressed through dance. I wish you all the best.

lots of love,
Yours
Tejomayananda

दि.२९/६/१९९० Camp-Settel

आपण प्रस्तावना -खंडाचे हिंदी भाषांतर करणार असल्याचे वाचून आनंद झाला. मी तो खंड वाचला आहे. उत्तम आहे. यात शंका नाही. सध्या लोकांचा कल गंभीर अध्ययनाकडे नसल्याचे पाहून वाईट वाटते. 'विद्वानेव विजानाति विद्वज्जन परिश्रमम्।' प्रयत्न करीत राहावा. आज ना उद्या सफलता मिळेलच.

दि.३०/७/१९९०

पू. स्वामीजी गुरूपौर्णिमेच्या दिवशीच येथे आले व त्या रात्री माझ्या खोलीत राहीले. माझा आनंद गगनात मावेनासा झाला. त्यांच्या सोबत मिशीगनच्या शिबीरात होतो. त्यांनी ३०० च्या वर साधकास मांडूक्योपनिषद व कारिका आणि गीतेचा १३वा अध्याय शिकविला. मी सुंदरकांड व उपदेश सार (भगवान रमण महर्षिकृत) याच्यावर प्रवचने दिली.

दि.१३/९/१९९० San Jose

सर्व पत्रच महत्त्वाचे आहे. (माझ्या जावयांना देवाज्ञा झाल्याचे मी कळविले होते. त्यावर त्यांचे उत्तर आले ते महत्त्वाचे) ता. २०/७/१९९०

दि.१२/६/९४(कुवैत)

माझे मन अद्वैत ज्ञानात रमते तसेच सगुण भक्तिमध्येही रमते. तुलसीदासांनी म्हटले आहे की हृदयात राम निर्गुण आहे तर डोळ्यामध्ये सगुण! सर्वच राममय आहे. तथापि सगुण भक्तीचा रसस्वाद निराळाच आहे यात शंका नाही. बहरीनचा यज्ञ उत्तम झाला व कुवैत मध्ये पण प्रतिसाद छान आहे. ह्या देशामध्ये देखील भारतीय लोक साधन भजन करत राहतात ही प्रशंसनीय बाब आहे.

दि.१०/११/२००० (गौहाटी)

तुमची लेखन व प्रूफ संशोधनाची साधना चांगली होत आहे हे वाचून आनंद झाला. भगवंताला जे कार्य ज्याच्याकडून करून घ्यायचे असते त्याला तो शक्ती देत असतो ही महती कृपा.

दि.१८/२/२००० (म्हैसूर)

तुमची ९ व १२ ऑक्टोबरची अशी दोन पत्रे मिळालीत. त्याद्वारे'सीताराम गुणग्राम पुण्यरण्ये विहारः आनंदमंगलप्रदः अभवत्! असाच विहार मला करवत रहा. असा विहार करतांनाच अचानक अनपेक्षितपणे' लता भवन ते प्रगट भे तेही अवसर दोउ भाई ।' आणि मग दर्शनानन्द! म्हणून साधन भजन करत राहावे हेच आपल्या हातात आहे.

दि.८/१/१९९१

सर्व पत्र महत्त्वाचे आहे. मी सुंदरकांडातील रावणाच्या दूतांना सर्व कपि त्रास देऊ लागले तेव्हा त्यांनी 'आमचे नाक, कान जे कापतील त्यांना रामांची शपथ' घातली हे पाहून लक्ष्मणांनी त्यांना सोडून दिल्याचे वर्णन आहे. ते वाचून मी लक्ष्मणांना श्री रामाची शपथ घालून माझे रक्षण

करण्याविषयी प्रार्थना केल्याचे लिहीले होते. त्यावर पू. स्वामीजींनी उत्तर दिले होते.

दि.२३/३/९२

ध्यानावस्थेत येणाऱ्या सर्व अनुभवास मौन पाळून साक्षी भावाने पहावे. कोणत्याही दृश्यात मन गुंतू देऊ नये. आत्मा द्रष्टा आहे. दृश्य नाही हे लक्षात ठेवावे.

दि.११/७/९२

तुमच्या मनात भगवत्प्रेम भरपूर आहे. देहाध्यास तोडण्याची तुमची नवीन साधना योग्यच आहे. ज्या प्रमाणात देहासक्ती सुटते त्या प्रमाणात देवभक्ती वाढते. देह केव्हा कोठे व कसा सुटेल याची काळजी करण्याची गरज नाही. जो देह मी नाही तो कसा जाईल याचा विचार करण्यात अधिक प्रयोजन नाही. भगवत्कृपा तुमच्यावर आहे मग चिन्ता कसली?

दि.२/१/९५

शरणागती सर्वोत्तम साधना आहे. ते सोपे दिसते पण करणे कठीण, कारण आपल्या इच्छा, कर्तुत्वभाव वगैरे सोडणे सरळ सोपे नाही. तथापि भगवंताची ओढ सर्व समर्थ आहे आणि तुमच्या ह्रदयात ती भरपूर आहे तेव्हा काळजीचे कारण नाही.

दि.१२/६/९४

माझे मन अद्वैत ज्ञानांत रमते तसेच सगुण भक्तीमध्ये पण रमते. तुलसीदासांनी म्हटले आहे की ह्रदयात राम निर्गुण आहे तर डोळ्यामध्ये सगुण! सर्वच राममय आहे तथापि सगुण भक्तीचा रसास्वाद निराळाच आहे यात शंका नाही.

दि.१५/९/२०००(हैद्राबाद)

संपूर्ण अयोध्याकाण्ड ह्रदयांस वेधून जाणारे आहे. तुमच्या

मनःस्थितीची मला पूर्ण कल्पना आहे. हे प्रेमाश्रू बहुमोलाचे आहेत. कारण त्याद्वारेच मन शुद्ध होऊन श्रीरामात, त्यांच्या दर्शनात विलीन होते. गीतावली व कवितावली सुंदर रचना आहेत.

दि.३/९/२०००(मदुराई)

तुमचे पत्र येथे मिळाले. तुम्हास स्वप्नात माझे दर्शन झाल्याचे वाचून माझ्यावर तुमचे किती प्रेम आहे ते समजले. तुम्ही मला पत्र लिहीत रहा. उठता, बसता सर्वदा रामनामस्मरण झाले तर ते उत्तमच आहे. तसे स्मरण होत राहण्यासही भाग्य लागते .

दि.१२/८/२००१

आज श्रीकृष्ण जन्माष्टमी आहे आणि ती मी येथे दक्षिण आफ्रिकेत आमच्या आश्रमांत साजरी करीत आहे. काल येथे गीताज्ञान यज्ञास प्रारंभ झाला. आता २० ऑगस्ट रोजी मुंबईस परत जाईन. तुम्हाला माझी रामायण प्रवचने आनंद देत आहे हे वाचून फार समाधान वाटले. तुमच्यासारखे रसग्रहण करणारे श्रोते विरळच असतात. भगवान तुमच्यावर सतत कृपा वर्षाव करीत राहोत .

दि.२४/६/९४

निर्गुणाचे ज्ञान असून सगुणांची ओढ असणे हीच भक्तीची विशेषता व त्यातील मधुरता आहे. कधी वाटते की रामप्रभू स्वतःच्या सुंदर रूपाचे दान देण्यात फार कंजुष आहेत तेव्हा त्यांना उदार कसे म्हणावे? त्यांना काय म्हणावे ते समजत नाही. गोस्वामीजी गातात की, 'ऐसो को उदार जग माही!' सर्व तंत्र स्वतंत्र भगवानांना आदेश पण देता येत नाही. त्यांचे प्रेम मनात असणे हेच महद्भाग्य!

दि.२९/६/९५

सर्व संतांची चरित्रे अनुपम व प्रेरणादायी असतात यात शंका नाही. सर्वांचे कार्य वेगळ्या पद्धतीचे असले तरी श्रेष्ठ आहे हे स्पष्ट दिसून येते.

दि.३०/४/९४

'तत्वज्ञानाच्या दृष्टीने पहाता अजातवादच प्रमाणसिद्ध आहे. अद्वितीय ब्रह्माशिवाय दुसरे काहीच नाही तर निषेध तरी कशाचा करायचा? पारमार्थिक सत्य मोठे विलक्षण आहे! ''एतत् तदुत्तमं सत्यं यत्र किञ्चिन्न जायते!'' असे भगवान गौडपादाचार्यांचे वचन आहे. अष्टावक्र गीता उत्तम अधिकारी वर्गांसाठी आहे. तुम्ही अशा ग्रंथांचे अध्ययन अवश्य करावे. पुनः पुनः श्रवण मनन व निदिध्यासन केले असतां ब्रह्मभाव दृढ होतो. काळजीचे कारण नाही.

दि.१२/११/९३

साधन करत रहावे मग 'जो चाहे सो कर कृपा तेरो तुलसी है।' वियोगात संयोगाची व्याकुळता असल्यामुळे त्यात तीव्रता व भेट होईल याचा आनंद असतो. संयोगात आता वियोग होईल याचे दुःख असते! सर्वच काही विलक्षण आहे. तुम्हास श्रीरामाचे स्मरण सतत होत आहे. हेच खरे धन आहे. भगवान कृपावंत आहेत तेव्हा तुमची इच्छा पुर्ण करतील यात संशय नाही.

दि.२२/६/९३

अर्थ व काम हे ऐहिक भोग आहेत आणि धर्म म्हणजे सकाम सत्कर्माचे फळ पुण्य ज्यायोगे स्वर्ग प्राप्ती होते. त्या धर्मफळात भरताची रूचि नाही असा तेथे अर्थ आहे. तसेच त्या दोह्यात निर्वाण म्हणजे जन्ममरणाच्या फेऱ्यातून सुटका हा अर्थ आहे. भक्तास तशी सुटका नको असते. 'तुका म्हणे गर्भवासी । सुखे घालावे आम्हांसी।।' निर्मल मनाच्या प्राप्तीसाठी सीतामाईस प्रार्थना करीत जावी. 'ताके जुघ पद कमल मनावऊँ । जासु कृपा निर्मल मती पावऊँ।। (सीतावंदन बालकाण्ड) स्वदोष आठवल्यास हरकत नाही पण तत्काळ भगवत् गुण पण आठवावे. जसे अंगावर धूळघाण दिसल्याबरोबर त्याचे चिंतन सोडून आपण त्यास धुण्याचा प्रयत्न करित असतो.

दि. ६/९/०८/ पवई

तुमचे पत्र व प्रज्ञाचरितमानसाच्या दोन प्रति + एक प्रत (सौ. रेखानी

पाठविलेली)मिळाल्या. आनंदात मग्न रहा ''मन हे रामरंगी रंगले आत्मरंगी रंगले मन ।''

दि.६/३/२००८

महाशिवरात्री प्रीत्यर्थ अनेक शुभेच्छा! सर्वांची प्रार्थना हीच पाहीजे की ।। तन्मे मनः शिव संकल्पमस्तु।।

दि.२/६/०७

ह्या पत्रासोबत नवप्रकाशित मराठी मानसभक्ति सूत्राच्या काही प्रती पाठवीत आहे. तसेच भक्ति रसायनाची एक झेरॉक्स प्रत पण आहे. त्याचा आनंद लुटावा. एक भरोसो एक बल एक आस बिस्वास । एक राम घनश्याम हित चातक तुलसीदास ।।

दि.२/८/२००४

तुमचे प्रेम दांभिक नाही आणि तुम्हास तसे वाटत असले तरी ते रामभैय्यावरच, मग काळजी कशाची? ''केनापि उपायेन मनो रामे निवेशयेत्।।''

दि.२१/११/२००३

तुमचे पत्र विजयवाडा येथे मिळाले. तुम्हास गीतावली रामायण आवडल्याचे वाचून आनंद झाला. कारण तुम्ही खरोखर रसग्रहण करता. ह्यावेळी 'जब ते चित्रकूट से आये' ह्या पदाची चाल पूर्वी पेक्षा निराळी आहे. ही मला अधिक योग्य वाटली. तुम्ही मला 'भावगीत गंधर्वांची' मोठीच उपाधि बहाल केली आहे. यात तुमचे प्रेमच प्रगट होते. 'उद्या पहाटे मी येथून पोर्टब्लेअरला जात आहे.' वीर सावरकरांची आठवण जागृत होते.

दि.७/१२/९३(सिद्धबारा)

भगवंताचे नामस्मरण, रूपध्यान, व लीला कथा श्रवण करतांना जर प्रेमाश्रू वाहिले नाहीत तर ते ह्रदय दगडाहून कठोर आहे असे म्हटले जाते.

तुम्ही संकोच किंवा काळजी न करता भरपूर वाहू द्या. हे तर भाग्याचे लक्षण आहे. तुमचे यात काही चुकत नाही. अश्रूंना कुणी दोष म्हटले तर तो भगवंताच्या गुणांचा दोष आहे. तुमचा नाही!

दि.२०/४/९४(सिंगापूर)

तुमच्या मनाची व्याकुळता मला समजते. कधी असे वाटते की ही अत्यधिक व्याकुळता किंवा दर्शनाचा हट्टच त्यात बाधक बनतो आहे! कधी कधी आपण थकतो व झोपी जावे असे वाटते, पण झोपण्याचा प्रयत्न झोपू देत नाही! तेव्हा हेच म्हणावे की, – ' जो चाहे सो कर कृपा तेरो तुलसी है!''

दि.२०/७/९४

जाग्रत, स्वप्न व सुषुप्ती जे होत असेल त्यास होऊ द्यावे. स्वतःच्या द्रष्ट्यास्वरूपाचे अनुसंधान राहीले पाहीजे. कामादि विकार संकल्पामुळे वाढतात. मनात वृत्ति येते व जाते. त्यावर जास्त संकल्पना करून तीस वाढू देऊ नये. गीतेत म्हटले आहे की,' सर्व संकल्प संन्यासी योगारूढस्तदोच्यते।।'

दि.८/१२/९४

केवळ भगवद् दर्शनाची इच्छाच योग्य आहे, अन्य इच्छा नाही. 'जन्मोजन्मी आम्ही बहु पुण्य केले । तेव्हा ह्या विठ्ठले कृपा केली' असे नामदेव महाराज म्हणतात. नाम साधकाच्या हाती असते तर रूप भगवंताच्या आधीन. म्हणून आपण नामस्मरण करत रहावे.

दि.२०/४/९३

तुमच्या मनाची जी स्थिती आहे तीच मुमुक्षुता. आणखी स्पष्टीकरणाची गरज नाही. खरे पाहता मुक्तता ही आपली सहज स्वरूप स्थिती आहे पण स्वतःला बद्ध समजून मग उगाच मोक्षासाठी आपण व्याकुळ होत असतो. बद्धतेचा दुराग्रह सोडला तर मुक्तता नित्यसिद्धच आहे हा वेदान्ताचा चरम

सिद्धांत आहे. तुमच्या प्रश्न विचारण्याने मला मुळीच त्रास होत नाही. तरी संकोच करू नये. मागील महिन्यात पू. स्वामीजी इंदोरला ज्ञानयज्ञासाठी गेले होते. तेव्हा ती. आईस भेटण्यास मुद्दाम ते आमच्या घरी पण जाऊन आले. त्यांच्या ह्या कृपेने आई अत्यानंदाने भारावून गेली! परवाच फोनवर तिच्याशी गोष्टी झाल्या ती देखील तुमची आठवण करत असते.

दि.२७/४/९६(कुवेत)

श्री रामचरितमानस प्रेमी मंडळासाठी नवीन युवा पीढीचे कार्यकर्ते लाभत आहेत ही फार मोठी आनंदाची बातमी आहे .देव आपल्या भक्तांचे कार्य पूर्ण करतो याचे हे प्रत्यक्ष प्रमाण आहे .

दि.१/६/९६(मदुराई)

भगवंताच्या विरहामध्येच त्याच्याशी सर्वाधिक संयोग होतो कारण त्याचे स्मरण तीव्र असते. तुम्हाला काळजीचे मुळीच कारण नाही. नामस्मरण तुमच्या हाती आहे, तर रूपदर्शन त्यांच्या हाती. किती वेळ समोर येणार नाही!

दि.१४/९/९६

तुमची उत्स्फुर्त कविता फार भावपूर्ण झाली आहे. ही पण श्री रामाचीच कृपा आहे. तुमच्या मनात सतत रामप्रेम उचंबळून येत असते. याहून भाग्याची गोष्ट कोणती? 'असा धरी छंद जाई तुटोनिया भवबंध '

दि.१५/६/९६(दरबान)

कोल्हापूरला प्रकृतीची काळजी घेऊन आता तुमची योगादि साधना चांगली चालली आहे व तसेच 'चिंतने' आणि रामविश्रामाविषयी वाचून आनंद झाला . 'कर्मण्येवाधिकारस्ते'एवढेच स्मरणात ठेवून काम करीत रहावे. ६जून रोजी कोयम्बतूर येथे Chinmaya International Residential School चे उद्घाटन उत्तम झाले. पूज्य गुरुदेवांचा अनेक वर्षाचा संकल्प पूर्ण झाल्याने फार समाधान वाटते.

दि.८/१/९७

आज तुमचा वाढदिवस! हार्दिक अभिनंदन!

'रामे चित्तलयाः सदा भवतु ते' हीच माझी शुभेच्छा व्यक्त करीत आहे.

दि.१२/५/९७

रामनामाची व रामदर्शनाची ओढ महद् भाग्य आहे. व्याकुळता वाढवून दर्शन देण्याचा रामाचा स्वभाव आहे! त्यांत आनंद आधिक होतो.

दि.६/८/९७

तुमचे १७ जुलैचे पत्र मला मिशिगन येथे पूज्य गुरूदेवांच्या महासमाधी दिनाच्या एक दिवस पूर्वी मिळाले. ते वाचून फार आनंद झाला

गुरू ध्यायी गुरूध्यायी । गुरू परते साधन नाही ।।

त्यांची कृपा तुम्च्यावर सतत आहेच ।

दि.८/४/९५(लंडन चिन्मय मिशन)

पूज्य स्वामीजींच्या तुम्ही भक्तांनी हे कार्य हातात घ्यावे. ते जरी कठीण वाटत असले तरी अशक्य नाही. अशा कार्यात उत्पन्न होणाऱ्या समस्यांची मला जाणीव आहे. पण मनात दृढ श्रद्धा ठेवून यथाशक्ती प्रयत्न केल्यास सफलता मिळते हा पण स्वानुभव आहे. मी थोडी फार सेवा करतो ते कर्तव्यच आहे . त्याचे आभार कशास मानावे? मी देखील पू. स्वामींजींचा भक्त आहे जरी मला त्यांचे प्रत्यक्ष दर्शन घडले नाही.

दि.३१/११/९१

श्रवणाचा व प्रवचन करण्याचा आनंद निराळाच असतो. श्रवणात भान विसरता येते, अश्रूपात थांबवण्याची गरज नसते पण कधी कधी मन भटकते! प्रवचन करतांना मन एकाग्र असते. आनंद असतो.

दि.२७/१/२००१(पवई)

रामभैय्यासाठी कळवळून प्रार्थना करणेचे उत्तम साधन आहे.

स कीर्त्यमानः शीघ्रमेव अविर्भवति अनुभावयति च भक्तान्।।

दि.१८/१/२००१(गोवा)

तुम्हास श्रीरामप्रभूंचे स्वप्नात इतके सुंदर दर्शन झाले हे वाचून मला फार आनंद झाला. त्यांना तुमच्याकडून सद्गुरूंची ग्रंथसेवा करून घ्यायची आहे. म्हणून ते प्रत्यक्षात अजून दर्शन देत नाहीत कारण मग तुम्ही काहीच करू शकणार नाही! तुमचे कार्य संपले की दर्शन देतील.

दि.४/१२/२०००(चिन्मय गार्डन्स)(चि.सचिनला लिहिलेले पत्र)

विद्यार्थी जीवनात केवळ विद्यार्जनास महत्व द्यावे. त्यानंतर त्या विद्येचा सदुपयोग दक्षतेने करावा. धन, धर्म व विद्या यांचा संचय हळूहळू करून त्यांचा उपयोग जनसेवेसाठी केल्यास देवत्त्वाची प्राप्ती होते. रोज भगवंताचे स्मरण अवश्य करावे. रोज भगवंताचे स्मरण अवश्य करावे. त्यांच्या कृपेने तुझी उत्तरोत्तर प्रगती होवो.

दि.११/३/०१(पवई)

'अमृताहूनी गोड' अशा नामरसाचा आस्वाद तुम्ही घेत आहात ही परम भाग्याची गोष्ट आहे. त्यातच मन निमग्न राहील. आत्यान्तिक प्रेम हेच ते अमृत असा तुम्ही केलेला अर्थ समर्पक आहे. 'आस्था चॅनेलवर तुम्ही जी प्रवचने ऐकत आहात ती काही वर्षापूर्वी सिद्धबाडी येथे दिली होती.ती ऑडिओ व व्हिडीओ रूपात उपलब्ध आहेत. मी तुमच्यासाठी पाठवीन.'

दि.१/१०/९७

तुमचे २० सप्टेंबरचे पत्र मला येथे मिळाले. विशाखपट्टनम् येथे HPCL मध्ये भयंकर आग लागल्याने फार हानि झाली पण शहरापासून लांब असल्याने प्रत्यक्ष शहरात सुरक्षा होती. ती ईश्वराची कृपाच. रामायणांतील सुंदर भाव तुमच्या पत्रात दिले तर मी जरूर वाचेन. मोठी पुस्तके वाचण्यास इच्छा असून वेळ मिळत नाही.

दि.२२/९/९७

तुम्हांस निरंतर रामायण अध्ययनाची व त्या योगे सद्गुरूच्या

सानिध्याची संधी मिळत आहे ही परमेश्वराची असीम कृपाच होय. तो तुम्हास स्वतःचे दर्शन घडवील.

स कीर्त्यमानः शीघ्रमेवाभिर्भवति
अनुभावयति च भक्तान ।।

दि.२६/११/९७(भुवनेश्वर)

साधनेमुळे तुम्हास उच्च सात्विक अनुभव येत आहेत ही फार भाग्याची गोष्ट आहे. अनुभव देणारे श्री राम स्वतःची ओळख करून देतील यात शंका नाही.

दि.२८/५/९८(चेन्नई)

तुमचे १३ मे चे पत्र मिळाले. त्यामध्ये मला 'परम प्रभु प्रिय'असे विशेषण दिलेले पाहून फार आनंद झाला. आत्मनिरीक्षण केल्यास स्वतःचे अनेक दोष दिसतात पण 'रहति न प्रभू चित चूक किये की '...हे आठवून त्यांच्या विषयाचे प्रेम वाढतच जाते .

दि.५/८/९८(अमृतसर)

सिद्धबाडी येथे आमच्या मिशनची कॉन्फरन्स उत्तम झाली. अनेक मोठे प्रकल्प पूर्ण करायचे आहेत. श्री रामप्रभू व पूज्य गुरूदेव आम्हा सर्वांच्या प्रयत्नांना यशस्वी करतील असा विश्वास आहे. पवई आश्रमांतील दुर्घटना ह्रदयद्रावक होती. तथापि कार्य सुरूच ठेवायचे आहे.

दि.२६/८/९८(पवई)

आज श्री गणेशचतुर्थी. त्या मंगलमूर्तीची कृपा तुमच्यावर सदैव राहो. पूज्य स्वामीजींचे दिव्य लेखन कार्य गीता प्रेस तर्फे प्रकाशित होण्याची शक्यता ऐकून मला अतिशय आनंद झाला. तो दिवस लवकर येवो.

दि. १९ मे २००१(चिन्मय गार्डन्स)

हनुमंतास अहंकार कसा होऊ शकेल? प्रभू रामचंद्रांना त्यांची भेट

भरताशी घडवून आणायची होती म्हणून तसे झाले एवढेच. आम्हा सर्वास मात्र फार जागरूक राहीले पाहीजे यात शंका नाही. श्री रामाश्रयच खरा आश्रय आहे.

दि.२९/८/२००१(पवई)

माझ्या रामायण प्रवचनांचा तुम्ही खरोखर रसास्वाद करीत आहात. माझ्यावर सीताराम व शिवपार्वतीचे आशीर्वाद असलेले आपले दृश्य मला फार आवडले. मला त्याची नेहमीच गरज आहे. सप्टेंबर महिन्यात संपूर्ण तुलसी रामायण गानपाठ कॅसेटबद्ध करण्याचा माझा संकल्प आहे. रोज दोन तास स्टुडिओमध्ये जावे लागेल. प्रभू श्रीरामच तो संकल्प पूर्ण करू शकतील.

फेब्रुवारी २००२

आदरणीय श्री डुंगरजी महाराजांनी फोन करुन मला कळविले की त्यांना रामायण गायन फार आवडले. त्यांच्या काही मित्रांना देखील त्यांनी ते ऐकविले मला धन्यता वाटली. तुम्हा सर्वांचे प्रेम बहुमोलाचे आहे. (श्री.डुंगरजी महाराजांना संपूर्ण मानस मुखोद्‌गत आहे हे विशेष.)

भगवंताचा नीलवर्ण अनंत स्वरूपाचे प्रतीक आहे, तर पीतवर्ण पृथ्वीचा असल्याने त्यांचे पृथ्वी व पृथ्वीवरील जीवांविषयीचे प्रेम दर्शवितो. म्हणून कदाचित ते पीतांबरच धारण करत असतील . प्रभु रामचंद्रांचा तनुगंध नीलकमलांच्या सुगंधासारखा असेल असे मला वाटते कारण त्यांचे वर्णन करतांना नीलकमलांचा दृष्टांत नेहमी अढळतो. कमलाप्रमाणे सुंदर, कोमल व सुगंधित श्रीराम आहेत. त्यांना पुनः पुन्हा नमस्कार!

दि.२१/१०/०१(पवई)

रामभैय्याबरोबरची तुमची मनो राज्ये (मनोरथ)अतिशय प्रेमळ व भावपुर्ण आहेत. त्यात सतत रमावे. ''दूसरी रति मम कथा प्रसंगा!'' मला वाटते की असे मनोरथ व्यावहारिक जगापेक्षा अधिक सत्य असतात.

दि.२१/५/०२(पवई)

'तापस प्रकरण'विलक्षण आहे. तो तापस कोण होता ते गोस्वामीजींनी रहस्य ठेवले आहे. मला वाटते की प्रत्येक साधकाने तापस होऊन भक्तिचे वरदान भगवंताकडून मागून घ्यावे असा त्यात हेतू असावा.

दि.१७/११/९८

बेळगावी तुम्हा सर्वांच्या भेटीने मला देखील फार आनंद झाला 'ज्ञानसारा'ची रचना भगवतकृपेनेच माझ्याकडून घडली अन्यथा माझे साम्यर्थ ते किती? सकळ करणे जगदीशाचे आणि कवित्वाची काय मनुष्याचे? (समर्थ उक्ति)

तुम्हास ज्ञानसागर आवडले हे माझे पारितोषिक आहे. 'योगवासिष्ठसार संग्रह' म्हणून एक छोटेसे पुस्तक टीकेसहीत (इंग्रजीमध्ये) नुकतेच मिशनतर्फे प्रकाशित झाले आहे. त्यावर टेप्स नाहीत. गोस्वामीजींची सुंदर पदे तुम्ही लिहून पाठवलीत. फार आनंद वाटला . 'जनु जीव उर चारिऊ अवस्था' विषयीचा अर्थ पाहीला होता.

दि.२६/१२/९८(कलकत्ता)

कोयम्बतूर येथे आमची इंटरनॅशनल रेसिडेन्शिअल स्कूल आहे. पाचवी पासून १० वी पर्यंत सध्या आहे. व दोन वर्षात १२ वी पर्यंत होईल. ह्यावेळी तेथे १५० विद्यार्थी आहेत. शाळा चांगली चालली आहे. तेथेच एक सुंदर आश्रम पण आहे. तुम्ही पूज्य गुरूदेवांचे भगवद्गीतेवरील भाष्य वाचून आनंद अनुभवित आहात हे फार छान आहे . त्यांच्या कृपा प्रेमानेच माझे कार्य होत आहे.

दि.२०/१/९९

तुमची दोन पत्रे मला येथे मिळाली. स्कंद पुराणातील कथा रोचक होती. मला ती माहीत नव्हती. तुमच्या मंडळाच्या कार्यविषयी वाचून आनंद झाला. तुमची घरी राहून केलेली साधना पण त्या कार्यास यशस्वी करेल यात शंका नाही .

दि.२१/२/९९(बेगमपेठ, हैद्राबाद)

मी येथे महाशिवरात्रीच्या दिवशी नवीन निर्मितशिव मंदिराचे (चित्र वर दिलेले आहे) उद्घाटन केले. येथील चिन्मय मिशनच्या शाखेने हे कार्य केले आहे. मंदिर फार सुंदर बनले आहे. तुमच्या कवितेमध्ये सुधार करण्याची गरज मला दिसत नाही. भाव मधुर तर काव्यही मधुर!

दि.८/१२/०२

'प्राण्यांचा सहज वैर त्यागण्याचा अर्थ वैरभाव– दुष्टता त्यागणे एवढाच असेल. अर्थ असा की, जीवन निर्वाह सोडून निष्प्रयोजन कोणी हिंस्त्र पशु त्यावेळी अन्य प्राण्यास कष्ट देत नव्हता, किंवा प्रभूंच्या सानिध्यात त्यांना भूक लागतच नसेल!!!

दि.२४/३/०२

'बिनु बिराग जप जोग' चा अभिप्राय असा की श्रीरामांच्या पवित्र चारित्राच्या श्रवणाने व गायनानेच रामभक्ती मिळते. त्यासाठी जप आदिचा निराळा स्वपुरूषार्थ आश्रित प्रयत्नही करण्याची गरज नाही, याचा अर्थ असा की आम्ही तसा प्रयत्न करू नये, पण विश्वास भगवंतावरच ठेवला पाहिजे.

दि.२१/९/०२ (उत्तरकाशी)

तुम्ही विचारलेल्या प्रश्नास यथामती उत्तर देत आहे.

१) दोन अंगुळाचे अंतर म्हणजे द्वैतभाव म्हणजेच माया, त्या मायेचे स्वरूप प्रसंगानुरूप 'मी व माझे' असू शकते किंवा इतर देखील, भगवंताची माया विमोहीनी आहे तर 'विबोधिनी' पण आहे आणि 'प्रेमवर्धिनी' देखील आहे. यशोदामाता व काकभुशुंडीच्या प्रसंगात ती प्रेमवर्धिनी वाटते.

२) प्रीती व नेहु एकच आहे. ज्या व्यक्तीविषयी ममता असते त्यांच्यावर कृपा सहज असते आणि म्हणून ममता व कृपा कारणकार्य संबधामुळे एकच आहे.

३) 'सुरपति नरनाहू' असा पाठ दिलेला आहे तेथे शब्दशः अर्थ न घेता असे समजले पाहिजे की इंद्रदेव पण महाराज दशरथांना अतिशय आदर देत असल्यामुळे जणु काही दशरथ महाराजच सुरपति होते.

४) सीतामाईंच्या 'नील नलिन लोयन' चा तुम्हाला उमगलेला अर्थ फार सुंदर आहे. (त्याच्या नेत्रात नीलवर्ण रामप्रभुचे वास्तव असते म्हणून असे वर्णन केले असावे असे मी लिहिले होते.)

दि.१९/६/०३(चिन्मय निशन)

भगवंताला भक्तांची परीक्षा घेण्याची गरज मला भासत नाही. ते तर अन्तर्यामीच आहेत. विविध घटनांच्या द्वारे ते भक्तांची महानता जगासमोर प्रगट करतात व त्या माध्यमाने साधकांचे मार्गदर्शन करतात असे मला वाटते. भरताची श्रेष्ठता प्रभू श्रीरामच पूर्णपणे ओळखून होते. तुम्हास परिक्षेची भीती वाटण्याची गरज नाही! तुम्ही त्यात उत्तीर्ण झालेल्या आहात.

दि.५/५/२०००(सिद्धबारी)

मी मॉरीशसहून श्रीरामनवमीच्या वेळी पत्र पाठविले होते ते तुम्हास मिळाले असेल . मॉरीशसहून मला एक दिवस कमी करून भारतात परतावे लागले. कारण आन्ध्रप्रदेशातील आमच्या मिशनच्या जेष्ठ स्वामिनी शारदा प्रियानन्दाजींची महासमाधी झाली. प्रवास व काम फार वाढले. त्यानंतर नेपाळला साधना शिबीरासाठी गेलो. पत्रोत्तरास विलंब झाल्यास अन्यता न घ्यावे. तुमची प्रकृती बरी नसूनही श्री रामकार्य तुमच्या हातुन घडत आहे. ही मोठ्या भाग्याची गोष्ट आहे. तुमचे प्रेम शुद्ध आहे. शंका धरू नये. ह्याच जन्मी तुमची इच्छा पूर्ण होईल असा माझा विश्वास आहे.

दि.१२/४/२०००(मॉरिशस)

आज श्रीरामनवमी! सर्वहितावतार प्रिय प्रभू श्रीरामांचा जन्मदिवस! आनंद आनंद! भगवंताचे स्वागत व ह्रदयात निवासाचे आवाहन आम्ही सर्व करू! त्यांची कृपा तुम्हा-आम्हावर सदैव राहो.

तुम्ही पुन्हा पुन्हा जन्म घेण्यास तयार आहात पण माझी मात्र तशी तयारी नाही !! मला तर मुक्ती हवी .

दि.३१/३/२०००(पवई)
गुढी पाडवा व नवीन वर्षाच्या अनेक शुभेच्छा !
देह देवाचे मंदिर । आत आत्मा परमेश्वर ।।

दि.२२/२/२०००(कालिकत)
श्रीरामः शं ते करिष्यती ।।

दि.१२/६/९९
तुम्ही 'प्रस्तावना खंडाचे' हिन्दी भाषांतर करीत आहात हे वाचून आनंद झाला. 'गुरूसेवेचा संकल्प हेचि माझे पूर्ण तप।' कार्य उत्तम होईल. पूज्य स्वामींजींच्या 'स्वान्तःसुखाय' लेखना विषयीचे उद्‌गार वाचून मन भक्तीभावाने भरून आले, त्यांना कोटीः प्रणाम!

दि.७/१०/२०१२(पवई)
तुमचे २५ सप्टेंबरचे पत्र मिळाले. तुमचे माझ्यावर अगाध प्रेम आहे. मला तुम्ही 'मानस गंधर्व' ही उपाधि दिली! धन्यवाद! प्रभुरामचंद्रांची कृपा आम्हा तुम्हांवर सदैव राहो. मानसभक्ति सूत्राचा विषय सुंदर आहे. जशी प्रभुंची इच्छा असेल तसेच घडून येईल.

दि.८/१०/९५(कोचीन)
रामकृपेविषयी तुम्ही जे लिहिले ते सर्वथा सत्य आहे. त्यांच्या कृपेचा वर्षाव सतत होत आहे. हे समजले तर संपूर्ण जीवन आनंदमय होऊन जाते यात शंका नाही.

दि.१९/१/२००२
प्रभु रामचंद्रांना पाहतांना 'मति' कशी लावावी असा प्रश्न तुम्ही विचारला होता. माझ्या मते मन लावणे– प्रेम, मति म्हणजे आदरबुद्धि व चित्त (चित) चा अर्थ ह्रदयात साठवणे (स्मरण)

दि.२२/३/९९(पवई)

श्रीरामनामजपाचा तुमचा शुभ संकल्प प्रभू पूर्ण करतील. मला वाटते की त्यांच्या दर्शनासाठी मनास सात्विक कामनेपासून पण मुक्त करावे लागते. समाज कार्यामुळे पण मनात विक्षेप येत असतात. जशी प्रभु इच्छा.

१२/६/९९(पवई)

'गुरूसेवेचा संकल्प हेचि माझे पूर्ण तप'

दि.२७/६/११(कॅम्प लंडन)

अनुवादकार्य व जप करण्याचा तुमचा संकल्प भगवद् इच्छेने पूर्ण होईल असा विश्वास वाटतो. असे म्हणतात की प्रभू भक्तांच्या शुभसंकल्पानेच प्रसन्न होत असतात. भारतावर युध्दाचे संकट गंभीर होत आहे. सैनिकासाठी चिन्मय मिशन तर्फे निधी संग्रहीत करत आहोत.

दि.२६/११/११ (लक्ष्मणपूर चिन्मय सेवा आश्रय)

तुमची प्रकृती ठीक नसूनही जी गुरूसेवा तुमच्याकडून घडत आहे ही प्रभु रामचंद्रांची व गुरूंची मोठीच कृपा आहे. तुम्हास काळजी करण्याचे कारण नाही. सर्वांना शक्ती, बुद्धी, सन्धि व प्रेरणा देऊन प्रभू आपले कार्य करवून घेतात (हे तुम्हास माहीत आहे.)प्रभु रामचंद्र स्वतःचे कार्य करवून घेण्यास फार पटाईत आहेत हे तुम्हास माहित आहेच.

दि.१०/१२/९९

रामभेटीचे मनोरथ असू द्यावे. ती पण साधनाच आहे. प्रभुकृपा तर तुमच्यावर आहेच.

# परिशिष्ट - २

## इतर सत्पुरुषांची पत्रे

॥ ॐ ॥

॥ ॐ नमो भगवते शिवानंदाय ॥

आदरणीय कमलताई वैद्य ह्यांनी पुजनिय ब्रह्मीभूत श्री. प्रज्ञानानंद सरस्वती ह्यांचे दोन अमोल ग्रंथ मला भेट दिले व त्यावेवर चार शब्द मी लिहावे असे त्यांचे पत्र मला सौ. कमल थत्ते यांचेकडून मिळाले इतके अवघड कार्य श्री. कमलताईंनी मला सांगितलेकी जणू ! टिटवीला समुद्रप्राशन करायचे कार्य त्या मला सांगत आहेत असेच वाटले. पण त्यांना नाही म्हणवेना. आता ह्या रामचरितमानस सरोवरातला जी ही शिंप उचलला त्यातला मोती अमोलच.

आम्ही वीस वर्षे उत्तर भारतात असलेने गोस्वामी तुलसीदासांचे श्री रामचरितमानस म्हणजे तिकडच्या लोकांचा आत्माराम्च, कुठल्याही मंदिरात जा हे गोड महाकाव्य गायन तुमच्या कानांवर पडेलच आणि तुम्हीही त्याच तंद्रीत पुढे चालत रहाल. कारण हे काव्य रामायणाचा गाभा आहे, गातच रहावेसे वाटते. महाराष्ट्रात आल्यावर तुलसी रामायणाची गोडी व ओढ कायम राहिली पण सामुहिक आनंद घेता येत नव्हता. पण सत्य संकल्पाचा दाता परमेश्वर. काही वर्षांपुर्वी गोरे मंगल कार्यालयात स्वामी प्रज्ञानानंद सरस्वतींच्या शिष्य परिवाराचा सत्संग झाला. तेथे मला श्री कमलताईंनी प्रवचन संपल्यावर हे मराठी रामकाव्य हाती दिले.

ते वाचले आणि खूप आनंद झाला गो. स्वामींचे कुठले? नि स्वामी प्रज्ञानानंदजींचे कुठले? असा प्रश्न पडला. चौपाई, दोहे, सोरठे छंद नी त्यातही अर्थाच्या तर्थीच, संसारात राहून आत्मविद्येचा अभ्यास असणाऱ्या साधकांना हा अनुभव येतोच म्हणून ह्या ओवी फार आवडल्या

बहु संत असंत पदाही, दुःख उभय भेद परि काही
दुसरी वियोगी प्राण नेती, एक मिलन दारुण दुःख देती.

रामायण ग्रंथ हा महासागर नी तुलसीदासांचे तर मानस सरोवराचे मथन. त्यामुळे ह्या महासागराला ना आदि ना अंत, पण ह्या रामायणाचे वैशिष्ट्य असे की कविला ... त्यात दुःख दिसले ना कुणीही दुष्ट दिसले. कुठेही कुणाची निंदा नाही. विवेक, वैराग्य, भक्ति, प्रेम, माधुर्य, नीती, धर्म, कर्तव्यपरायणता त्यागाची परिसीमा ह्यातून यांशिवाय दुसरे काही दिसतच नाही. हे काव्य महासागर मथन करुन काढलेला अमृतकलशच आहे आणि ते आपल्या महाराष्ट्रात

हा अमृत कलश त्यातला एकही थेंब न सांडता आम्हाला लाभला. थोर उदार भक्त कृपानिधान स्वामी प्रज्ञानानंदांनी आम्हाला दिला. त्यांच्या चरणाला कोटी कोटी प्रणाम. स्वामीजींनी सुरुवातीलाच आरती नी समाप्तीचे चार शब्द नव्हे अनमोल हिरे आम्हाला दिलेत. त्यांचे मनन करण्यातच आम्ही ज्ञानमग्न होऊन जातो.

हरि ॐ तत् सत् ।

आता प. पू. स्वामी प्रज्ञानानंदांची संगीत समश्लोकी गीता हे ही अप्रतिम काव्य जणू अंधाऱ्या मनाच्या खोलीत ते ही अज्ञानी मानवाने चाचपडत राहावे. हताश व निराश व्हावे अशा अज्ञान रात्रीच्या अंधारात जणू मध्यरात्री सूर्यप्रकाश प्राप्त व्हावा तसे. भगवत गीता श्रीकृष्ण योगेश्वर भगवान सांगणारे ऐकणारा त्यांचा सखा अर्जुन अशावर चार शब्द मी काय लिहू? एखादी स्त्री प्रथम सासरी गेल्यावर प्रथम स्वयंपाक करते त्यावेळी ती हळूच चमच्याने दोन थेंब प्रत्येक पदार्थ चाखून पहाते चव कळते. पण पोट कुठे भरणार? तसा माझा गीतेचा अभ्यास शून्य. मी ती चाखली पण शब्दाचा कीस काढून वाचली नाही. मराठीत आता ती सुलभ करून हा प्रसाद स्वामींनी सर्वांना मुक्त हस्ते वाटला आहे. सर्वांना तो सेवन करता येईल तो प्रसाद खायला सोपा आणि जाणायला, पचवायलाही सोपा असा आम्हा सर्वांना दिलाय. पण थोडी थोडी गीता चाखली नी बापरे! पुढे कुरुक्षेत्र आणि धर्मक्षेत्रावरच असे घनघोर महायुद्ध विचारच करवेना म्हणून सर्वधर्म परित्याज्य सर्वज्ञान संपन्नता परित्याज्य करून स्वस्थच बसले. गुरु शरणम् हरि शरणम् करत. अस्तु.

ॐ [illegible]

किशोर म. व्यास
☎ ३००८
STD. ०२४२५२

॥ श्रीहरिः ॥

महर्षि वेदव्यास प्रतिष्ठान
भारत चौक,
संगमनेर ४२२ ६०५
जि. अ. नगर (महाराष्ट्र)

॥ श्रीः ॥

दिनांक ३० / ३ / १९९४
(मथुरा)

आदरणीय डॉ. कमळताई,

सप्रेम सादर जय श्रीकृष्ण।

भगवत् कृपे सर्व कुशल, आपलेही कुशल चिंतीतो.
आपले दि. २।३।९४ चे पत्र वेळेवर मिळाले.
तत्पूर्वीच श्री. गिळजींची भेट झाली होती. व त्यांच्याकडून आपली प्रकृति बरी नसल्यामुळे बेळगांवचा कार्यक्रम स्थगित करावा लागला हे कळले होते.
आपली प्रकृति बरीच बिघडल्यामुळे सारखी काळजी वाटते. आपल्या भावावेगाचा परिणामही प्रकृतिवर होण्याची शक्यता नाकारता येत नाही. म्हणून शांतचित्ताने जप आणि ध्यान चालू असावे. व्याकुलता ही अत्यन्त स्पृहणीय व श्रेष्ठ अवस्था असली तरी सर्वांना सर्व दृष्टिने ती नेहमीच झेपते असे नाही. त्यामुळे शांत भावाने आपले साधन चालावे असे मला वाटते.
आपण अत्यन्त थोर, प्रातःस्मरणीय सद्गुरूंच्या अनुगृहीत आहात. त्यांच्या चरणावर आपल्या साधनेतील भवितव्याचा आपला भार टाकून त्यांनी दिलेले साधन करीत आनंदात प्रसन्न रहावे, आणि कर्तव्य कर्मे पार पाडीत अनायासे जमेल तितक्याच संत-सहवासादि गोष्टीत संतोष मानावा, हे आवर्जून सांगावेसे वाटते.
आपण लिहिल्याप्रमाणे 'राम-कथे'च्या कॅसेटस् विक्री करिता उपलब्ध नाहीत व या दिवसात 'राम-कथे'चे रेकॉर्डिंग झाल्याचे माझ्या स्मरणात नाही.

अमळनेरच्या 'राम कथेचे' रेकार्डिंग ~~आल्याचे~~ जर
चांगले झाले असेल तर आपण डॉ. पंडित यांना
पत्र पाठवून त्याची कॉपी करून मागवून घ्यावी.
आदरणीय डॉ. रमेशजी व सौ. वहिनींना
सप्रेम जय श्रीकृष्ण।
प्रकृतीची काळजी घ्यावी.
कुशल पत्र यावे.
शेष भगवत्-कृपा।
इति।

शुभाकांक्षी,
किशोरजी

ॐ

भारतमाता मंदिर

समन्वय कुटीर, सप्त सरोवर, हरिद्वार - 249410 (उत्तरांचल) भारत

BHARATMATA MANDIR

Samanvaya Kutir, Sapta Sarowar, Haridwar - 249 410 (Uttaranchal) India

Telephone : Office : 0133-460256, Fax : 0133-46098[illegible]

Bharat Sadan : 0133-460111, Fax : 0133-46003[illegible]

E-mail : samanvayat_hwr@sancharnet.in

website : www.bharatmatamandir.com

स्वामी सत्यमित्रानन्द गिरि

फोन [illegible]

दिनांक : 20/7/03

[illegible] कमलेश्वर [illegible]

सप्रेम नारायण स्मरण।

आशा है आप स्वस्थ प्रसन्न होंगे। भगवान की कृपा, श्री हनुमान जी के आशीर्वाद और गंगामाता के परम वात्सल्य से भारत के शहीदों और बलिदानियों की स्मृति में आयोजित श्रीराम कथा का आयोजन सफलतापूर्वक सम्पन्न हो गया। देश-विदेश के हजारों भाई-बहनों ने इसमें भाग लिया। प्रसिद्ध कथाकार श्री मोरारी बापू जी ने अपनी ललित वाणी से श्रीरामचरित मानस का दिव्य प्रसाद वितरित किया। इस शरीर के द्वारा भी वाङ्मयी सेवा सैनिक शतक की व्याख्या के रूप में की गई।

आस्था चैनल के माध्यम से संसार के सभी महाद्वीपों के लगभग एक करोड़ श्रद्धालुओं ने इस कार्यक्रम को देखा और सुना। अनेक देशों से कार्यक्रम की सराहना भरे पत्र प्रतिदिन प्राप्त हो रहे हैं। लगभग दस हजार सन्तों और भक्तों का नित्य भोजन सेवा रहा। वृन्दावन के रासाचार्य पं० श्री रामस्वरूप जी शर्मा ने श्रीकृष्ण लीला का दर्शन करवाकर कार्यक्रम में चार चांद लगा दिये। वीर सैनिक शहीदों की पत्नियों - आश्रितों का सम्मान किया गया।

भारत गणराज्य के उप प्रधानमंत्री श्री लाल कृष्ण आडवाणी जी ने प्रथम दिवस उपस्थित हो कर कार्यक्रम का उद्घाटन किया। सैकड़ों सन्तों की उपस्थिति से कार्यक्रम की गरिमा नित्य बढ़ती रही। इस वर्ष भारतमाता मन्दिर का पाटोत्सव भी इसी राम कथा के साथ सम्पन्न हुआ। परमात्मा के गुणगान में अद्भुत क्षमता है। अन्ततोगत्वा विश्व शान्ति का यही एकमात्र मार्ग है।

आपका पत्र मिला। आपकी सात्विक आर्थिक, मानसिक और दैहिक सेवा के प्रति मैं अपनी कृतज्ञता व्यक्त करता हूं और परमात्मा से प्रार्थना करता हूं कि आप सदा सुखी और आनन्दित रहें। आश्रम की समस्त सेवा प्रवृत्तियां जैसे अन्नक्षेत्र, गौसेवा, छात्रसेवा, वृद्धसेवा, फिजियोथैरेपी सेन्टर, साहित्य प्रकाशन, पुस्तकालय, कॉलेज आदि आपके सहयोग से सुचारु रूप से चल रही हैं। भविष्य में भी आपका सहयोग मिलता रहेगा ऐसी आशा है। मेरी शुभकामनाएं सदा आपके साथ हैं। काम करते रहें। प्रभु का नाम लेते रहें और आनन्द में रहें।

ईश्वरेच्छा सर्वोपरि है।

[illegible] में
सुखी रहें यही
शुभकामना है

भवदीय,

(स्वामी सत्यमित्रानन्द गिरि)

Hardwar
29th Nov 89.

Dear Kamalji.

Jai Shri Sitaram. I received your letter sent to me at Calcutta. You will be pleased to know that I had the opportunity to meet Murari Bapu at Hardwar when he was going to Kedarnath. He had halted for an hour at the same place I am staying. During that time I brought up the discussion regarding the printing of Ramayan. He has agreed to have a look at the [illegible] and has said that if you ~~meeting~~ him he will see what assistance can be given. He had mentioned about taking a कथा but as mentioned by you I told him that you did not have the manpower etc to organise the कथा so I told him if he could take a look at the [illegible] and if he could arrange some assistance. So after that he could [illegible] you can arrange to meet him [illegible]. This He may not be very familiar with my name so you could add reference Chachi of Shri [illegible] Poddar. I am sending the मिट्टी from Ayodhya.

With all good wishes.

Yours Sincerely

Nirmala

युगाब्द 5097 / २५ $\frac{१२}{९५}$ ॥ श्री: ॥ "भास्कर" ९ अभ्यंकर नगर
नागपूर-[illegible]0010

आदरणीय डॉ. कमल वैद्य यांस,

स.न. वि.वि. रामकृष्ण डालमिया न्यास तर्फे श्रीवाणी अलंकरण पुरस्कार (१९९५) मला देण्यात आल्या बद्दल आपण जे सद्भावना पूर्ण अभिनन्दन पत्र अगत्याने पाठविले त्यातील सद्भावनांचा मी स्वीकार करतो. अशीच आत्मीयता निरंतर असो ही प्रार्थना। मध्यंतरी श्री श्रीराम गिडाजींची भेट झाली होती. माझे लेखन सतत चालू आहे. जानेवारीत विवेकानन्द केन्द्राच्या भवनाचे उद्घाटनानिमित्त

गुवाहाटीला जाईन इतर
सर्व कुशल. रामचरित मानस
प्रेमी बंधूंना नमस्कार।

आपला
श्री. भा. वर्णेकर
'प्रज्ञाभारती'

श्री विठ्ठल प्रसन्न.

मुंबई.

डॉक्टर कमल वाघ यांस, ३०-९-८२

सप्रेम आशीर्वाद. आपले १७-९-८२ चे पत्र मिळाले. आमच्या उपासना यज्ञाची कॅसेट तुम्हाला आवडली हे वाचून समाधान वाटले. उपासना यज्ञामध्ये ज्या संगीताच्या चाली लावलेल्या आहेत, त्या चाली मी स्वतःच लावलेल्या आहेत. खरे सांगायचे म्हणजे या चाली मी लावतो असे म्हणणे चुकीचे ठरेल, कारण त्या चाली मला अचानक स्फुरतात. दुसरा महत्वाचा मुद्दा म्हणजे उपासना यज्ञाची ओळ न् ओळ ठरलेली आहे, त्यात अन्य गोष्टी घालता येणे शक्य होणार नाही. तिसरा महत्वाचा

॥ श्रीरामजी ॥

सेवामें

राम राम

सप्रेम हरिस्मरण।

गीताभवन
पौषकृष्णा ३, २०१६

आपका पत्र मिला। श्रीस्वामीजी महाराजको सुना दिया। सुनकर श्रीस्वामीजी महाराज भी गद्गद होगये। बोले कि यह (जो आपने भावसमाधी की घटनाएँ लिखी, वे) सत्य है। भगवान तो जाग्रत, स्वप्न, सुषुप्ति में भी है और उनसे अतीत भी हैं। भगवानकी बड़ी कृपा है अच्छा है।

कई लोगोंका प्रश्न है कि मानसगूढार्थचन्द्रिका और मानसपीयूष में फर्क क्या है। इस टीकामें मानस-पीयूष से क्या विशेषता है। लोगोंकी यह भी हालत है कि अपने पास मानस-पीयूष तो है, अब इसटीका को खरीदें, या नहीं? खरीदें, तो कौनसी कमीकी पूर्ति के लिये। मानसपीयूषमें क्या कमी है और इसमें क्या विशेषता है आदि आदि। इसपर श्री विष्णुजी चांदकोठियाजीने कहलाया है कि इस विषयमें कुछ लिखें। वो युगकल्याण पत्रिकामें छपादिया जाय, जिससे लोगोंके समझमें आये। इसीलिये आपसे प्रार्थना है कि मानस-पीयूष जिनके पासमें है, उनके लिये यह टीका कितनी आवश्यक है?

शेष भगवत्कृपा। रामदास।



**SWAMI TEJOMAYANANDA**

ॐ

BAKERSFIELD, CA
U.S.A.

१२ जून २००९

संदेश

३ ऑगस्ट १९९३ रोजी परम पूज्य गुरुदेवांनी महासमाधि घेतली. आतां हा दिवस चिन्मय मिशनच्या सर्व शाखेंत "साधना दिवस" म्हणून नेमण्यांत आला आहे. साधनेचा एक भाग आपआपल्या सद्गुरुंचे जीवनचरित्र वाचण्याची प्रथा महाराष्ट्रांत विशेषकरून दिसते. डॉ. श्रीमती कमलताई वैद्य यांनी पूज्य गुरुदेवांचे ओवीबद्ध चरित्र "चिन्मय चरितामृत" लिहून मराठी भाषी साधक भक्तांची फार छान सोय करून दिली आहे. ही रचना सोपी व सरस अशी झाली आहे. कमलताईंचे अभिनंदन!

चिन्मय मिशन, पुणे ह्यावर्षी साधना दिवसानिमित्त "चिन्मय चरितामृत" ही रचना स्मारिकेच्या रूपाने प्रकाशित करत आहे ह्याचा मला आनंद वाटतो. सर्व भक्तांनी मनोभावाने हे चरित्र वाचावे अशी माझी विनंती आहे. परम पूज्य गुरुदेवांचे आशीर्वाद सर्वांवर सदैव राहोत.

सप्रेम,

तेजोमयानंद

CENTRAL CHINMAYA MISSION TRUST, SANDEEPANY SADHANALAYA, SAKI VIHAR ROAD, MUMBAI - 400 072. INDIA.
Tel.: 91-22-2857 2367, 2857 5806, 2857 2828 • Fax: 91-22-2857 3065 • E-mail: ccmt@vsnl.com • Website: www.chinmayamission.com

ॐ

२९ जून २००९

- संदेश -

ॐ श्री चिन्मय सद्‌गुरुदेवाय नमः ।

ज्या पुण्यनगरीत परमपूज्य श्री गुरुदेवांचा १९५१ साली प्रथम ज्ञान-यज्ञ यशस्वीपणे संपन्न होऊन, जणु हिमालयातील ज्ञानगंगा, श्री गणेश मंदिरात अवतरली व चिन्मय मिशन चळवळीचा 'श्री गणेशा' (शुभारंभ) झाला. त्या पुणे शहरात कार्यरत असलेल्या चिन्मय मिशन पुणे द्वारा, (सर्व चिन्मय मिशन केंद्रांमध्ये) 'साधना दिवस' म्हणून पाळल्या जाण्याऱ्या, ३ ऑगस्ट ह्या महासमाधी दिनी, विशेषतः श्री गुरुदेवांचे स्फूर्तिदायक मराठी ओवीबद्ध 'जीवन चरित्र' - ''चिन्मय चरितामृत'' हा, डॉ. श्रीमती कमलताई वैद्य यांनी सरळ सोप्या मराठी भाषेत शब्दांकित केलेला ग्रंथ स्मरणिका रुपाने प्रकाशित होत आहे, हा ईश-गुरू कृपेने मराठी भाषा जाणणाऱ्या साधकांकरिता सहज जुळून आलेला अनुपम महायोग आहे.

डॉ. कमलताई वैद्य यांनी अत्यंत परिश्रमपूर्वक मागील एक वर्षभर, श्री गुरुदेवांच्या चरित्रासंबंधी इंग्रजी व मराठी भाषेत चिन्मय मिशन तर्फे प्रकाशित झालेल्या साहित्याचा सखोल अभ्यास करून, श्रद्धा-भक्तिभावयुक्त अंतःकरणाने, श्री गुरुदेवांना आद्य शंकराचार्यांचा अवतार समजून उत्स्फूर्तपणे केलेली ही ओवीबद्ध रचना अधिकृत, प्रासादिक व उद्‌बोधक आहे. विशेष म्हणजे: ज्ञानमय, प्रेममय व सेवामय जीवन असलेल्या त्या महान युगपुरुषाचे 'जीवनचरित्र' थोडक्यात लिहिले असूनही सविस्तर माहिती देणारे आहे.

मलाही प्रस्तुत पुस्तकाचे वाचनाने, त्यांचे काही प्रेरणात्मक प्रसंगाबाबत नवीन माहिती लाभली व वाचून आनंद झाला. ''चिन्मय चरितामृत'' ग्रंथरचनेचे महान कार्य श्री गुरुदेवांप्रति श्रद्धापूर्वक निष्ठा हृदयी बाळगून चिन्मय मिशनला चिन्मयप्रेमी साधकांचे हितार्थ समर्पणभावाने उपलब्ध करून दिल्याबाबत, श्रीमती कमलताईंचे मी हार्दिक अभिनंदन करतो. त्यांना अनेक धन्यवाद! ''चिन्मय चरितामृत'' ह्या ग्रंथाचे वाचन चिंतन ही एक प्रेरणा व आनन्ददायक 'साधनाच' आहे.

चिन्मय मिशन पुणे द्वारा, यंदा, साधना दिवस म्हणून पाळल्या जाणाऱ्या श्री गुरुदेवांचे महासमाधिदिनाचे प्रसंगी ''चिन्मय चरितामृत'' स्मरणिका रुपाने प्रकाशित होत आहे. हे प्रसंगोचित, स्फूर्ती व आनंददायक सत्कार्य प्रशंसनीय आहे. त्याबाबत चिन्मय मिशन पुणे येथील कार्यकर्त्यांचे हार्दिक अभिनंदन!

''चिन्मय चरितामृताचे'' प्रकाशनानंतर महाराष्ट्रातील प्रत्येक चिन्मय मिशन केंद्रामध्ये ह्या ग्रंथाची कमीतकमी एक प्रत अवश्य असावी आणि प्रसंगानुसार या ग्रंथाचे पारायण व चिंतन व्हावे. तसेच चिन्मयप्रेमी साधकांचे घरीही प्रस्तुत ग्रंथ संग्रही असावा व त्याचे वर्षातून एकदातरी वैयक्तिक किंवा सामुदायिक पद्धतीने पारायण करावे ही श्री चिन्मय सद्‌गुरुदेव चरणी प्रार्थना व सर्वांना आवाहन.

परमपूज्य श्री गुरुदेवांचे कृपाशिर्वाद सर्वांवर असो.

सर्वांना प्रेम, क्षेम व हरिः ॐ.

जय गुरुदेव!
जय जगदीश्वर!

स्वामी पुरुषोत्तमानन्द



॥ हरि ॐ ॥

# चिन्मय मिशन पुणे

ए-२ ईश्वर शरण, ३३७ नॉर्थ मेन रोड, कोरेगाव पार्क, पुणे ४११००१
+९१-९९७५५९-६३९४, +९१-९८-८११९२८५९, +९१-२०-२६१५-२१७२
Web: www.chinmayamission.com/pune Email: cmpune@gmail.com



॥ ॐ श्री चिन्मय सद्‌गुरवे नमः ॥

दि. ०७-०७-०९

आत्मस्वरूप चिन्मय प्रेमी,

हरिः ॐ, नमस्कार !

कळवण्यास अत्यंत आनंद होत आहे की, परमपूज्य गुरुदेवांचे, स्वामी चिन्मयानंदांचे मराठीतून ओवीबद्ध चरित्र रचण्यात आले आहे. हे चरित्र 'साधना दिवस' ३ ऑगस्ट २००९ रोजी स्मरणिकेच्या स्वरूपात प्रकाशित होत आहे. पूज्य गुरुजी स्वामी तेजोमयानंदजी यांच्या प्रेरणेने व पूज्य स्वामी पुरुषोत्तमानंदजी यांच्या आशीर्वादाने सांगलीच्या डॉ. कमलताई वैद्य यांनी हे चरित्र अभ्यासपूर्वक शब्दबद्ध केले आहे. सर्वांनी आपल्याजवळ संग्रही ठेवावे असे हे गुरुदेवांचे चरित्र खूपच सुंदर माहितीपूर्ण आणि मनाला प्रेरणा, आनंद व शांती देणारे आहे.

आपणही या प्रकाशनाच्या कार्यात फुल ना फुलाची पाकळी अर्पण करून सहभागी होऊ शकता.

**आपण काय करू शकता?** : १. अधिकाधिक लोकांपर्यंत हे चरित्र पोहोचवू शकता. २. या चरित्राची पाने पुरस्कृत करू शकता. ३. जाहिरात देऊ शकता.

**१. स्मरणिका मागवण्यासाठी:** ३ ऑगस्ट २००९ नंतर या चरित्राचे विक्री मूल्य रु. १०० असेल. प्रकाशनपूर्व (दि. २० जुलै ०९ पूर्वी) मूल्य भरून नोंदणी करणाऱ्यांसाठी अतिशय सवलतीचे मूल्य रु. ५० फक्त असेल.

३ ऑगस्ट २००९ नंतर दहा पेक्षा अधिक प्रति मागवणाऱ्यांसाठी पुढील प्रमाणे सवलत देण्यात येईल.

१० किंवा अधिक प्रति ( २० टक्के सूट ) रु. ८० प्रत्येक प्रतीसाठी
२५ किंवा अधिक प्रति ( ३० टक्के सूट ) रु. ७० प्रत्येक प्रतीसाठी
५० किंवा अधिक प्रति ( ४० टक्के सूट ) रु. ६० प्रत्येक प्रतीसाठी

सवलतीची पूर्ण रक्कम आगाऊ भरणे अपेक्षित आहे. आपले धनादेश / ड्राफ्ट 'चिन्मय मिशन पुणे' या नावाने काढावेत. पुण्याबाहेरील धनादेश असल्यास रु.७५ बँक फी अधिक भरावी व खालील पत्त्यावर पाठवावेत.

**चिन्मय मिशन पुणे: ए-२, ईश्वर शरण सोसायटी, ३३७ नॉर्थ मेन रोड, कोरेगाव पार्क, पुणे ४११००१**

स्मरणिका पोस्टाने / कुरियरने हवी असल्यास त्याप्रमाणे वेगळे मूल्य भरावे लागेल. यासंबंधी अधिक माहितीसाठी खालील ठिकाणी संपर्क साधू शकता: मोबाईल: **९९७५५९६३९४, ९८८११९२८५९**. फोन: ०२०-२६१५२१७२.
ईमेल: **cmpune@gmail.com**

**२. आपण या चरित्राची पाने पुरस्कृत करू शकता. रु. ५०० प्रति पान.**

**३. आपण या स्मरणिकेत आपली जाहिरात देऊ शकता.**

| | | | |
|---|---|---|---|
| संपूर्ण पान | रु. २००० | ( कृष्णधवल ) | रु. ५००० ( रंगीत ) |
| अर्धे पान | रु. १००० | ( कृष्णधवल ) | रु. २५०० ( रंगीत ) |
| तळटीप | रु. ५०० | ( कृष्णधवल ) | रु. १५०० ( रंगीत ) |
| शेवटचे कव्हर पान | रु. १०,००० ( रंगीत ) | | |

आपली जाहिरात योग्य स्वरूपात दि. १५ जुलैपूर्वी वरील पत्त्यावर पत्राद्वारे अथवा ईमेल द्वारे पाठवावी.

गुरुदेव चरितामृताचे हे कार्य सर्वांच्या शुभेच्छा, शुभाशीर्वाद व सहकार्यानेच सिद्ध होऊ शकेल. तरी आपणास या कार्यास संपूर्ण मदत करण्याची नम्र विनंती व आवाहन. धन्यवाद!

गुरुदेव सेवक
ब्रह्मचारी शैलेश चैतन्य
(आचार्य चिन्मय मिशन, पुणे)

*गुरूंची तळमळ समजून त्यावर चिंतन करून त्याप्रमाणे जगण्याचा पुरेपूर प्रयत्न करणे हीच गुरूंची खरी सेवा होय.*
*- परम पूज्य गुरुदेव स्वामी चिन्मयानंद*

# अय्याबुवा रामदासी समर्थपदी लीन



स. भ. अय्याबुवा रामदासी

(कै.) व्यंकटरमण ऊर्फ अय्याबुवा रामदासी हे मूळचे राहणारे 'सेलम', तामिळनाडूमधील होते. ते वयाच्या २५ व्यावर्षी परमार्थाच्या सद्विचाराने घराच्या बाहेर पडले. विवेक वैराग्याचा निश्चय करून त्यांनी तामिळनाडू प्रांत सोडला. पंढरपूरच्या पांडुरंगाची कीर्ती ऐकून, वाचून माहीत होती. घर सोडल्यानंतर सर्वप्रथम ते महाराष्ट्रात पंढरपूर येथे आले. पंढरपूरमध्ये काही दिवस मुक्काम केला. घरामधे रामोपासना असल्यामुळे रामदैवत, रामक्षेत्राची ओढ लागली होती. विचारांती श्रीरामरायाचे चाफळ क्षेत्र निवडले. चाफळच्या राममंदिरात एक वर्षभर रामोपासना केली. त्याच कालावधीत त्यांना श्रीधरस्वामींचे दर्शन झाले. १९३५ साली श्रीधरस्वामींचा अनुग्रह झाला. पुढे स्वामींच्या आज्ञेवरून अय्याबुवा सज्जनगडावर येऊन पोहोचले. परमार्थ-मार्गाची दिशा मिळाली. स्नानसंध्या, आचार- विचार, पूजा-अर्चा, आत्मचिंतन अशी जीवन पद्धती सुरु झाली. सन १९५१ नंतर ते समर्थ सेवा मंडळ सज्जनगड या संस्थेचे अधिकृत कार्यकर्ते म्हणून सेवा करू लागले. श्रीराममूर्तीची, श्री समर्थ समाधीची पूजाअर्चा करू लागले, श्री समर्थ सेवा मंडळाचा प्रकाशन विभागही पाहू लागले. सन १९५४ ते ५६ त्यांनी कायगाव टोका प्रवरासंगम या ठिकाणी गायत्री पुरश्चरण सुरू केले. त्या ठिकाणी गोदावरी आणि प्रवरा संगम आहे. अय्याबुवांनी त्या प्रवरासंगमावर पाण्यात उभे राहून गायत्री पुरश्चरण केले. अय्याबुवांनी श्रीधर स्वामींच्या समवेत हिमालयाचा प्रवास केला. बद्रीकेदार येथे एका चातुर्मासात श्रीधर स्वामींची सेवाही केली. श्रीधर स्वामींचा भरपूर सहवास लाभल्यामुळे त्यांची परमार्थामधे उत्तम प्रगती होती. अय्याबुवा हे जीवनभर वाचन, मनन, चिंतन, ध्यानधारणा अशी आध्यात्मिक उपासना करीत असत. श्री समर्थांच्यावर त्यांची अत्यंत निष्ठा होती. जीवनभर आत्मियतेने केलेल्या उपासनेचे फळ त्यांना मिळाले होते. वयाच्या ९२ वर्षापर्यंत त्यांची प्रकृती निरोगी होती. जीवनभर आत्मचिंतन करीत असल्यामुळे अखेरच्या क्षणापर्यंत [illegible] स्मृती जागृत (टिकून) होती. अय्याबुवा वयाच्या ९२ वर्षांची वाटचाल पूर्ण करून दि. १/५/२००३ रोजी ते आनंदाने पंचतत्त्वात विलीन झाले. श्री समर्थ सेवा मंडळातील एक वयोवृद्ध, तपोवृद्ध, ज्ञानवृद्ध रामदासी समर्थपदी लीन झाला. अय्याबुवांच्या दिव्य स्मृतिला शतशः नमस्कार.

मारुतीबुवा रामदासी

॥ सज्जनगड मासिक पत्रिका ॥ ११ जून २००३

# ब्र.प.पू. प्रज्ञानानंद सरस्वतींचे अध्यात्मिक ग्रंथ

## श्रीरामचरितमानस (मराठी) अनुवाद

(श्रीरामचरितमानसावरील टीका ग्रंथ रु.३७६०/-चे ग्रंथ आजीवन सदस्यत्वात फक्त रु. २५००/-त घरपोच)

| | |
|---|---|
| मानस गूढार्थ चंद्रिका बालकांड खंड १ | रु. २५०/- |
| मानस गूढार्थ चंद्रिका बालकांड खंड २ | रु. २००/- |
| मानस गूढार्थ चंद्रिका बालकांड खंड ३ | रु. ३००/- |
| मानस गूढार्थ चंद्रिका बालकांड खंड ४ | रु. २००/- |
| मानस गूढार्थ चंद्रिका बालकांड खंड ५ | रु. २००/- |
| मानस गूढार्थ चंद्रिका बालकांड खंड ६ | रु. २५०/- |
| मानस गूढार्थ चंद्रिका अयोध्याकांड खंड १ | रु. २००/- |
| मानस गूढार्थ चंद्रिका अयोध्याकांड खंड २ | रु. ३००/- |
| मानस गूढार्थ चंद्रिका अयोध्याकांड खंड ३ | रु. २५०/- |
| मानस गूढार्थ चंद्रिका अयोध्याकांड खंड ४ | रु. २५०/- |
| मानस गूढार्थ चंद्रिका अरण्यकांड (संपूर्ण) | रु. १००/- |
| मानस गूढार्थ चंद्रिका किष्किंधाकांड (संपूर्ण) | रु. ६०/- |
| मानस गूढार्थ चंद्रिका सुंदरकांड (संपूर्ण) | रु. १००/- |
| मानस गूढार्थ चंद्रिका लंकाकांड खंड १ | रु. २५०/- |
| मानस गूढार्थ चंद्रिका लंकाकांड खंड २ | रु. २००/- |
| मानस गूढार्थ चंद्रिका उत्तरकांड खंड १ | रु. २५०/- |
| मानस गूढार्थ चंद्रिका उत्तरकांड खंड २ | रु. ३००/- |
| मानवतापूर्ती साधन-संध्योपासना | रु. १२५/- |
| संगीत भ. गीता समश्लोकी | रु. १५/- |
| अभिनव रामायण | रु. २०/- |
| प्रज्ञानांजलि भाग १ | रु. ५/- |
| प्रज्ञानांजलि भाग २ | रु. १०/- |
| सुंदरकांड (मराठी) | रु. १५/- |
| महाराष्ट्राचे तुलसीदास -डॉ. अनिता केळकर | रु. १००/- |
| स्वामी प्रज्ञानानंद चरित्र- डॉ. कमल बा. वैद्य | रु. ३५/- |
| गोस्वामी तुलसीदास -डॉ. कमल बा. वैद्य | रु. ३०/- |
| वेदांत सार अभंग रामायण | रु. ५०/- |
| मानस मोती | रु. १२५/- |

वरील सर्व पुस्तके श्रीरामचरितमानसप्रेमी मंडळ रजि.ट्र.जे ९१९ (ठाणे) डोंबिवली (पूर्व इथून) प्रकाशित झालेली आहेत.

सध्या ही सर्व पुस्तके मिळण्याचे ठिकाण : श्री. भालचंद्र दिवाकर,
'मल्हार' बंगला, समर्थनगर, राम मंदिर जवळ,
मु.पो. उस्मानाबाद (धाराशिव) फोन : ०२४७२-२२४९८९